२१ डिसेंबर १९४५



**न. विं. सरदेशपांडे**, यांनीं आदर्श मुद्रणालय, ३९५।५ सदाशिव, पुणें २ येथें छापलें व दि डेक्कन पब्लिशर्स लिमिटेड, २७ बुधवार पेठ, पुणें २ यांचेकरितां सेक्रेटरी, **ज. श्री. बाघ**, यांनीं प्रसिद्ध केलें.

हृदयाची
कालवाकालव करून सोडणाऱ्या
श्रीमंत सौ. पार्वतीबाईच्या
पवित्र स्मृतीस

# ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशन समिति–बेळगांव

ही समिति स्थापन होऊन सुमारें दीड वर्ष होत आलें. या समितीचे पहिले दोन ग्रंथ "नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या!" व "तोतयाचें बंड" (श्री पां.गो.रानडे कृत) हे ता.३१–८–१९४४ रोजीं प्रसिद्ध झाले. त्यानंतर कै. श्रीमंत राघोबादादा पेशवे ऊर्फ राघोभरारी यांच्या, बेळगांवीं पहिल्यानेंच साजरी केलेल्या,पुण्यतिथीच्या दिवशीं म्हणजे ता.२१-१२-१९४५ रोजीं आणखी कांहीं ऐतिहासिक ग्रंथ प्रसिद्ध करण्याची कामगिरी या समितीनें आपले शिरावर घेतली व निरनिराळ्या इतिहासतज्ञ लेखकांकडून खालील पांच पुस्तकें लिहवून घेण्यांत आलीं तीं:–

१ राघोभरारी यांचें चरित्र लेखक श्री.स.रं.मुंठणकर बी ए.एल.एल.बी.

२ सदाशिवराव भाऊ पेशवे यांचे चरित्र, लेखक–श्री. वि. म. भुस्कुटे.

३ सखाराम हरी गुप्ते यांचें चरित्र—लेखक य. रा. गुप्ते, बी. ए. एम्. आर. ए. एस्. ( लंडन ).

४ त्र्यंबक सूर्याजी यांचें चरित्र—लेखक बा. स. कुलकर्णी.

५ जुठे तोतये ( म्हणजे सदाशिवरावभाऊ पेशवे व जनकोजी शिंदे यांना पेशवे दरबारनें ते खरे असतां तोतये कसे टरविले हा इतिहास ) लेखक–वि. स. वाकसकर.

सध्यांच्या परिस्थितींत असे ऐतिहासिक ग्रंथ प्रसिद्ध करणें अत्यंत अवघड होतें. परंतु या समितीला बेळगांवच्या दानशूर श्रीमंत रंगुबाई साहेब जाधव ( केसर–इ–हिंद ) यांनीं पांच हजार रुपयांची उदार देणगी दिल्यामुळें या समितीस या ग्रंथांच्या प्रकाशनाचे काम सुलभ झालें. त्या बद्दल ही समिति त्यांची अत्यंत आभारी आहे.

त्याचप्रमाणें सदर ग्रंथांच्या लेखकांनीं, मुद्रकांनीं व प्रकाशकांनीं या बाबतींत समितीस जें सहाय्य केलें त्याबद्दल ही समिति त्यांची आभारी आहे.

या वरील पांच पुस्तकांच्या आधारासंबंधीं अगर त्यांतील मतें व अनुमानें या संबंधीं आणि त्या पुस्तकांच्या पुरस्कर्त्यांच्या मतांसंबंधीं ते ते लेखक व ते ते पुरस्कर्ते सर्वस्वी जबाबदार आहेत. ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशन समिति बेळगांव हिचेवर लेखकांच्या मतमतांतरांसंबंधीं कोणतीच जबाबदारी नाहीं.

बेळगांव
ता. १५-१२-१९४५ } चिटणीस
ऐ. ग्रं. प्र. समिति बेळगांव

# ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशन समिति बेळगांव हिनें प्रसिद्ध केलेले ग्रंथ.

| ग्रंथाचें नांव | लेखक | किंमत रु. आ. पै. |
| --- | --- | --- |
| १. नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या? भाग २ | श्री. पां. गो. रानडे | १४—०—० |
| २. तोतयाचें बंड | श्री. पां. गो. रानडे | १—४—० |
| ३. राघो भरारी यांचें चरित्र | श्री. स. रं. सुंठणकर बी. ए. एल. एल. बी. | ३—०—० |
| ४. सदाशिव भाऊ पेशवे यांचें चरित्र | श्री. वि. म. भुस्कुटे | ४—०—० |
| ५. सखाराम हरी गुप्ते यांचें चरित्र | श्री. य. रा. गुप्ते, बी. ए. एम्. आर. ए. एस्. (लंडन) | २—०—० |
| ६. त्र्यंबक सूर्याजी प्रभू यांचें चरित्र | श्री. आ. स. कुलकर्णी | १—०—० |
| ७. जुळे तोतये | श्री. वि. स. वाकसकर | ४—०—० |

मिळण्याचा पत्ता:—

चिटणीस,

ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशन समिति

१२२७ कोनवाळ गल्ली बेळगांव.

# प्रस्तावना

हिंदुपतपातशाहीचें ध्येय सतत डोळ्यांपुढें ठेवून त्याकरितां लढणारे जे थोडे पुरुष मराठेशाहींत होऊन गेले त्यांत पहिले बाजीराव व चिमाजी आप्पा यांचे खालोखाल सदाशिवरावभाऊंची गणना केली पाहिजे. हें ध्येय पूर्णपणें साध्य करावयाचें असल्यास मराठेशाहींतल्या सर्व शक्तींची अभेद्य एकजूट झाली पाहिजे व मध्यवर्ती सत्ता सर्वाधिकारानें युक्त, बलिष्ठ व केंद्रीभूत झाली पाहिजे व तिच्या एकसूत्री नेतृत्वाखालीं मराठेशाहीची चढाईची मुलुखगिरी चालली पाहिजे, हें धोरण सदाशिवरावभाऊनें निखालसपणें जाणलें होतें. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, सदाशिवरावभाऊच्या या व्यापक राजकारणचातुर्याला मिळावा तसा वाव मिळाला नाहीं.

मुख्यतः या कारणामुळेंच सदाशिवरावभाऊचें चरित्र लिहिण्यास मी प्रवृत्त झालों. बाळाजी बाजीरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं त्या वेळीं भाऊ थोडा लहान होता. पण शाहू छत्रपतीनें त्याच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें त्याला दुय्यम पेशवाईचीं वस्त्रें दिलीं होतीं. पुढें तीन चार वर्षांनीं भाऊ कारभारास योग्य झाला असतांहि ‘भाऊला सातार्‍याहून नेऊन त्याला आपल्या कारभारांत कां घेत नाहीं’ अशी शाहूनें पृच्छा केली. त्या वेळीं नाइलाजास्तव नानासाहेबानें त्यास पुण्यास आणलें. पण त्याला प्रत्यक्ष कारभारांत घेतलें नाहीं. ‘दोन्ही वेळीं पंगतींत जेवावें व दप्तरीं स्वस्थ बसून रहावें’ अशी त्याची स्थिति करून सोडली. भाऊच्या कुचंबणेला येथून सुरुवात झाली तरी भाऊ आपल्या कर्तबगारीनें पुढें आला व त्यानें नानासाहेबाला आपल्याला कारभारांत घेण्याला भागच पाडलें व तेव्हांपासून नानासाहेबाच्या कारकीर्दींतील पेशवाईचा कारभार म्हणजे नानासाहेब व भाऊसाहेब या दोघांचा कारभार झाला.

पानिपतची मोहिम तर भाऊनें स्वतःच्या हिंमतीवर चालवली. पण त्यापूर्वींच्या कर्नाटकाच्या स्वार्‍या, निजामचा बंदोबस्त, रामराजाचें प्रकरण,

ताराबाईचे डावपेंच, सातारा व कोल्हापुर या दोन्ही गाद्या एकत्र करण्याचा प्रयत्न, पेशव्याला न जुमानतां स्वतंत्र होऊं पहाणाऱ्या शिंदे–होळकरांसारख्या सरदारांच्या कारभारावर देखरेख ठेवून त्यांना वठणीवर आणणें या सर्व बाबतींत भाऊचा कधीं अप्रत्यक्ष तर कधीं प्रत्यक्ष हात होता. नानासाहेबांच्या कारकीर्दींत ज्या अनेक घडामोडी झाल्या त्यांचा इतिहास म्हणजेच सदाशिव-रावभाऊचें चरित्र होय.

कर्नाटकांतील छोट्या मोठ्या नबाबांना निकालांत काढून व निजामाची सत्ता नष्ट करून दक्षिण मोकळी करायची, दिल्लीच्या बादशाही सत्तेचीं सूत्रें हातीं घ्यावयाचीं व त्यानंतर परदेशाहून आलेल्या इंग्रज फ्रेंचांचा समाचार घ्यायचा व मराठ्यांची सार्वभौम सत्ता हिंदुस्थानांत प्रस्थापित करून हिंदुस्थानला ' अखंड हिंदुस्थान ' बनवायचें ही भाऊसाहेबाच्या कारभारांतील मुख्य योजना होती व हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या मराठे सरदारांच्या मोकाटपणाला आळा घालून त्यांना सर्वाधिकारी सत्तेच्या एका सूत्रांत गोवायचें हें भाऊसाहेबांच्या कारभाराचें धोरण होतें.

पहिल्या बाजीरावानें आपला दुय्यम पेशवा चिमाजी आप्पा यास त्याच्या कारभारांत पूर्ण मोकळीक दिली होती. तशीच मोकळीक नाना-साहेबानें भाऊस द्यावयास पाहिजे होती. पण भाऊबंदकीच्या भावनेला बळी पडून या सत्ताविभागणीस नानासाहेब तयार नव्हता. यामुळें भाऊच्या या उदात्त व कर्तृत्वशाली धोरणाला मदत करण्याऐवजीं त्यानें अडथळाच आणला. तथापि भाऊनें नामोहरम न होतां आपलें धोरण मोठ्या चातुर्यानें व कर्तबगारीनें तसेंच चालू ठेवलें. यामुळेंच प्रथम उदगीरच्या मोहिमेचीं व नंतर पानिपतच्या मोहिमेचीं सर्व सूत्रें नानासाहेबाला भाऊच्याच हातीं द्यावीं लागलीं. पण यापूर्वींच योग्य वेळीं उत्तरेकडील मोहिमांचें काम उदगीरच्या मोहिमेप्रमाणें भाऊसाहेबाच्याच हातीं देण्यांत आलें असतें तर पानिपतची मोहिमसुद्धां उद्भवली नसती. भाऊच्या योजनेप्रमाणें व धोरणा-प्रमाणें मराठेशाहीच्या सर्वाधिकारी सार्वभौमत्वाखालीं हिंदुस्थानांतील सर्व परक्या शत्रूंचा निःपात होऊन ' अखंड हिंदुस्थान ' निर्माण झाला असता. या एकतंत्री सरंजामशाहींतून इतिहासक्रमानुसार जगांतील इतर देशांप्रमाणें

हिंदुस्थानांतही भांडवलशाहीला वाव मिळाला असता व त्यांतूनच हिंदुस्थानला समाजवादी बनविण्याचें काम इतिहासानें केलें असतें.

पानिपतची मोहिम ही भाऊच्या कर्तबगारीचें परमोच्च शिखर होय. या मोहिमेंत परस्परांशीं वैरभावानें व मध्यवर्ति सत्तेशीं बेगुमानपणें वागणारे, सरदार एकत्र आणण्याचें व त्यांना राजी ठेवून त्यांना एकसूत्रांत गोवण्याचें कठिण कामही सदाशिवरावभाऊनें केलें व ही मोहिमही अगदीं शेवटपर्यंत यशस्वी रीतीनें चालविली. जय आणि पराजय हे कोणाच्या हातचे नसतात. या पराजयानें मराठ्यांची सत्ता एकदम ढासळली नाहीं, तरी मराठ्यांच्या सार्वभौम सत्तेला धक्का बसला, हिंदुस्थानचे तुकडे तुकडे करणाऱ्या व त्याच्या गुलामीला कारणीभूत झालेल्या सर्व देशी परदेशी सत्ता कायम राहिल्या व हिंदुस्थान अर्धसरंजामी व अर्धसाम्राज्यवादी बनून अनेक नवीन व दुःसाध्य असे सवाल निर्माण झाले.

पानिपतच्या मोहिमेनंतर भाऊ प्रकट झाला. त्या वेळींही त्याला पेशवाईतील योग्य स्थान प्राप्त झालें असतें तर मराठेशाहीचा झपाट्यानें झालेला अधःपात त्यानें थांबविला असता. पण या प्रसंगींही पेशवे घराण्यांत बोकाळलेली भाऊबंदकी व कारभारी मंडळीच्या मनांत निर्माण झालेला सत्ताभिलाष त्यांच्या आडवा आला व त्याच्या शोचनीय अंताबरोबर मराठेशाहीचाही शोचनीय अंत झाला.

याप्रमाणें मराठेशाहींतील अत्यंत थोर व कर्तबगार पण भाऊबंदकीला व सत्ताभिलाषाला बळी पडलेल्या पुरुषाचें हें शोकपर्यवसायी चरित्र आहे.

हें चरित्र मुख्यतः सरदेसाईकृत मराठी रियासतीवर आधारलेलें आहे. त्यांतून दिलेल्या हकिगतीवरून व ऐतिहासिक आधारावरूनच हें चरित्र मी तयार केलें आहे. सरदेसाईकृत रियासती म्हणजे अद्ययावत् उपलब्ध साधनांचा संकलनग्रंथच होत. इतिहासवाचनाची आवड असलेल्या मराठी वाचकांनीं श्री. सरदेसाई यांचे आभारच मानले पाहिजेत. या रियासतीशिवाय पेशवे दप्तर, पुरंदरे दप्तर, हिंगणे-दप्तर व नातूकृत महादजी शिंद्यांचें चरित्र वगैरेंचे जे आधार मी घेतले आहेत ते पुरवणीवजा आहेत. तसेंच श्री. पांडुरंग

गोपाळ रानडे यांनीं अनेक ऐतिहासिक ग्रंथांच्या व कागदपत्रांच्या आधारें लिहिलेलें ‘ खून कीं आत्महत्या ’ या पुस्तकाचाही मी आधार घेतला आहे. अर्थात् या चरित्रांत नवीन असें कांहीं नाहीं. पण जें कांहीं नवीन आहे तें एवढेंच कीं, ज्या पुरुषाच्या कर्तबगारीकडे इतिहासांत दुर्लक्ष झालें आहे व गतानुगतिक न्यायानें त्याच्या कर्तृत्वाकडे जी डोळेझांक करण्यांत आली आहे, पानिपतच्या अपयशाचें खापर त्याच्या माथीं मारून मराठेशाहीच्या इतिहासांत त्याला जें गौणस्थान दिलें गेलें आहे त्याचा निरास मुख्यतः सरदेसाईकृत मराठे रियासतीसारख्या संकलित ऐतिहासिक आधारग्रंथांत अगदीं जे उघड उघड पुरावे सांपडले त्यावरूनच मी अगदीं निर्धास्तपणें केला आहे. विशेषतः “ भाऊसाहेब, खरे ” प्रकट झाल्यानंतर अट्टाहासानें त्याला तोतया ठरविण्याचा जो निंद्य व राष्ट्रघातकी प्रयत्न झाला—राजसत्ता काय करूं शकत नाहीं?——तोच समज इतिहासांतही रूढ झाला, त्याचाही निरास आज उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक साधनांवरूनच मी केला आहे.

एकादा ऐतिहासिक गैरसमज एकदां रूढ झाला म्हणजे त्याच्याविरुद्ध इतिहासांत तेथेंच पुरावे असतांनाही त्याकडे दुर्लक्ष होतें व ज्या ऐतिहासिक थोर पुरुषांसंबंधानें आदर वाटावयास पाहिजे त्या ठिकाणीं समाजाच्या मनांत विपरीत भावना निर्माण होतात, सत्याकडे दुर्लक्ष होऊन असत्याचें स्तोम माजतें. कोणाही ऐतिहासिक व्यक्तीची मला निंदा करावयाची नाहीं. पण खरें काय आहे याचा विचार व्हावा व चारित्र्यसंपन्न, शूर, कर्तबगार, ध्येयनिष्ठ सदाशिवराव भाऊसंबंधानें असलेले गैरसमज दूर होऊन महाराष्ट्रांतील आबालवृद्धांनीं त्याचें चरित्र वाचावें या उद्देशानेंच केवळ मी हें चरित्र लिहिलें असून हा उद्देश माझ्या या प्रयत्नानें अंशतः जरी सफल झाला तरी मला धन्यता वाटेल.

पुणे,<br>ता. १८ जाने. १९४६

वि. म. भुस्कुटे

# प्रकाशकाचे चार शब्द



हर प्रकारचे वाङ्मयास प्रसिद्धि देणें हा 'दि डेक्कन पब्लिशर्स, लिमिटेड,' या संस्थेचा एक प्रधान उद्देश आहे. बेळगांवचे ऐतिहासिक ग्रन्थ-प्रकाशन-समिती'नें 'सदाशिवरावभाऊ' हें त्यांचें पुस्तक आमचेकडे प्रकाशनाकरितां त्यांचे उत्साही व इतिहासज्ञ चिटणीस श्री. पां. गो. रानडे यांचे शिफारशीवरून दिलें याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों. पुस्तकाचे लेखक श्री. वि. म. भुस्कुटे हे महाराष्ट्रांतील एक मेहनती व अभ्यासू असे प्रसिद्ध कार्यकर्ते आहेत. त्यांच्या या पुस्तकाच्या प्रकाशनाचा योग आमचेमार्फत येत आहे याबद्दलहि आम्हास संतोष वाटत आहे. बेळगांवची 'समीति' व श्री. वि. म. भुस्कुटे तसेंच ज्यांचेकरितां पुस्तक लिहिण्यांत आले ती अखिल महाराष्ट्रांतील जनता आमच्या या सेवेचें चोज करून आमचे प्रकाशनाचे एकंदर कार्यास सक्रिय सहानुभूति देईल अशी आशा आम्ही बाळगीत आहों. ईश्वरकृपेनें ती सफल होईल असा आम्हांस भरंवसा आहे. पुस्तकाचे गुणावगुणासंबंधीं निर्णय ठरविणें हें वाचकांचें काम आहे. पुस्तक संशोधनपूर्वक व मेहनत घेऊन लिहिण्यांत आलें आहे व 'सदाशिवराव भाऊ' यांचे चरित्रासंबंधीं जी बाजू जनतेपुढें यावयास पाहिजे ती मांडण्याचा योग्य प्रयत्न झाला आहे यांत शंका नाहीं.

**ज. श्री. वाघ,**

प्रकाशकाकरितां

# अनुक्रम

# बालपण



मराठेशाहीच्या वैभवाचे ते दिवस होते. शिवाजी महाराजांची कारकीर्द हा मराठेशाहीचा उदयाचा काल अशी कल्पना केली तर पहिल्या बाजीरावाची कारकीर्द म्हणजे मराठेशाहीरूपी सूर्याचा ऐन मध्यान्हीचा काल असें म्हणतां येईल. मराठेशाहीरूपी सूर्याचें उदयतेज शिवाजी, मध्यान्हीचा प्रतापरवि बाजीराव आणि नाना फडनीस व महादजी शिंदे हे या सूर्याची अस्तप्रभा असें रियासतकारांनीं अगदीं यथार्थ म्हटलें आहे.'+

बाळाजी विश्वनाथ पेशवे २ एप्रिल १७२० रोजीं वारले. त्यानंतर पंधराच दिवसांनीं बाजीरावास शाहूकडून पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. मसूर मुक्कामीं हा समारंभ झाला. याच वेळीं शाहूनें आणखी एक 'लहानसा समारंभ केला. बाजीरावाचा भाऊ चिमणाजी बल्लाळ यास 'पंडित' असा किताब दिला व त्यास सरदारी व सरंजामही दिला. चिमाजी या वेळीं अवघा दहा बारा वर्षांचा होता. पुढें दोन चार वर्षांनीं शाहूनें आपल्या रिवाजाप्रमाणें चिमाजीस पेशव्याचा कारभारी 'दुय्यम पेशवा' बनविलें. पेशवा मुलुखगिरीवर गेला म्हणजे राजधानींत राहून त्याचा कारभार चालविण्याची ही व्यवस्था होती. शिवाय पेशवा अगदीं अनियंत्रित होऊं नये, असेंही या व्यवस्थेच्या मुळाशीं शाहूचें धोरण होतें.

शाहूनें बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं ही गोष्ट शाहूच्या कित्येक सरदारांस पसंत पडली नाहीं. त्यांनीं शाहूभोवतीं थोडीशी कटकट केली. पण त्यानें ती जुमानली नाहीं. शाहूला माणसाची पारख चांगली होती. त्यानें पेशवाईकरतां भट घराणें पसंत केलें यावरून त्याच्या ठिकाणच्या या अलौकिक गुणाची प्रचीति येते.

---

+१ म. रि. म. वि. १, पा. ४०७.

'बाळाजी विश्वनाथ हा आबाजी पुरंदऱ्यापाशीं असलेला एक ब्राह्मण कारकून. त्यास घोड्यावर बसतां येत नव्हतें. आबाजीच्या वशिल्यानें शाहूनें त्यास पदवीस चढविलें ' या प्रवादांत कांहींच अर्थ नाहीं. मत्सरबुद्धीचे हे प्रवाद आहेत. बाळाजी विश्वनाथ भट यांचें घराणें प्रथमपासून एक कर्तबगार घराणें म्हणून महाराष्ट्रांत त्यावेळीं प्रसिद्ध होतें. कोंकणांतील श्रीवर्धन परगण्याची देशमुखी भट घराण्याकडे होती म्हणून या घराण्यांतील पुरुषांस देसाई किंवा देशमुख म्हणत असत. त्या वेळच्या कागदपत्रांतून बाळाजी विश्वनाथाच्या कर्तबगारींसबंधाचे अनेक उल्लेख आढळतात. देशमुख मामले दंडाराजपुरी, व अधिकारी श्रीवर्धन, सभासद, सर सुभेदार प्रांत पुणें व दौलताबाद, मुख्य देशाधिकारी व लेखक महालनिहाय, मुतालिक, पंत सचिव व सेनाकर्ते हे त्याच्या नांवांच्या मागचे किताब बाळाजी विश्वनाथानें कोणकोणतीं जबाबदारीचीं कामें केलीं, पेशवाई मिळण्यापूर्वी कोणकोणत्या प्रांतांत तो होता व राज्यकारभाराची त्याला कशी माहिती व अनुभव होता हें सांगण्यास पुरेसे आहेत.

मराठी राज्य बुडविण्याकरतां औरंगजेब मोठ्या सैन्यानिशीं दक्षिणेंत आला. त्याच्या या प्रचंड फौजेची छावणी भीमेच्या कांठीं बरींच वर्षें होती. संभाजीच्या वधानंतर व रायगडच्या पाडावानंतर संभाजीची बायको येसूबाई व मुलगा शाहू यांना कैद करून त्यानें आपल्या छावणींत ठेवलें होतें. त्यावेळीं अनेक प्रकारें बाळाजी शाहूच्या व येसूबाईच्या उपयोगी पडला, यामुळें शाहूचा व त्याचा जुनाच परिचय होता. बाळाजी व पुरंदरे हे दोघे मिळोन जाधवराव सेनापति याजकडील मामलती मक्त्यानें करीत असत, हजार पांचशें स्वार ते आपल्या बरोबर बाळगीत. धनाजी जाधवाचे सरंजाम व वतनें ठिकठिकाणीं होतीं. त्यांचा वसूल करून देण्याचें काम बाळाजीनें कैक वर्षें केलें. वसूल, निवाडे, बंदोबस्त, सावकारी वगैरे ज्याचीं जशीं पडतील तशीं कामें सरसुभेदार करीत असत. हीं सर्व कामें बाळाजी मोठ्या दक्षतेनें करी. बाळाजीस मोगली राज्यांतील व्यवहार स्वराज्याप्रमाणेंच माहीत होते. १७०८ मध्यें बाळाजी अमात्याचा मुतालिक होता. ताराबाईनेंही त्याला रांगण्याच्या मुक्कामीं याच कामाकरतां नेमलें होतें. राजारामाच्या वेळेपासून रामचंद्र नीळकंठ, धनाजी जाधव

ताराबाई, शाहू इत्यादी तत्कालीन मंडळींच्या तो चांगला परिचयाचा असून व्यवहारदक्ष म्हणून त्याची ख्याति होती.

" श्री उमाकांतपदांभोजमनाप्तसमुन्नतेः ।
बाळाजी विश्वनाथस्य मुद्रा विजयतेतराम् ॥ "

अशी बाळाजीची मुद्रा १७०२ व १७०३ च्या सालांच्या कागदावर आढळून येते. मोंगलांच्या कैदेंतून शाहू दक्षिणेंत आला. आपला राज्यावरला हक्क प्रस्थापित करण्याकरतां शाहूला ताराबाईच्या लोकांशीं दोन हात करावे लागले. त्या वेळीं धनाजी जाधवासारख्या शूर व कर्तबगार पुरुषाला शाहूच्या बाजूला वळविण्याचें काम बाळाजीनें केलें. शाहूचा पक्ष मजबूत करण्याच्या कामीं खंडो बल्लाळास त्यानें चांगली मदत केली. त्या वेळच्या अनेक साह्यकर्त्यांपैकीं बाळाजी विश्वनाथ हाच कर्तबगार, अनुभवी व राजनिष्ठ असा सेवक शाहूस दिसला. प्रतिपक्षांशीं झालेल्या या झटापटींत बाळाजीचें एकनिष्ठ वर्तन वेळोवेळीं शाहूच्या प्रत्ययास आलें. दक्षिणेंत स्थिरस्थावर होण्यास शाहूस पांच वर्षें लागलीं. या इतक्या दिवसांत अनेक प्रसंगीं कसून परिक्षा घेतल्यानंतरच शाहूनें बाळाजी विश्वनाथास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं व आबाजी पुरंदरे यास बाळाजीचा आपल्यातर्फे मुतालिक नेमले. बाळाजीस याप्रमाणें मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें मिळालेलीं पाहून *'कर्ता ब्राह्मण पेशवाईस योग्य' असे धन्यतेचे उद्‌गार खंडो बल्लाळानें काढले.

शाहूनें पेशवाई देऊन बाळाजीवर जो हा विश्वास टाकला त्याचें सार्थकही बाळाजीनें करून दाखविलें. दमाजी थोरातांसारख्या घरच्या शत्रूंचें पुरें पारिपत्य करून शाहूचें आसन त्यानें प्रथम दृढ केलें व मराठे सरदारांना स्वैर संचारास पाहिजे तेवढें क्षेत्र तोडून देऊन सर्वांनीं स्वराज्याच्या व हिंदुपदपातशाहीच्या हितास जपावें, हें कारभाराचें तत्त्व प्रस्थापित केलें. बाळाजीचें हें धोरण शाहूला पूर्णपणें संमत होतें. घरांतलीं भांडणें थांबवायचीं असलीं तर उत्तरेकडे हिंदुस्थानांत आपली कर्तबगारी दाखवावी व स्वराज्याचा विस्तार करावा हें धोरण या तत्त्वाच्या मुळाशीं होतें. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोडकळीस येत असलेली मोगल सलतनत आणखी कमजोर

* खंडोबल्लाळांचें चरित्र : इ. सं. मं. (य. रा. गुप्ते)

करावी व सर्व बाजूंनीं तिची सत्ता आपल्या काबूंत आणावी. या नव्या धोरणाचा पाया बाळाजी विश्वनाथानें आपल्या कारकीर्दींत रचला व त्याच्यावरच त्याच्या पुत्रपौत्रांनीं व सरदारांनीं हिंदूपदपातशाहीची भव्य इमारत रचली. बाहेरचा उद्योग यशस्वी झाल्यानेंच घरचे शत्रू नाहींसे होतील असें बाजीरावाचेंही मत होतें.

दिल्लीच्या बादशहासंबंधानें शाहूच्या मनांत पूज्यभाव होता. मोगल सलतनत तो मातेच्या ठिकाणीं मानी. या पातशाहीला धक्का न लागतां तिचा कारभार हातीं घ्यावा, असें धोरण शाहूनें पेशव्यांना आंखून दिलें होतें. पेशवाईचीं वस्त्रें मिळून बाळाजीनें आपला कारभार सुरू केला त्या वेळीं दिल्लींत सय्यद बंधूंचें प्रस्थ वाढत चाललें होतें. बादशहाला शह देण्याकरतां सय्यद बंधूंनीं दक्षिणेंत प्रबल होत चाललेल्या मराठयांचें सहाय्य घेतलें. सय्यद बंधू दिल्लींत शिरजोर बनले होते. 'कर्तुमकर्तुं शक्ति' त्यांच्या हातीं होती. कोणालाही दिल्लीच्या गादीवर बसवावें, कोणालाही गादीवरून ओढावें, ठार करावें अशी आपली ताकद सय्यद बंधूंनीं दिल्लीच्या बादशाहींत वाढविली होती. आपली ही ताकद वाढविण्याकरतां मराठयां-सारख्या उदयोन्मुख राष्ट्रवीरांची मदत त्यांना पाहिजेच होती. शाहूचें दिल्लीच्या बादशाहीवरील प्रेम दोघां सय्यद बंधूंपैकीं हुसेन अल्लीस पूर्णपणें माहीत होतें. सय्यद बंधूंपैकीं कोणालाही स्वतः बादशहा व्हावयाचें नव्हतेंच. बादशाहीचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं राहिलीं पाहिजेत, या महत्वाकांक्षेनेंच ते प्रेरित झाले होते. मोगल वंश कायम राखावयाचा, बादशाही तख्तावरील त्यांचा हक्क कायम राखावयाचा, मोगल सलतनत कायम राखावयाची, या बाबतींत मराठे व सय्यद बंधू एकमत होते. ही सलतनत कायम राखून तिच्या कारभाराचीं सूत्रें मात्र आपल्या हातीं असावीं असें दोघांनाही वाटत होतें. अशा परिस्थितींत सय्यद बंधु मराठयांना या कारभारांत अंशभागी करण्यास तयार झाले आणि हा उद्देश सिद्धीस नेण्या-करतांच हुसेन अल्लीनें शाहू व बादशहा यांच्यांत तह घडवून आणला. मराठयांशीं गोडी करून बादशहास शह देण्याकरतांच हा तह मुकर करण्यांत आला होता, हें उघड आहे.

या तहाचीं कलमें पुढीलप्रमाणें होतीं:— ( १ ) शिवाजीच्या वेळचें स्वराज्य तमाम गडकोटसुद्धां शाहूचे हवालीं करावें. ( २ ) अलीकडे मराठ्यांनीं जिंकलेले खानदेश, गोंडवण, वऱ्हाड, हैद्राबाद, कर्नाटक या भागांतले प्रदेश मोगलांनीं सोडून देऊन ते मराठ्यांच्या राज्यांत सामील करावे. ( ३ ) मोगलांच्या दक्षिणेकडील मुलुखावर चौथाई व सरदेशमुखीचें हक्क मराठ्यांनीं वसूल करावे. या चौथाईच्या बदल्यांत आपली पंधरा हजार फौज मराठ्यांनीं बादशहाचे मदतीस ठेवावी. व सरदेशमुखीचे बदल्यांत मोगलांच्या मुलुखांत मराठ्यांनीं चोऱ्या वगैरेंचा बंदोबस्त करावा. ( ४ ) कोल्हापूरचे संभाजीस शाहूनें उपद्रव करूं नये. ( ५ ) मराठ्यांनीं दरसाल बादशहास १० लाख रुपये खंडणी द्यावी. ( ६ ) आणि शाहूची मातुश्री, कुटुंब, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग वगैरे दिल्लीस कबजांत आहेत. त्यांस सोडून स्वदेशीं पावतें करावें.

लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, शाहूच्या आज्ञेनें पेशव्यानें या तहाच्या अंमलबजावणीस सुरुवातही केली. कराराप्रमाणें खंडेराव दाभाडे यांच्या आधिपत्याखालीं मराठी फौज दिल्लीकडे जाण्यास निघाली व ती औरंगाबादेस पोंचली. हुसेन अल्लीनें तहाची खबर बादशहास दिली. पण बादशहानें फर्मान देण्याचें नाकारलें. कराराप्रमाणें मराठ्यांची पंधरा हजार फौज दिल्लीस येऊं देणें, ही गोष्ट बादशहास व त्याच्या सल्लागारांस रुचली नाहीं. बादशाहीच्या संरक्षणाच्या निमित्तानें ही फौज दिल्लीस राहावयाची होती. पण ज्याचें लष्कर त्याची सत्ता. शाहू बादशहाच्या कितीही प्रेमांतला असला तरी त्याची मराठी फौज दिल्लीस येऊं देणें व तिला कायमचें राहूं देणें हें बादशहाच्या जिवावावर आलें. करार झालेला होता, व तो सय्यद बंधूंच्या मार्फत झालेला होता, तेव्हां तो पुरा करून देण्याची जबाबदारी अर्थात् सय्यद बंधूंवर होती. बादशहानें व त्याच्या सल्लागारांनीं आतां आयत्या वेळीं कितीही कां कूं केली तरी हा करार बादशहाच्या गळीं उतरवावयाचा सय्यद बंधूंनीं निश्चय केला.

सय्यद बंधूंची व बादशहाची भेट २३ फेब्रुवारी १७१९ रोजीं बादशाही वाड्यांत झाली. वाड्याच्या हमरस्त्यावर मराठ्यांच्या फौजेची गर्दी होती. सय्यदांच्या फौजाही दिल्लींत जिकडे तिकडे पसरल्या होता. हा

गोंधळ दिल्लींत पांच सहा दिवस चालू होता. बादशहाचा सरदार महंमद अमीरखान याच्या लष्कराशीं मराठयांच्या लष्कराचा सामना होऊन दोन हजार पर्यंत मराठे कापले गेले. कराराप्रमाणें बादशहा वागत नाहीं व आपल्यालाही प्रतिकार करतो, हें पाहून सय्यदांनीं बादशहास कैदेंत टाकलें व त्याच्या जागीं रफीउद्दराजत या नांवाच्या त्याच्याच घराण्यांतील पुरुषास गादीवर बसविलें. अशा रीतीनें सय्यदांनीं सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं व मराठयांबरोबर केलेले करार पुरे करण्यास ते मोकळे झाले. हातांत सत्ता आल्यावर मराठयांशीं झालेले करार त्यांनीं धाब्यावर बसविण्यास कमी केलें नसतें. अशी बेइमानी करणें हा कारस्थानी लोकांच्या हातचा मळ असतो. पण सय्यद बंधूंना तसें करणें शक्य झालें नाहीं. मराठयांची मदत झुगारून सय्यद बंधूंचें चालण्याजोगें नव्हतें हें एक व दुसरें म्हणजे बाळाजी विश्वनाथासारख्या कसलेल्या योद्धयाशीं तोंड देणें त्यांच्या आवाक्याबाहेरचें होतें.

अशा परिस्थितींत सय्यदांनीं साधा व सरळ मार्ग पत्करला. पूर्वीं झालेले करार पुरे करून मराठे सरदारांस व फौजेस परत दाक्षिणेस पाठविलें. मदनसिंग व येसूबाई वगैरे बाया मंडळी बादशहाच्या कैदेंत होती त्यांना मुक्त करून त्यांना बाळाजी विश्वनाथाचे स्वाधीन करण्यांत आलें. चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्याचे करार तर बादशाही सहीशिक्यानिशीं मराठयांचे हातीं पडले.

बादशहाच्या फौजेशीं मराठयांच्या फौजेचे दोन हात झाले त्यांत जे मराठे व ब्राह्मण सरदार कापले गेले त्यांत संताजी भोसले व बाळाजीपंत भानू मृत्यू पावले. त्यांची भरपाई व फौजेचा खर्च म्हणून बरीचशी रक्कम बाळाजी विश्वनाथानें सय्यद बंधूपासून घेतली. अशा रीतीनें दिल्लीची ही पहिली मोहीम यशस्वी करून बाळाजी ४ जुलै १७१९ रोजीं साताऱ्यास परत आला. मातुश्री येसूबाई व इतर शाहूची आप्त मंडळी त्यानें दिल्लीहून आपल्या बरोबर आणली होती. मराठयांच्या इतिहासांतील हा दिवस सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे. औरंगजेब मराठी राज्य कायमचें नेस्तनाबूद करावं म्हणून दक्षिणेंत आला. मराठयांना बादशहाच्या या प्रचंड स्वारीपुढें कांहीं वेळ हार खावी लागली.

तरी गनीमी काव्यांत निष्णात असलेल्या मराठ्यांनीं औरंगजेबालाही दे माय धरणी ठाय करून सोडलें. १७०७ त औरंगजेब निराशेच्या अंधः-कारांत चांचपडत मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर शाही फौज परत जातांना शाहूला मुक्त करण्यांत आलें. शाहूनें दाक्षिणेंतच केवळ मराठी राज्याची जमवाजमव केली असे नव्हे, तर योग्य माणसें योग्य जागीं नेमून मराठे-शाहीच्या स्वराज्यस्थापनेच्या धोरणाला नवीन वळण लावलें व खुद्द बादशहाच्या राजधानींत मराठी फौजेचा वचक बसवून हिंदुपदपातशाहीला पोषक असे करार केले व बादशहाकडून तशा प्रकारचीं सनदापत्रें मिळ-विलीं. या सर्व कामागिरीचें श्रेय दुसऱ्या कोणास नसून बाळाजी विश्वनाथा-सच दिलें पाहिजे. चौथाई—सरदेशमुखी व स्वराज्याचा सनदा म्हणजे मराठे सरदारांना-उत्तरेंतील आपली सत्ता पसरविण्याचे परवानेच होते व त्यांचा भरपूर फायदा पुढच्या कालांत मराठे सरदारांनीं घेतला.

बाळाजी विश्वनाथ या स्वारीहून परत आला तो रिक्त हस्तानें व कर्ज वाढवून आला नाहीं तर त्यानें स्वारीचा सर्व खर्चवेच भागवून तीस लाख रुपये जामदारखान्यांत भरले. याप्रमाणें बाळाजी विश्वनाथाची पेशवाईची कारकीर्द सहा वर्षांचीच खरी पण ती अत्यंत कर्तबगारीची व मराठेशाहीच्या प्रसारास उत्तेजक अशी झाली. शाहूशीं संबंध आल्यापासून बाळाजीनें जी कामगिरी केली तिचें वर्णन अगदीं थोडक्यांत करावयाचें असल्यास तें पुढीलप्रमाणें करतां येईल.* (१) कठिण प्रसंगीं त्यानें शाहूस मदत केली. (२) महाराष्ट्रीयांना नवीन उद्योगाचें पराक्रमक्षेत्र दाखवून दिलें. (३) हिंदूपदपातशाहीचा पाया घातला. आणि (४) वसुलाची व्यवस्था ठरविली.

बाळाजी विश्वनाथ २ एप्रिल १७२० रोजीं निधन पावला. शिवाजी-महाराजांप्रमाणें हा पुरुषही अकालींच वारला. मराठी साम्राज्याला एका-मागून एक कर्ते पुरुष लाभले. या पुरुषांनीं आपल्यासारखे अनेक लोकही आपल्या साथीकरतां जमा केले. शौर्य गाजविण्यांत, कारस्थानें व राजकारणें चालविण्यांत चाणक्यालाही मागें टाकण्याइतकें चातुर्य त्यांनीं दर्शविलें. पण इतकें सगळें झालें तरी यमधर्मानें मात्र त्यांना कधींच साथ दिली नाहीं. क्षय, खून, विषप्रयोग, आत्महत्या वगैरे अनेक रूपांनीं तो मराठेशाहीच्या

---

* म. रि. म. वि. १, पा. १२७.

कर्त्या पुरुषांच्या घराण्यांत शिरला व त्यानें हिंदुपदपातशाहीच्या आकांक्षांचा चक्क चुराडा उडविला.

विशेष हें कीं, या आधिदैविक व आधिभौतिक आपत्तींनाही मराठ्यांनीं तितक्याच नेटानें तोंड दिलें. बाळाजी विश्वनाथ वारल्याबरोबर बाजीरावानें पेशवाईची धुरा खांद्यावर घेतली व शिवाजी महाराजांनीं आंखलेलें व बाळाजी विश्वनाथानें पुरस्कारलेलें हिंदुपदपातशाही स्थापनेचें धोरण पुढें चालविलें. याकरतां बचावाच्या राजकारणापेक्षां चढाईचें राजकारणच त्यानें पसंत केलें. दिल्लीच्या दरवाजाला मराठी फौजा भिडवून व मोगल सलतनतीला भेदरून सोडणारें चढाईचें राजकारण बाळाजी विश्वनाथानें पुरस्कारिलें होतें. हेंच लढाऊ राजकारण बाजीरावानें मोठ्या सपाट्यानें पुढें चालविलें. आणि सुदैवाची गोष्ट ही कीं, दुय्यम पेशवा म्हणून त्याला जो भाऊ मिळाला, तोही खुद्द बाजीरावापेक्षां एक कांकणभर वरचढच मिळाला. दोघां भावांनीं दक्षिणेंत श्रीरंगपट्टणपासून उत्तरेंत दिल्लीपर्यंत सर्व हिंदुस्थान हादरून सोडलें. बाजीरावाच्या या चढाईचा झपाटा इतका जबरदस्त होता कीं, त्याच्याकडे पाहून सातारा व पुण्यांतील सनातनवाद्यांचे व बुद्रुकांचे डोळे दिपून जात. ' हा प्रसंगीं आपणासही दगा देण्यास चुकणार नाहीं, यास मोकळा सोडणें घातक आहे, असें शाहूजवळची प्रतिगामी वृत्तीची वृद्धमंडळी व आपमतलबी मंडळी त्याच्या मनांत भरवीत. फौजेच्या बळावर सर्वच सत्ता संपादन करून शाहू वगैरे सर्वांनाच तो घरीं बाजूला बसवील व सर्व हिंदुस्थानचा हा एकमेव बादशहा बनेल, असेंच या प्रतिगाम्यांना त्या वेळीं वाटत होतें.

पण खुद्द शाहू छत्रपतींना तसें कधींच वाटलें नाहीं. भट घराण्यांतील पुरुष कितीही शूर व कर्तबगार निघाले तरी छत्रपतीच्या गादीवरील त्यांची निष्ठा लवमात्रही कमी होणार नाहीं, अशी त्याची खात्री होती. बाजीरावाची दहशत साताऱ्च्या वृद्ध व प्रतिगामी कपींना बसली होती त्याचप्रमाणें दिल्लीच्या बादशहाजवळील सरदारांच्या अंगांतही बाजीरावाचे व चिमाजी अप्पाचे माळव्याकडील व हिंदुस्थानांतील पराक्रम पाहून कांपरें भरूं लागलें होतें. या दोघा बंधूंनीं माळवा प्रांतांत उडवलेली धामधूम पाहून आपल्या सरदारांस माळव्यांतून परत बोलवा, अशी विनंति बादशहातर्फे

महंमदखान बंगशानें शाहूकडे केली. त्या वेळीं 'आम्ही सर्व कारभाराची मुखत्यारी बाजीरावाकडे दिली आहे त्यांच्याशींच तुम्ही काय तें बोला, असें शाहूनें त्यास कळविलें. शाहूला बाजीरावाच्या पराक्रमाबद्दल केवढा अभिमान व त्याच्या एकनिष्ठतेबद्दल केवढा विश्वास वाटत होता! शूर कर्त्या पुरुषाकडून कामगिरी अपेक्षित असल्यास त्याला अशीच कुलमुखत्यारी द्यावी लागते.

१७२० सालीं बाजीरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. त्यानंतरच्या पहिल्या दहा वर्षांत बाजीरावानें जी अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली ती म्हणजे निजामाची पूर्णपणें रग जिरवणें ही होय. निजामाशीं गोडीनें घ्यावें, असें शाहूला नेहमीं वाटत असे. त्याला असें कां वाटत असे, हें सांगणें कठिण आहे. पण शाहूच्या या मऊपणामुळें बाजीरावाला या निजामाच्या बाबतींत चढाईचें धोरण स्वीकारणें, थोडेंसें कठिण गेलें. बाजीरावानें १७२६त श्रीरंगपट्टणपर्यंत चढाई केली पण शाहूच्या या धोरणामुळें बाजीरावाला कर्नाटकांत पाय रोवतां आला नाहीं.

हैद्राबादचा निजाम अत्यंत कावेबाज होता. दक्षिणेंतील आपला सुभा म्हणजे हिंदूंचेंच राज्य आहे, असें तो सर्वांना भासवीत असे व शाहूच्या प्रतिपक्षांशीं संगनमत करून आपली गादी सुरक्षित राखण्याच्या तो खटपटींत असे. निजामानें कोल्हापुरच्या संभाजीशीं संधान बांधलें व त्याला साताराची गादी मिळवून देण्याची लालूच दाखविली आणि दोघांनीं मिळून शाहूच्या राज्यावर चालून जाण्याचा बेत केला. निजामाचें हें कपट कारस्थान शाहूच्या नजरेस आलें त्या वेळीं खुद्द त्यानेंच निजामाच्या बाबतींत असलेलें मऊपणाचें धोरण सोडून निजामाचें पारिपत्य करण्याकरतां सर्व गडकऱ्यांनीं सावध राहून आपापला बंदोबस्त राखण्याबद्दल तांतडीचे हुकूम सोडले.

संभाजी, निजाम व शाहूवर नाराज असलेले मराठे सरदार एकजुटीनें साताऱ्यावर चालून आले. मराठी राज्यावरील हें एक मोठेंच संकट होतें. पण त्या वेळीं धीर न सोडतां बाजीराव व चिमाजी या दोघां बंधूंनीं निजामावर इतक्या शिताफीनें मोहीम उठविली कीं, निजामाला या दोघांच्या तडाक्यापुढें पालखेड येथें हार खावी लागली. असल्या संकटप्रसंगीं पेशवे घराण्यांतील या तरुण पोरांनीं—कारण बाजीराव या वेळीं ऐन पंचविशीच्या भरांत होता आणि

चिमाजीचें वय तर अवघें सतरा वर्षांचें होतें—आपली बाजू संभाळलेली पाहून या घराण्याच्या कर्तबगारीवर शाहूचा कायमचा विश्वास बसला व या दोघां बंधूंच्या हालचालींच्या बाबतींत तर यापुढें तो मुळींच ढवळाढवळ करीनासा झाला.

पालखेडच्या पराभवानंतर निजामानें मुंगी शेवगांव येथें पेशव्यांशीं तह केला. या तहांत मोगलांच्या सहा सुभ्यांवर मराठयांचे हक्क पूर्ववत् सुरळित चालावे व या हक्कास हरकत न यावी म्हणून ठिकठिकाणच्या तटबंदीच्या जागा मराठयांच्या हवालीं कराव्या, या अटी निजामानें कबूल केल्या. संभाजीस पेशव्यांचे हवालीं करावें, अशी एक अट या तहांत होती; पण ती त्यानें मान्य केली नाहीं व या बाबतींत शाहूनेंही फारसा आग्रह धरलेला दिसत नाहीं.

निजामाचें हें प्रकरण आटपल्यानंतर बाजीरावानें माळव्याच्या स्वारीकडे पुन्हां लक्ष घातलें. चिमाजीनें १७२६ त माळव्यांत धामधूम उडविली व लगेच त्यानें गुजराथेकडे आपला मोर्चा वळविला व सरबुलंदखानास जेरीस आणून त्याच्याकडून गुजराथ प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीचे हक्क करार करून घेतले.

अशा धामधुमीच्या कालांतच म्हणजे १७३० आगस्टच्या पांचव्या तारखेस सदाशिवराव भाऊंचा जन्म झाला. चिमाजीची बायको रखमाबाई वरील दिवशीं प्रसूत झाली, भाऊसारख्या पुत्ररत्नाला तिनें जन्म दिला. पण त्याचें कोडकौतुक करायला ती जगली नाहीं. सदाशिवराव २५ दिवसांचा असताच ती त्याला सोडून गेली. याप्रमाणें जन्मल्याबरोबर थोडक्याच दिवसांत मातृसुखाला व मातृप्रेमाला अंतरलेलें हें बाळ बाजीरावाची बायको काशीबाई इनेंच अर्थात् वाढविलें. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट ही कीं, बाळाजी विश्वनाथाची बायको राधाबाई म्हणजे सदाशिवरावभाऊची आजी या वेळीं जिवंत होती व गृहकृत्यांत अत्यंत दक्ष असलेल्या या अनुभवी आजीच्या नजरेखालींच सदाशिवरावभाऊ वाढत होता.

भाऊसाहेबांच्या जन्मानंतर अवघ्या तीन वर्षांनीं रघुनाथरावांचा जन्म झाला ( १ आगष्ट १७३४ ). बाजीरावाचा पहिला मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब याचा जन्म १२ डिसेंबर १७२१ रोजीं झाला म्हणजे भाऊसाहेब जन्मले त्या वेळीं त्यांचें वय १० वर्षांचें होतें आणि

बाजीरावाचा तिसरा मुलगा जनार्दनपंत १७३३ सालीं जन्मला. याप्रमाणें पेशव्याच्या घरांत बाजीरावाच्या कारकीर्दीत १०।५ वर्षांचें अंतर असलेलीं हीं मुलें लहानाचीं मोठीं होत होतीं आणि या सर्वांवर बाळाजी विश्वनाथाची बायको राधाबाई—या सर्व मुलांची आजी—त्यांच्या जीवनाला वळण लावीत होती. यांपैकीं नानासाहेबच काय तो थोडासा वयानें मोठा होता. पण त्याचेंही शिक्षण राधाबाईच्या देखरेखीखालींच चालू होतें.

बाळाजी विश्वनाथाची बायको राधाबाई ही नेवऱ्याच्या बर्वे घराण्यांतील होती. गृहकृत्यांत व बाहेरच्या व्यवहारांत अत्यंत हुशार म्हणून नांवाजलेली अशी ही स्त्री होती. पेशव्यांच्या घरांत सुनांवर, मुलांवर व कुटुंबांतील इतर मंडळींवरही तिची विशेष जरब होती. तिला लिहितां वाचतां चांगलें येत होतें. पेशवा बाजीराव व त्याचा भाऊ चिमाजी हे तर नेहमींच स्वारीवर असत. त्यांच्या गैरहजेरींत पुण्यांतील बहुतेक सर्व कारभार ही बाई मोठ्या दक्षतेनें चालवी. अनेक सामाजिक व कौटुंबिक बाबतींत ती स्वतः मुखत्यारीनें वागे.

या सामाजिक बाबतींत भटाभिक्षुकांचें स्तोम माजलेलें तिला बिलकुल खपत नसे. एकदां पटवर्धनांच्या घरांत काम करणारी एक बाटिक महार जातीची आहे असें बाहेर आलें. भिक्षुकांना ही चांगलीच संधि सांपडली. पटवर्धनांचें संबंध घराणेचें घराणें बहिष्कृत करण्याचा त्यांनीं घाट घातला. त्या वेळीं या बाईनीं स्वतः पुरस्कार घेऊन व पटवर्धनांना योग्य तें प्रायश्चित्त देववून त्यांना बहिष्कृत होऊं दिलें नाहीं. पूर्वीप्रमाणें जातींत घेतलें व भिक्षुकांचें व ब्राह्मणांचें कारस्थान हाणून पाडलें.

ही बाई काशीयात्रेला गेली त्या वेळीं महाराष्ट्रीय ब्राह्मण व इतर ब्राह्मण यांच्यांत भेदाभेद न करतां नारायण दीक्षितासारख्या पेशव्याच्या गुरुस्थानीं असलेल्या त्या उपाध्यायाशींही तिनें निस्पृहपणाचें व निर्भीडपणाचें वर्तन केलें. या बाबतींत नारायण दीक्षित यांचें खालील पत्र वाचनीय आहे. नारायण दीक्षितानें हें तक्रारपत्र बाजीराव बल्लाळ व चिमाजी अप्पा यांचेकडे पाठविलें आहे ! पत्र ता. २६।१२।१७३५ चें आहे.—

"मातुश्री राधाबाई कार्तिक शुद्ध द्वादशीस श्रीस आली. त्रयोदशीपासून तीर्थविधी आरंभला. तो सर्व करून पौष्य वद्य पंचमीस स्वार होऊन

गयेस गेली. येथें जो धर्म जाहाला तो पत्रीं लिहितां येत नाहीं. परस्पर लोक सांगतां कळों येईल. आम्हांस पुशिले परन्तु नाहीं. पंचविसातीसामध्यें तर उत्तम धर्म होता, लोकोत्तर कीर्त होती. परंतु ईश्वरास कर्तव्य तें जाहालें. महाराष्ट्र ब्राह्मणास येक कपर्दीक कोणास पावली नाहीं व येक कराडो बायको महादाजी पंताची माय आली होती तिनें आपले ज्ञातीस सर्वांस दाहा दाहा रुपये दिले. वरकड सर्व ज्ञातीवर तीन तीन रुपये पावले, हे तुम्हास परस्पर कळेलच. यानंतर बाईचा धर्मामध्यें आपण मन घालून धर्म करवावा तर आपणास काशी सोडून देशास जावे लागेल. यास्तव आपण बोललो नाहीं."

ब्रह्मेंद्र स्वामींचें प्रस्थ बाजीरावाच्या कारकीर्दींत बरेंच माजलें होतें. राजघराण्यांतल्या व सरदार घराण्यांतल्या बऱ्याच स्त्रिया या स्वामीच्या भजनीं लागल्या होत्या व त्याच्याशीं संगनमत करून सावकारीही करीत होत्या. पण या भोळ्या व भाबड्या स्त्रियांच्या यादींत राधाबाईचें नांव आढळत नाहीं आणि या बाईच्या शिकवणीचा परिणाम म्हणूनच कीं काय सदाशिवराव भाऊचें व नानासाहेबांचें या स्वामींशीं कधींच पटत नसे.

राधाबाई राजकीय बाबतींतही दूरवरचें धोरण आंखणारी दूरदर्शी बाई होती. काशीयात्रेला जातांना वाटेंत रजपुतांच्या मुलखांतून ती गेली. जयपुरास ती सवाई जयसिंगाची पाहुणी होती. त्यानें राधाबाईचा पाहुणचार अत्यंत प्रेमानें व आदरानें केला. सवाई जयसिंगानें आपली मुलगी राधाबाईच्या मांडीवर ठेविली. त्या वेळीं ही मुलगी आपली झाली, असें बोलून दाखवून पेशवे घराण्यांतील कोणीही पुरुष जयपूरच्या राज्यास कधींही त्रास देणार नाहीं, उलट या राज्याचें संरक्षण करण्यासही तयार राहील, असें आश्वासन बाईनें सवाई जयसिंगास दिलें.

अशा या सर्वतोपरी कर्तृत्ववान, हुशार, राजकारणी, दूरदर्शी, वृद्ध व अनुभवी स्त्रीच्या शिक्षेखालीं भाऊसाहेब मोठा होत होता.

मुलांचें संगोपन, त्यांचें शिक्षण, पेशव्याच्या घरांतील देवतार्चन व त्या संबंधाचीं धर्मकृत्यें, दानधर्म, ब्राह्मणभोजनें, लग्नकार्यें इत्यादी सर्व व्यवहारांवर राधाबाईची देखरेख होती व तिच्या आज्ञेबाहेर जाण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. पर्वती मंदिराचीं कामें, इनामें, बाक्षिसें वगैरे बाबतींतही

बाजीराव आपल्या आईचा वारंवार सल्ला घेत असे. नानासाहेब, भाऊसाहेब, रघुनाथराव, जनोबा या सर्वांना या बाईचीच शिक्षा होती. नाना, भाऊ, रघुनाथ व जनोबा या सर्व मुलांना राजकारणाचें शिक्षण मिळावें, राज्यकारभाराचें अंग त्यांना प्रत्यक्ष अवगत व्हावें, म्हणून वर्षांतून मधून मधून या सर्वांना आळीपाळीनें साताऱ्यास शाहूपाशीं ठेवण्याचा प्रघात या बाईनेंच पाडला होता. या प्रघातामुळें पेशव्याचीं हीं हुशार मुलें राज्यकारभारांत लहानपणापासूनच लक्ष घालूं लागलीं. सातारा हें मराठेशाहीचें त्या वेळचें मुख्य केंद्र होतें. सर्व राजकारणें या ठिकाणींच शिजत. यामुळें पेशव्यांच्या कारभाराला व धोरणाला अनुकूल कोण, प्रतिकूल कोण, कोणाचें कसें धोरण, कोणाचे कसे डावपेंच, याची खडानखडा माहिती या मुलांना साहजिकच होत होती. या परिस्थितीचा फायदा नानासाहेबानें व भाऊसाहेबानें अर्थातच घेतला.

मोडी बालबोध वाचन, हिशेब लिंहिणें, संस्कृत भाषेचें अध्ययन, घोड्यावर बसणें, हे त्या वेळच्या शिक्षणाचे मुख्य विषय होते. आणि या शिक्षणाला वयाच्या पांच सहा वर्षांपासूनच सुरुवात होत होती. या शिक्षणक्रमांत सदाशिवराव भाऊ, रघुनाथराव व जनोबा यांचा कसा प्रवेश होत चालला होता, त्यांचें संस्कृतचें अध्ययन कितपत झालें होतें, त्यांचा नित्यक्रम कसा होता व या मुलांना वडील माणसांची शिकवण कशी होती, हें नानासाहेबानें ९ जुलै १७४२ रोजीं रघुनाथरावस लिहिलेल्या पुढील पत्रावरून चांगलें समजून येतें. नानासाहेबाचें वय या वेळीं २१ वर्षांचें होतें. पण ज्या अधिकारवाणीनें नानासाहेबानें हें पत्र लिहिलें आहे त्यावरून त्याच्याही शिक्षणाची कल्पना आल्यावांचून राहात नाहीं.

नानासाहेबानें रघुनाथरावास पत्र पाठविलें ( ९ जुलै १७४२ ) त्यावेळीं रघुनाथराव आठ वर्षांचा होता. भाऊचें वय त्या वेळीं १२ वर्षांचें होतें. हें पत्र म्हणजे त्या वेळच्या गृहशिक्षणाचा एक नमुना आहे.

" चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान उपरि विशेष. येथून जाते समयी जें सुचलें तें तुम्हास सांगितलें आहे, त्याचें स्मरण निरंतर मनांत असूं देत जाणे. रघुवंश, विदुर नीति, चाणक्य व जे तुम्हास येत असेल, त्याची नेमपूर्वक चिंतनिका करून थोडेंबहुत शास्त्री

याजवळ नित्य म्हणत जाणें. विराटपर्वापासून पढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. केवळ घोडी फेरावयाचे छंदास न लागणें, वजनी, कैली, बेरीज बराबर करावयाचा सराव बहुत करणें. चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें. जे आज्ञा करतलि तेंच काम करावे. बहुतकरून भाऊबरोबर जेवीत जाणें. घोडी वेगळीं बांधीत न जाणे. क्षुद्र मनुष्याशीं सहवास कोणे प्रकारेंही न करणें. मातुश्री बाई (राधाबाई), ताई (काशीताई), अनुबाई याशी एक दो दिवशीं अर्ध घटकाभर जाऊन बसत जाणें. शरीर प्रकृति नीट नाहीं यास्तव औषध कांहीं नेमेंकरून घेत जाणें. भाऊसमागमें घोडीं फिरावयास जात जाणें. सातारियास जर जावयाची आज्ञा केली तर चिमणगिरी गंगाधर भटास व भाऊ जवल विनंती करून, बरोबर दिल्हे तर घेऊन जाणें. सातारियास गेल्यावर दोही बाईकडे विना बोलाविल्यावांचून गोविंदराव यांनीं सांगितल्यावांचून न जाणें, कालानुरूप वयास उचित, योग्य वेष करीत असावे. देवपुजा थोडी परंतु एकांति न बोलतां करीत जाणें. इतकेंही नेमे करून करावे, आणि गर्व न करावा. निरंतर साधन वृत्तीनें वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावे. सर्व जें मनें करून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुसावे शिष्य धर्म असलिया फार उपयोग आहे. चिरंजीव जनार्दन बहुत कामही करून पढतात ते हर एक गोष्टींत अधिक जाहल्यास तुम्ही त्यास मान्य पुरुष कसे व्हाल ? विशेष काय लिहिणे. येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचवीसा दिवसांत पावलो. श्रीकृपेनें मेहनत करून दिल्लीचे सुमारे जात आहों. जसें पुढील वर्तमान होईल तैसी योजना होईल. हे आशिर्वाद. *

नानासाहेबानीं रघुनाथरावास हें पत्र लिहिलें त्या वेळीं रघुनाथराव अवघा आठ वर्षांचा होता व भाऊसाहेब त्याच्याहून चार वर्षांनीं मोठा होता. रघुवंश, विदुरनीति, चाणक्यनीति यांचे अध्ययनाचा व त्यांच्या चिंतनिकाचा या पत्रांत उल्लेख आहे. तसेंच विराटपर्वापासून पुढें भारत वाचण्याचा उपदेश केला आहे यावरून तत्कालीन सरदार घराण्यांतील मुलांना कोणत्या प्रकारचें शिक्षण देण्यांत येत होतें, राजकारणांत व मुत्सद्दीगिरींत तीं तरबेज झालीं पाहिजेत, इकडे वडील मंडळींचें कसें लक्ष होतें.

—* राजवाडे खंड १. पान १६.

त्या प्रमाणेंच भारत रामायणांतील शूर पुरुषांचीं चरित्रें हीं मुलांच्या डोळ्यापुढें ठेवून त्यांच्या ठिकाणीं स्वधर्माभिमान व स्वसंस्कृतीचा अभिमान उत्पन्न व्हावा, शौर्यधैर्याचे गुण त्यांच्यांत वृद्धिंगत व्हावे, याची काळजीही घेण्यात येत होती हें समजण्यासारखें आहे. 'भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें, जे आज्ञा देतील ते काम करावे, बहुतकरून भाऊबरोबरच जेवीत जाणें' या उल्लेखांवरून भाऊसाहेब त्या वेळच्या सर्व शिक्षणक्रमांत तरबेज झाला होता, इतकेंच नव्हे तर धाकट्या भावांनीं त्याच्या आज्ञा मानाव्या, त्याच्या वर्तनाचें अनुकरण करावें, इतकें त्याचें आचरण शुद्ध होतें हेंही प्रत्ययास आल्यावांचून रहात नाहीं. भाऊसाहेबांची लहानपणची हुशारी पाहून नानासाहेबांचीं भाऊवरच विशेष मर्जी होती व या वयांत त्याच्यावर जबाबदारीचीं कामेंही नानासाहेब टाकूं लागला होता.

भाऊसाहेबाचा जन्म पेशवाईच्या ऐन धामधुमीच्या कालांत झाला. तसेंच त्याच्या बालपणाचीं वर्षें हीं अशाच धामधुमीच्या घटनांनीं भरलेलीं होतीं. भाऊसाहेबांचे वडील चिमाजी हे दुय्यम पेशवे व बाजीरावाचा कारभार संभाळण्याकरतां त्यांची नेमणूक शाहूनें केलेली होती. पण आपला हा कारभार यशस्वी रीतीनें संभाळून चिमाजी अप्पा बाजीरावाच्या बरोबरीनें मराठी राज्याच्या म्हणजे हिंदुपदपातशाहीच्या वाढीच्या कामीं भाग घेत होता. बाजीरावाच्या कारकीर्दींतील अशी कोणतीही मोहीम नाहीं कीं, ज्यांत चिमाजीनें भाग घेतला नाहीं किंवा बाजीरावानें काबीज केलेला मुलूख सुव्यवस्थित राखण्यासाठीं किंवा तेथील कारभाराची व्यवस्था करून देण्यासाठीं चिमाजी झटला नाहीं. पेशव्याच्या घराण्यांतील मुलांचें शिक्षण त्यांना थोडेंसें समजूं लागतांच सुरू होत होतें. रघुनाथराव केवळ आठ वर्षांचा असतांना त्यानें कोणकोणत्या विषयांत प्राविण्य संपादन केलें होतें, हें वर उद्धृत केलेल्या पत्रांवरून सहज समजण्यासारखें आहे. हें पत्र १७४२ सालचें आहे. भाऊसाहेब त्यावेळीं बारा वर्षांचे होते. म्हणजे बाजीरावाची ऐन धामधुमीची कारकीर्द त्याच्या बालमनावर अनेक प्रकारचे तेजस्वी संस्कार करीत चालली होती.

बाजीरावानें आज गुजराथवर स्वारी केली. उद्या तो माळव्यांत अवतरला व परवा त्यानें आपला मोर्चा दिल्लीकडे वळविला. दिल्लींत मिळविलेलें

यश पूर्णपणें पदरीं पाडून घेण्याकरतां भोपाळपर्यंत त्यानें निजामाची ससेहोलपट केली व तेथें त्याचा पूर्ण पराभव करून दिल्लीच्या बादशहाशीं केलेला करार पुरा करून घेतला. अशा या धामधुमीमध्यें भाऊसाहेबाच्या बाल मनावर परिणाम करणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या तीन घटना त्याच्या बाल-वयांत घडून आल्या. एक बाजीरावाची दिल्लीवरील मोहीम, दुसरी शाहू महाराजांची मिरजेवरील स्वारी व तिसरा व सर्वांत महत्त्वाचा प्रसंग म्हणजे चिमाजी अप्पाची वसईवरील मोहीम.

१७३५–३६ त बाजीरावानें हिंदुस्थानांत स्वाऱ्या करण्यास आरंभ केला. बाजीराव या वेळीं नेहमींप्रमाणें पैशाच्या अडचणींत होता व ब्रह्मेंद्र-स्वामींना या आपल्या आपत्तीसंबंधानें दीनवाणीनें तो पत्रावर पत्रें पाठवीत होता. पण हातीं घेतलेल्या मोहिमेंतील त्याचा आवेश मुळींच कमी झाला नव्हता. बाजीरावावरील कर्जाचा एकूण आंकडा साडेचार लाखांचा होता. त्यापैकीं तीन लक्ष रघुनाथ भट पटवर्धन यांचें व एक लक्ष पांच हजार ब्रह्मेंद्र-स्वामीचें व छत्तीस हजार बाबूजी नाइकाचें. या कर्जास व्याजाचा दर दर-महा दरशेंकडा एक रुपयापासून अडीच रुपयांपर्यंत लावलेला आढळतो. बाजीरावानें निर्माण केलेले सरदार व त्यांचे रामचंद्रबाबा शेणोलीकरासारखे कारभारी गडगंज पैसा मिळवीत होते. पण बाजीरावाकडे पहावें तर तो सारखा कर्जात बुडालेला असायचा. गुजराथ, कर्नाटक, कोंकण, माळवा, दिल्ली वगैरे प्रांतांवर बाजीराव व चिमाजी यांच्या मोहिमा चालू होत्या, या दोघा बंधूंना अपयश काय असतें, हें माहीतही नव्हतें. मोहिमा यशस्वी करायच्या, मुलुख ताब्यांत घ्यावयाचे, चौथाई सरदेशमुखी वसूलही करायची, पण स्वारीचा खर्च भागायचा नाहीं. पैशाची तंगी कायम राहायची कर्ज मिळवितां मिळवितां बाजीरावास नाकीं नव यावयाचे हें असें कां, याची चर्चा बाजीरावाच्या कारकीर्दीपासून पेशव्यांच्या घराण्यांत चालू होती. कारभाराची व्यवस्था अशा पायावर रचली पाहिजे कीं, ज्यामुळें मध्यवर्ति सरकारला व त्यानें ठेवलेल्या खड्या फौजेला पैशाची कमतरता पडता कामा नये. या गोष्टी-मुळेंच पेशव्यांच्या सर्व मुलांपैकीं भाऊसाहेबांचें लक्ष हिशेबी कामाकडे जास्त वळलें. मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, पिलाजी जाधव, दाभाडे, पवार, नागपूरकर भोसले, गोविंदपंत बुंदेले, हिंगणे व अंताजी माणकेश्वर हे

सरदार अलोट पैसा मिळवितात व मध्यवर्ति सरकारचा खजिना रिकामा राहतो याचा सरळ अर्थ असा कीं, हे सरदार कराराप्रमाणें आपल्या वाटणीचा पैसा सरकारांत भरीत नाहींत. मुलुखगिरी तर केलीच पाहिजे पण त्याचबरोबर सरकारी हिशेबाचें दप्तर चोख ठेवून सरदारांकडलि येणें वसूल करण्याची योग्य व्यवस्थाही झाली पाहिजे. या विचारांनीं भाऊसाहेबांच्या बालमनावर पगडा बसविला. व त्यामुळेंच लेखणी व तरवार दोन्ही चालविण्यांत भाऊसाहेब वाकबगार झाला.

१७३७ त मजलावर मजला मारून बाजीराव दिल्लीकडे चाल करून गेला, फत्तेपुर सिक्री व दीग यांच्या दरम्यान मोंगल फौजांना झुकांड्या देऊन तो दिल्लीदरवाजापर्यंत जाऊन पोंचला. मराठे दिल्लीवर चालून आले व आतां ते आंत घुसतात असें पाहून दिल्लींतील सर्व जनता घाबरून गेली व मोंगल राजधानीच्या रस्त्यांवर पळापळ सुरू झाली. बाजीरावानें मनावर घेतलें असतें तर त्यानें यावेळीं दिल्ली काबीजही केली असती. पण तसें न करता दिल्लीदरवाज्याजवळ गेलेली आपली फौज मागें घेऊन दिल्ली-पासून सात मैलावर त्यानें आपल्या फौजेचा तळ दिला व दिल्लीच्या जन-तेला व खुद्द बादशहाला निर्धास्त केलें.

शिवछत्रपतींनीं हिंदुपदपातशाहीच्या स्थापनेस आरंभ केला. शाहूनें व बाळाजी विश्वनाथानें या ध्येयाचा पुरस्कार केला. प्रथम बाळाजी विश्वनाथ व त्यानंतर बाजीराव यांनीं खुद्द दिल्लीवर आपल्या ढाला रोवल्या. बाळाजी विश्वनाथाला त्या वेळीं दिल्ली काबीज करणें शक्य नव्हतें. पण बाजीरावाला तें शक्य असूनही त्यानें ती गोष्ट अमलांत आणली नाहीं. तेजस्वी परंपरेंत वाढलेल्या व इतिहास व राजकारण कळूं लागलेल्या भाऊच्या मनाला या गोष्टीचा अचंबा वाटणें साहजिक होतें. बादशाही बुडवायची नाहीं म्हणजे अर्थातच दिल्ली आपल्या काबूंत घ्यावयाची नाहीं, हें ओघानेंच आलें. बादशाही बुडवावयाची नाहीं पण तिच्या कारभाराचीं सूत्रें मात्र हातीं घ्यावयाचीं, या शाहूच्या धोरणाप्रमाणें बाजीरावाला वागावें लागलें. हिंदु-पदपातशाहीच्या स्थापनेचें व हिंदुस्थानभर तिची सत्ता पसरविण्याचें बाळ-कडू पाजलेल्या भाऊच्या बालमनाला इतकें गुंतागुंतीचें राजकारण पटणें शक्य नव्हतें. प्रसंग आला तर आपण दिल्ली काबीज केल्याशिवाय राहाणार

नाहीं, असेंच या वेळीं भाऊसाहेबांच्या मनानें ठरविलें असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं.

दिल्लीची ही मोहीम भोपाळ येथें निजामाचा पराभव झाल्यावरच खरीखुरी संपली व दुराईच्या तहांत माळवा व नर्मदा व चंबळा यांमधील मुलूख, या दोहोंबद्दल बादशाहीची सनद मिळवून देण्याचे आणि मराठ्यांच्या खर्चाचे पन्नास लाख रुपये बादशहाकडून वसूल करून देण्याचें निजामानें कबूल केलें.

भोपाळच्या संग्रामांतील यशाचें श्रेय बऱ्याच अंशीं चिमाजी अप्पास दिलें पाहिजे. उत्तरेच्या मार्गावर तापी नदीच्या कांठीं चिमाजी अप्पा बंदोबस्तानें ठासून बसला होता. औरंगाबादेहून निजामाकडे जाणाऱ्या फौजेस त्यानें अडवून ठेवलें व रघूजी भोसले व दाभाडे सेनापति यांच्या हालचालींवर नजर ठेवून बाजीरावाचा पाठपुरावा केला म्हणूनच बाजीरावाला निर्धास्तपणें निजामास पालथें पाडतां आलें. कठिण प्रसंगांत साहसानें, धैर्यानें उडी घालणें, घोड्याला बेफाम उधळावयास लावून त्यावर स्वारी चढविणें, हे बाजीरावाच्या आंगचे गुण भोपाळच्या लढाईत निदर्शनास आले.

दिल्लीची मोहीम, भोपाळचा विजय व या दोन्ही प्रसंगीं बापानें व चुलत्यानें केलेल्या पराक्रमाचीं वर्णनें वाचून भाऊसाहेबाचें बालमन थरारून गेलें असेल. भारताच्या युद्धपर्वांतील भीमार्जुनांच्या शौर्याच्या प्रसंगापेक्षांही या पेशवे बंधूंच्या पराक्रमानें भाऊसारख्या पेशव्याच्या घराण्यांतील मुलाच्या बालमनाचा कबजा घेतला असल्यास त्यांत कांहींच नवल नव्हतें.

इकडे बाजीराव व चिमाजी दिल्लीच्या मोहिमेंत गुंतले होते तर याच कालांत म्हणजे १७३७ ते १७३९ या दोन वर्षांत खुद्द शाहूनें मिरजेवर स्वारी करून ती काबीज केली. शाहूची ही मोहीम बादशाही थाटाची होती. गनीमी कावा करून शत्रूस जेरीस आणावयाचें व मुलुखगिरी करावयाची हें आजपर्यंतचें मराठ्यांचें धोरण शाहूनें या स्वारींत अजीबात बाजूला ठेवलें व दिल्लीच्या बादशहाप्रमाणें आपल्यालाही अशा बादशाही स्वाऱ्या करतां येतात हें दाखविण्याकरतांच कीं काय शाहूनें या मोहिमेला पुण्याहून अत्यंत थाटानें सुरुवात केली. ही मोहीम तब्बल दोन

वर्षे चालू होती. या मोहिमेंत नानासाहेबाला शाहूनें बरोबर घेतलें होतें. भाऊसाहेब या स्वारींत होते याबद्दल कोठें पुरावा सांपडत नाहीं. तथापि या स्वारीचें जें वर्णन इतिहासांत नमूद आहे तें वाचण्यालायक असून बाल भाऊसाहेबाच्या शूर मनाला तें उद्दीपित करणारें होतें यांत शंकाच नाहीं.

शाहूची ही स्वारी त्याच्या ऐश्वर्याची निदर्शक आहे. शाहूनें लहानपणीं औरंगजेबाच्या स्वारीचा थाट पाहिला होता, पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत मराठेशाहीच्या वैभवाचा कळस झाला. त्याच्या सरदारांस हिंदुस्थानांत सर्वत्र विजय मिळत गेले. या भाग्यशालित्वाचें निदर्शक म्हणून औरंगजेबाप्रमाणें आपल्या चतुरंगदळासह थाटानें स्वारीचा समारंभ करावा असें शाहूच्या मनांत येणें स्वाभाविक आहे. लहानपणचे संस्कार संधी आली, कीं, बाहेर वाट काढूं पहातात त्यांतलाच हा प्रकार होता. शाहूच्या स्वारीचें वर्णन असेंच हृदयंगम असून हिंदुपदपातशाहीच्या अभिमानी मनाला उचंबळून सोडणारें आहे. या स्वारीचें वर्णन इतिहासकारांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे. "कूच करणें तें दोन तीन कोसांचें करावें ऐसें केलें, आणि सुमुहूर्तें डेरेदाखल झाले. पागा हुजुरात सर्व तयारी करून उतरले. तोफखाना तयारी होऊन काढिला व सर्व सरदारांस आले तालुके व मसलतीचे बंदोबस्त राखून पांच, चार, दोन हजार फौजेनिशी ज्याचें त्याप्रमाणें बरोबर यावे असे नेमून दिल्याप्रमाणें उतरले. त्यास मिसलीस राहाण्याचे व मुख्य स्वारी चालण्याचे निर्बंध नेमून दिले. सेनाधुरंधर व सेनासाहेब सुभा भोसले यांस अघाडीस नेमले. प्रतिनिधी व मुख्य प्रधान अमात्य सचिव मंत्री यांचे उजवे बाजूस मिसल नेमले. पंडितराव सुमंत व न्यायाधिश यांस डावे बाजूस नेमून दिलें. चिटणीस, पोतनिस वगैरे कारकुन मंडळी जामदारखान्यालगत उजवे बाजूस नेमले. फडणीस व दप्तरकोटी वगैरे डावे बाजूस नेमले. सोयरे लोक मानकरी व फत्तेसिंग भोसले उजवे बाजुस नेमले. पिछाडीस सरलष्कर व त्याचे निसबतीचे सरंजामी हे नेमले. डेऱ्यापुढें व शागीर्द पेशा लोक वगैरे जिकडील तिकडे मिसली नेमुन दिल्या. सर्वांनीं स्वारींत आपापले मिसलींत चालावें, गलबला कांहीं एक होऊ नये. पातशाही स्वारींत महाराज होते त्याअन्वये सर्व मातबर मुत्सद्दी प्रधान व

सरदार यांनीं अंबाऱ्यांत बसोन, सरकारचे पाठीमागे जनानखाना, त्यामागे चाळीस पन्नास अंबाऱ्या चालाव्या. पुढें तोफखाना, त्यापुढें ढाला व निशाणें व त्यापाशीं गारद व करोल व पागा चालावी. सर्वांपुढें बिनीवाले सेनाधुरंदर यांनीं चालावें. निशाणामागें अघाडीचे सरदार यांचे लोक चालावे. त्यामागें जिलीब नानाप्रकारचीं रणवाद्यें, त्यामागें जिलबीचे हत्ती, घोडे, रथ, सांडणी यांनीं चालावे. त्यामागे नगारखाना, शहाजाने, त्यामागे वाजंत्री व घाडी व त्यामागे चोपदार भालदार चालावे. वाटेनें सक्के (पाणी शिंपणारे) व पखाला यांनीं पुढे शिंकाव करीत असावा. या प्रमाणें दोन तीन कोस चालून डेरेपर्यंत कोरबंदीचे लोक म्हणजे सलामींचे स्वार यांचे मुजरे घेत जावे. याप्रमाणें मजला करून उंबरज मुक्कामीं आले...श्रीपतराव प्रतिनिधींनीं आज्ञाप्रमाणें उदाजी चव्हाणावर जाऊन त्यास जरब दिली व चव्हाणास घेऊन महाराजापाशीं आले. दुसरे वर्षी तोफखाना व सामान देऊन, मिरजचें ठाणें मोगलाकडे होतें तें घ्यावें म्हणोन त्यास रवाना केले. बाहिरोपंत पिंगळ्याचे चिरंजीव आबाजीराव पेशवाई काढली म्हणोन उद्विग्नता वागवीत होते, त्यांची परीक्षा पाहाणें म्हणोन संताजी डुबल यास बरोबर देऊन तीस हजार फौजेसहित रवाना केले. त्यांनीं जाऊन किल्ल्यास शह दिला. परंतु किल्ला लांबणीत व बांधणींत मजबूत इलाज न चाले. यामुळें प्रतिनिधींस आज्ञा केली कीं, उद्या हल्ला चढवून किल्ला घ्यावा. दुसरे दिवशीं जोराचा हल्ला केला. ईशान्येकडील बुरूज तोफा लावून ढळला. निशाण लावून किल्ला घेतला. शेपन्नास मेले. पांच पन्नास जखमी झाले. तें जाऊन मोर्चेबंदी करून तोफा लावून मारगिरी केली. यावरून किल्ला तहास येऊन ता. ३ आक्टोबर स. १७३९ रोजीं दिला. यावरी महाराजांची स्वारी किल्ला पहाण्यास गेली. धूळगांवचा बाळोजी बिन शिवाजी साळुंके ऊ. डुबल पटवर्धनांचे पदरीं होता, त्याजकडे मिरजेचें ठाणें देऊन किल्ल्याचा व प्रांताचा बंदोबस्त करवून स्वारी परत आली...दोन वर्षे छावणी उंब्रजवर होती. त्यानंतर सुमारें एक वर्षे मिरजेवर होती. नंतर श्री चाफळी जाऊन श्रीचें दर्शन करून पूजा ब्राह्मण भोजन करून १७४० च्या फाल्गुनांत साताऱ्यास आले. शहरचे देवांच्या पूजा कराविल्या. शहरांत गुढ्या उभ्या केल्या. रस्त्यांत सडे रांगोळ्य

घालून सर्व नगर आलंकृत केलें. सर्व लोक पुढें सामोरा नजरा घेऊन आले. रस्त्यांत घरोघरीं स्त्रिया आरत्या घेऊन उभ्या राहिल्या. समारंभेंकरून वाड्यांत प्रवेश केला."

वसईचा संग्राम तर अत्यंत स्फूर्तिदायक होता. या मोहिमेची तयारी चिमाजीनें आधीं दोन वर्षांपासून करून ठेवली होती. हा संग्राम १७३९ त संपला. मोहिमेला १७३७ च्या उन्हाळ्यांत सुरुवात झाली. दमणपासून ते दविपर्यंत सर्व किनाऱ्यावरील व यांच्या मध्यभागीं असलेल्या निरनिराळ्या ठाण्यांवर फौजा ठेवून जेथें शत्रू असतील तथें त्यांचा नाश करण्याचा उद्योग चिमाजीनें सुरू केला होता. व सर्वांवर नजर ठेवीत तो ठिकठिकाणीं स्वतः फिरत होता. या मोहिमेंत कोणीही पळून जातां कामा नये, आपापल्या जागीं कटुन राहून शत्रूला तोंड दिलें पाहिजे, अशा सूचना बाजीरावही आपल्या सरदारांना देत होता. "ज्या ज्या वाटा पळून जावयाच्या आहेत तेथें चौक्या बसवून पळतील त्यास धरून डोकीं मारणें सरदार प्यादा न म्हणणें. विना एकाद दुसरा अगर परदेशी कानडे मारल्याशिवाय माणूस भय धरून वर्तणार नाहीं." बाजीरावानें रामचंद्र हरी पटवर्धन यांस या सुमारास पाठविलेल्या पत्रांत वरील सूचना केल्या आहेत. यावरून हे दोघे भाऊ या संग्रामाचें काम किती व्यवस्थित रीतीनें चालवीत होते हें कळून येण्यासारखें आहे. वसईचा हा संग्राम शेवटचे तीन महिने तर अत्यंत जोरांत चालला, या संग्रामांत पेशव्यांनीं आपलें होतें नव्हतें सर्व बल खर्ची घातलें. सुधारलेली युद्धसामुग्री व शस्त्रें वापरणाऱ्या एका युरोपीय राष्ट्राशीं हा झगडा चालू होता. शत्रूकडून तोफांचे धडाक्यावर धडाके चालू असतां त्याच्यावर चालून जाणें सामान्य माणसांचें काम नव्हतें. या संग्रामांत रामचंद्र हरी पटवर्धनांसारखे ब्राह्मण सरदार अत्यंत हिरीरीनें लढले. तोफांच्या सुटणाऱ्या फेरीला त्यांनीं जुमानलें नाहीं. किल्ल्याच्या दरवाज्यांत आपलें धड तरी पडलें पाहिजे इतक्या आवेशानें पेशव्याच्या या सरदारांनीं हा संग्राम चालविला. या संग्रामाचीं सर्व सूत्रें चिमाजीच्या हातीं होतीं. या संग्रामाच्या वेळीं इंग्रज पोर्तुगीजांना दारुगोळा पुरवीत होते ही गोष्ट चिमाजीस समजली त्या वेळीं त्याचा संताप अनावर झाला. पाश्चिम किनाऱ्यावरील सर्व युरोपियनांची बसत चाललेली

गयेस गेली. येथें जो धर्म जाहाला तो पत्रीं लिहितां येत नाहीं. परस्पर लोक सांगतां कळों येईल. आम्हांस पुशिले परन्तु नाहीं. पंचविसातीसामध्यें तर उत्तम धर्म होता, लोकोत्तर कीर्त होती. परंतु ईश्वरास कर्तव्य तें जाहालें. महाराष्ट्र ब्राह्मणास येक कपर्दीक कोणास पावली नाहीं व येक कराडी बायको महादाजी पंताची माय आली होती तिनें आपले ज्ञातीस सर्वांस दाहा दाहा रुपये दिले. वरकड सर्व ज्ञातीवर तीन तीन रुपये पावले, हे तुम्हास परस्पर कळेलच. यानंतर बाईचा धर्मामध्यें आपण मन घालून धर्म करवावा तर आपणास काशी सोडून देशास जावे लागेल. यास्तव आपण बोललो नाहीं."

ब्रह्मेंद्र स्वामींचें प्रस्थ बाजीरावाच्या कारकीर्दीत बरेंच माजलें होतें. राजघराण्यांतल्या व सरदार घराण्यांतल्या बऱ्याच स्त्रिया या स्वामीच्या भजनीं लागल्या होत्या व त्याच्याशीं संगनमत करून सावकारीही करीत होत्या. पण या भोळ्या व भाबड्या स्त्रियांच्या यादींत राधाबाईचें नांव आढळत नाहीं आणि या बाईच्या शिकवणीचा परिणाम म्हणूनच कीं काय सदाशिवराव भाऊचें व नानासाहेबांचें या स्वामींशीं कधींच पटत नसे.

राधाबाई राजकीय बाबतींतही दूरवरचें धोरण आंखणारी दूरदर्शी बाई होती. काशीयात्रेला जातांना वाटेंत रजपुतांच्या मुलखांतून ती गेली. जयपुरास ती सवाई जयसिंगाची पाहुणी होती. त्यानें राधाबाईचा पाहुणचार अत्यंत प्रेमानें व आदरानें केला. सवाई जयसिंगानें आपली मुलगी राधाबाईच्या मांडीवर ठेविली. त्या वेळीं ही मुलगी आपली झाली, असें बोलून दाखवून पेशवे घराण्यांतील कोणीही पुरुष जयपूरच्या राज्यास कधींही त्रास देणार नाहीं, उलट या राज्याचें संरक्षण करण्यासही तयार राहील, असें आश्वासन बाईनें सवाई जयसिंगास दिलें.

अशा या सर्वतोपरी कर्तृत्ववान, हुशार, राजकारणी, दूरदर्शी, वृद्ध व अनुभवी स्त्रीच्या शिक्षेखालीं भाऊसाहेब मोठा होत होता.

मुलांचें संगोपन, त्यांचें शिक्षण, पेशव्याच्या घरांतील देवतार्चन व त्या संबंधाचीं धर्मकृत्यें, दानधर्म, ब्राह्मणभोजनें, लग्नकार्यें इत्यादी सर्व व्यवहारांवर राधाबाईची देखरेख होती व तिच्या आज्ञेबाहेर जाण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. पर्वती मंदिराचीं कामें, इनामें, बाक्षिसें वगैरे बाबतींतही

बाजीराव आपल्या आईचा वारंवार सल्ला घेत असे. नानासाहेब, भाऊसाहेब, रघुनाथराव, जनोबा या सर्वांना या बाईचीच शिक्षा होती. नाना, भाऊ, रघुनाथ व जनोबा या सर्व मुलांना राजकारणाचें शिक्षण मिळावें, राज्यकारभाराचें अंग त्यांना प्रत्यक्ष अवगत व्हावें, म्हणून वर्षांतून मधून मधून या सर्वांना आळीपाळीनें साताऱ्यास शाहूपाशीं ठेवण्याचा प्रघात या बाईनेंच पाडला होता. या प्रघातामुळें पेशव्याचीं हीं हुशार मुलें राज्यकारभारांत लहानपणापासूनच लक्ष घालूं लागलीं. सातारा हें मराठेशाहीचें त्या वेळचें मुख्य केंद्र होतें. सर्व राजकारणें या ठिकाणींच शिजत. यामुळें पेशव्यांच्या कारभाराला व धोरणाला अनुकूल कोण, प्रतिकूल कोण, कोणाचें कसें धोरण, कोणाचे कसे डावपेंच, याची खडानखडा माहिती या मुलांना साहजिकच होत होती. या परिस्थितीचा फायदा नानासाहेबानें व भाऊसाहेबानें अर्थातच घेतला.

मोडी बालबोध वाचन, हिशेब लिहिणें, संस्कृत भाषेचें अध्ययन, घोड्यावर बसणें, हे त्या वेळच्या शिक्षणाचे मुख्य विषय होते. आणि या शिक्षणाला वयाच्या पांच सहा वर्षांपासूनच सुरुवात होत होती. या शिक्षणक्रमांत सदाशिवराव भाऊ, रघुनाथराव व जनोबा यांचा कसा प्रवेश होत चालला होता, त्यांचें संस्कृतचें अध्ययन कितपत झालें होतें, त्यांचा नित्यक्रम कसा होता व या मुलांना वडील माणसांची शिकवण कशी होती, हें नानासाहेबानें ९ जुलै १७४२ रोजीं रघुनाथरावस लिहिलेल्या पुढील पत्रावरून चांगलें समजून येतें. नानासाहेबाचें वय या वेळीं २१ वर्षांचें होतें. पण ज्या अधिकारवाणीनें नानासाहेबानें हें पत्र लिहिलें आहे त्यावरून त्याच्याही शिक्षणाची कल्पना आल्यावांचून राहात नाहीं.

नानासाहेबानें रघुनाथरावास पत्र पाठविलें ( ९ जुलै १७४२ ) त्यावेळीं रघुनाथराव आठ वर्षांचा होता. भाऊचें वय त्या वेळीं १२ वर्षांचें होतें. हें पत्र म्हणजे त्या वेळच्या गृहशिक्षणाचा एक नमुना आहे.

" चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान उपरि विशेष. येथून जाते समयी जें सुचलें तें तुम्हास सांगितलें आहे, त्याचें स्मरण निरंतर मनांत असूं देत जाणे. रघुवंश, विदुर नीति, चाणक्य व जे तुम्हास येत असेल, त्याची नेमपूर्वक चिंतनिका करून थोडेंबहुत शास्त्री

याजवळ नित्य म्हणत जाणें. विराटपर्वापासून पढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. केवळ घोडी फेरावयाचे छंदास न लागणें, वजनी, कैली, बेरीज बराबर करावयाचा सराव बहुत करणें. चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें. जे आज्ञा करतलि तेंच काम करावे. बहुतकरून भाऊबरोबर जेवीत जाणें. घोडी वेगळीं बांधीत न जाणे. क्षुद्र मनुष्याशीं सहवास कोणे प्रकारेंही न करणें. मातुश्री बाई (राधाबाई), ताई (काशीताई), अनुबाई याशी एक दो दिवशीं अर्ध घटकाभर जाऊन बसत जाणें. शरीर प्रकृति नीट नाहीं यास्तव औषध कांहीं नेमेंकरून घेत जाणें. भाऊसमागमें घोडीं फिरावयास जात जाणें. सातारियास जर जावयाची आज्ञा केली तर चिमणगिरी गंगाधर भटास व भाऊ जवल विनंती करून, बरोबर दिल्हे तर घेऊन जाणें. सातारियास गेल्यावर दोही बाईकडे विना बोलाविल्यावांचून गोविंदराव यांनीं सांगितल्यावांचून न जाणें, कालानुरूप वयास उचित, योग्य वेष करीत असावे. देवपुजा थोडी परंतु एकांति न बोलतां करीत जाणें. इतकेंही नेमे करून करावे, आणि गर्व न करावा. निरंतर साधन वृत्तीनें वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावे. सर्व जें मनें करून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुत्रावे शिष्य धर्मे असलिया फार उपयोग आहे. चिरंजीव जनार्दन बहुत कामही करून पढतात ते हर एक गोष्टींत अधिक जाहल्यास तुम्ही त्यास मान्य पुरुष कसे व्हाल ? विशेष काय लिहिणे. येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचवीसा दिवसांत पावलो. श्रीकृपेनें मेहनत करून दिल्लीचे सुमारे जात आहों. जसें पुढील वर्तमान होईल तैसी योजना होईल. हे आशिर्वाद. *

नानासाहेबानीं रघुनाथरावास हें पत्र लिहिलें त्या वेळीं रघुनाथराव अवघा आठ वर्षांचा होता व भाऊसाहेब त्याच्याहून चार वर्षांनीं मोठा होता. रघुवंश, विदुरनीति, चाणक्यनीति यांचे अध्ययनाचा व त्यांच्या चिंतनिकाचा या पत्रांत उल्लेख आहे. तसेंच विराटपर्वापासून पुढें भारत वाचण्याचा उपदेश केला आहे यावरून तत्कालीन सरदार घराण्यांतील मुलांना कोणत्या प्रकारचें शिक्षण देण्यांत येत होतें, राजकारणांत व मुत्सद्दीगिरींत तीं तरबेज झालीं पाहिजेत, इकडे वडील मंडळींचें कसें लक्ष होतें.

---

—* राजवाडे खंड १, पान ९६.

त्या प्रमाणेंच भारत रामायणांतलि शूर पुरुषांचीं चरित्रें हीं मुलांच्या डोळ्यापुढें ठेवून त्याच्या ठिकाणीं स्वधर्माभिमान व स्वसंस्कृतीचा अभिमान उत्पन्न व्हावा, शौर्यधैर्याचे गुण त्यांच्यांत वृद्धिंगत व्हावे, याची काळजीही घेण्यात येत होती हें समजण्यासारखें आहे. ' भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें, जे आज्ञा देतील ते काम करावे, बहुतकरून भाऊबरोबरच जेवीत जाणें ' या उल्लेखांवरून भाऊसाहेब त्या वेळच्या सर्व शिक्षणक्रमांत तरबेज झाला होता, इतकेंच नव्हे तर धाकट्या भावांनीं त्याच्या आज्ञा मानाव्या, त्याच्या वर्तनाचें अनुकरण करावें, इतकें त्याचें आचरण शुद्ध होतें हेंही प्रत्ययास आल्यावांचून रहात नाहीं. भाऊसाहेबांची लहानपणची हुशारी पाहून नानासाहेबांचीं भाऊवरच विशेष मर्जी होती व या वयांत त्याच्यावर जबाबदारीचीं कामेंही नानासाहेब टाकूं लागला होता.

भाऊसाहेबाचा जन्म पेशवाईच्या ऐन धामधुमीच्या कालांत झाला. तसेंच त्याच्या बालपणाचीं वर्षें हीं अशाच धामधुमीच्या घटनांनीं भरलेलीं होतीं. भाऊसाहेबांचे वडील चिमाजी हे दुय्यम पेशवे व बाजीरावाचा कारभार संभाळण्याकरतां त्यांची नेमणूक शाहूनें केलेली होती. पण आपला हा कारभार यशस्वी रीतीनें संभाळून चिमाजी अप्पा बाजीरावाच्या बरोबरीनें मराठी राज्याच्या म्हणजे हिंदुपदपातशाहीच्या वाढीच्या कामीं भाग घेत होता. बाजीरावाच्या कारकीर्दींतील अशी कोणतीही मोहीम नाहीं कीं, ज्यांत चिमाजीनें भाग घेतला नाहीं किंवा बाजीरावानें काबीज केलेला मुलूख सुव्यवस्थित राखण्यासाठीं किंवा तेथील कारभाराची व्यवस्था करून देण्यासाठीं चिमाजी झटला नाहीं. पेशव्याच्या घराण्यांतील मुलांचें शिक्षण त्यांना थोडेंसें समजूं लागतांच सुरू होत होतें. रघुनाथराव केवळ आठ वर्षांचा असतांना त्यानें कोणकोणत्या विषयांत प्रावीण्य संपादन केलें होतें, हें वर उद्धृत केलेल्या पत्रांवरून सहज समजण्यासारखें आहे. हें पत्र १७४२ सालचें आहे. भाऊसाहेब त्यावेळीं बारा वर्षांचे होते. म्हणजे बाजीरावाची ऐन धामधुमीची कारकीर्द त्याच्या बालमनावर अनेक प्रकारचे तेजस्वी संस्कार करीत चालली होती.

बाजीरावानें आज गुजराथवर स्वारी केली. उद्या तो माळव्यांत अवतरला व परवा त्यानें आपला मोर्चा दिल्लीकडे वळविला. दिल्लींत मिळविलेलें

यश पूर्णपणें पदरीं पाडून घेण्याकरतां भोपाळपर्यंत त्यानें निजामाची ससेहोलपट केली व तेथें त्याचा पूर्ण पराभव करून दिल्लीच्या बादशहाशीं केलेला करार पुरा करून घेतला. अशा या धामधुमीमध्यें भाऊसाहेबाच्या बाल मनावर परिणाम करणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या तीन घटना त्याच्या बाल-वयांत घडून आल्या. एक बाजीरावाची दिल्लीवरील मोहीम, दुसरी शाहू महाराजांची मिरजेवरील स्वारी व तिसरा व सर्वांत महत्त्वाचा प्रसंग म्हणजे चिमाजी अप्पाची वसईवरील मोहीम.

१७३५–३६ त बाजीरावानें हिंदुस्थानांत स्वाऱ्या करण्यास आरंभ केला. बाजीराव या वेळीं नेहमींप्रमाणें पैशाच्या अडचणींत होता व ब्रह्मेंद्र-स्वामींना या आपल्या आपत्तीसंबंधानें दीनवाणीनें तो पत्रावर पत्रें पाठवीत होता. पण हातीं घेतलेल्या मोहिमेंतील त्याचा आवेश मुळींच कमी झाला नव्हता. बाजीरावावरील कर्जाचा एकूण आंकडा साडेचार लाखांचा होता. त्यापैकीं तीन लक्ष रघुनाथ भट पटवर्धन याचें व एक लक्ष पांच हजार ब्रह्मेंद्र-स्वामीचें व छत्तीस हजार बाबूजी नाइकाचें. या कर्जास व्याजाचा दर दर-महा दरशेंकडा एक रुपयापासून अडीच रुपयांपर्यंत लावलेला आढळतो. बाजीरावानें निर्माण केलेले सरदार व त्यांचे रामचंद्रबाबा शेणोलीकरासारखे कारभारी गडगंज पैसा मिळवीत होते. पण बाजीरावाकडे पहावें तर तो सारखा कर्जांत बुडालेला असायचा. गुजराथ, कर्नाटक, कोंकण, माळवा, दिल्ली वगैरे प्रांतांवर बाजीराव व चिमाजी यांच्या मोहिमा चालू होत्या, या दोघा बंधूंना अपयश काय असतें, हें माहीतही नव्हतें. मोहिमा यशस्वी करायच्या, मुलुख ताब्यांत घ्यावयाचे, चौथाई सरदेशमुखी वसूलही करायची, पण स्वारीचा खर्च भागायचा नाहीं. पैशाची तंगी कायम राहायची कर्ज मिळवितां मिळवितां बाजीरावास नाकीं नव यावयाचे हें असें कां, याची चर्चा बाजीरावाच्या कारकीर्दीपासून पेशव्यांच्या घराण्यांत चालू होती. कारभाराची व्यवस्था अशा पायावर रचली पाहिजे कीं, ज्यामुळें मध्यवर्ति सरकारला व त्यानें ठेवलेल्या खडया फौजेला पैशाची कमतरता पडता कामा नये. या गोष्टी-मुळेंच पेशव्यांच्या सर्व मुलांपैकीं भाऊसाहेबांचें लक्ष हिशेबी कामाकडे जास्त वळलें. मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, पिलाजी जाधव, दाभाडे, पवार, नागपूरकर भोसले, गोविंदपंत बुंदेले, हिंगणे व अंताजी माणकेश्वर हे

सरदार अलोट पैसा मिळवितात व मध्यवर्ति सरकारचा खजिना रिकामा राहतो याचा सरळ अर्थ असा कीं, हे सरदार कराराप्रमाणें आपल्या वाटणीचा पैसा सरकारांत भरीत नाहींत. मुलुखगिरी तर केलीच पाहिजे पण त्याचबरोबर सरकारी हिशेबाचें दप्तर चोख ठेवून सरदारांकडलि येणें वसूल करण्याची योग्य व्यवस्थाही झाली पाहिजे. या विचारांनीं भाऊसाहेबांच्या बालमनावर पगडा बसविला. व त्यामुळेंच लेखणी व तरवार दोन्ही चालविण्यांत भाऊसाहेब वाकबगार झाला.

१७३७ त मजलावर मजला मारून बाजीराव दिल्लीकडे चाल करून गेला, फत्तेपुर सिक्री व दीग यांच्या दरम्यान मोंगल फौजांना झुकांड्या देऊन तो दिल्लीदरवाजापर्यंत जाऊन पोंचला. मराठे दिल्लीवर चालून आले व आतां ते आंत घुसतात असें पाहून दिल्लींतील सर्व जनता घाबरून गेली व मोंगल राजधानीच्या रस्त्यांवर पळापळ सुरूं झाली. बाजीरावानें मनावर घेतलें असतें तर त्यानें यावेळीं दिल्ली काबीजही केली असती. पण तसें न करता दिल्लीदरवाज्याजवळ गेलेलीं आपली फौज मागें घेऊन दिल्ली-पासून सात मैलावर त्यानें आपल्या फौजेचा तळ दिला व दिल्लीच्या जन-तेला व खुद्द बादशहाला निर्धास्त केलें.

शिवछत्रपतींनीं हिंदुपदपातशाहीच्या स्थापनेस आरंभ केला. शाहूनें व बाळाजी विश्वनाथानें या ध्येयाचा पुरस्कार केला. प्रथम बाळाजी विश्वनाथ व त्यानंतर बाजीराव यानीं खुद्द दिल्लीवर आपल्या ढाला रोवल्या. बाळाजी विश्वनाथाला त्या वेळीं दिल्ली काबीज करणें शक्य नव्हतें. पण बाजीरावाला तें शक्य असूनही त्यानें ती गोष्ट अमलांत आणली नाहीं. तेजस्वी परंपरेंत वाढलेल्या व इतिहास व राजकारण कळूं लागलेल्या भाऊच्या मनाला या गोष्टीचा अचंबा वाटणें साहजिक होतें. बादशाही बुडवायची नाहीं म्हणजे अर्थातच दिल्ली आपल्या काबूंत घ्यावयाची नाहीं, हें ओघानेंच आलें. बादशाही बुडवावयाची नाहीं पण तिच्या कारभाराचीं सूत्रें मात्र हातीं घ्यावयाचीं, या शाहूच्या धोरणाप्रमाणें बाजीरावाला वागावें लागलें. हिंदु-पदपातशाहीच्या स्थापनेचें व हिंदुस्थानभर तिची सत्ता पसरविण्याचें बाळ-कडू पाजलेल्या भाऊच्या बालमनाला इतकें गुंतागुंतीचें राजकारण पटणें शक्य नव्हतें. प्रसंग आला तर आपण दिल्ली काबीज केल्याशिवाय राहाणार

नाहीं, असेंच या वेळीं भाऊसाहेबांच्या मनानें ठरविलें असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं.

दिल्लीची ही मोहीम भोपाळ येथें निजामाचा पराभव झाल्यावरच खरीखुरी संपली व दुराईच्या तहांत माळवा व नर्मदा व चंबळा यांमधील मुलूख, या दोहोंबद्दल बादशाहीची सनद मिळवून देण्याचे आणि मराठ्यांच्या खर्चाचे पन्नास लाख रुपये बादशहाकडून वसूल करून देण्याचें निजामानें कबूल केलें.

भोपाळच्या संग्रामांतील यशाचें श्रेय बऱ्याच अंशीं चिमाजी अप्पास दिलें पाहिजे. उत्तरेच्या मार्गावर तापी नदीच्या कांठीं चिमाजी अप्पा बंदोबस्तानें ठासून बसला होता. औरंगाबादेहून निजामाकडे जाणाऱ्या फौजेस त्यानें अडवून ठेवलें व रघूजी भोसले व दाभाडे सेनापति यांच्या हालचालींवर नजर ठेवून बाजीरावाचा पाठपुरावा केला म्हणूनच बाजीरावाला निर्धास्तपणें निजामास पालथें पाडतां आलें. कठिण प्रसंगांत साहसानें, धैर्यानें उडी घालणें, घोड्याला बेफाम उधळावयास लावून त्यावर स्वारी चढविणें, हे बाजीरावाच्या आंगचे गुण भोपाळच्या लढाईत निदर्शनास आले.

दिल्लीची मोहीम, भोपाळचा विजय व या दोन्ही प्रसंगीं बापानें व चुलत्यानें केलेल्या पराक्रमाचीं वर्णनें वाचून भाऊसाहेबाचें बालमन थरारून गेलें असेल. भारताच्या युद्धपर्वांतील भीमार्जुनांच्या शौर्याच्या प्रसंगापेक्षांही या पेशवे बंधूंच्या पराक्रमानें भाऊसारख्या पेशव्याच्या घराण्यांतील मुलाच्या बालमनाचा कबजा घेतला असल्यास त्यांत कांहींच नवल नव्हतें.

इकडे बाजीराव व चिमाजी दिल्लीच्या मोहिमेंत गुंतले होते तर याच कालांत म्हणजे १७३७ ते १७३९ या दोन वर्षांत खुद्द शाहूनें मिरजेवर स्वारी करून ती काबीज केली. शाहूची ही मोहीम बादशाही थाटाची होती. गनीमी कावा करून शत्रूस जेरीस आणावयाचें व मुलुखगिरी करावयाची हें आजपर्यंतचें मराठ्यांचें धोरण शाहूनें या स्वारींत अजीबात बाजूला ठेवलें व दिल्लीच्या बादशहाप्रमाणें आपल्यालाही अशा बादशाही स्वाऱ्या करतां येतात हें दाखविण्याकरतांच कीं काय शाहूनें या मोहिमेला पुण्याहून अत्यंत थाटानें सुरुवात केली. ही मोहीम तब्बल दोन

वर्षे चालूं होती. या मोहिमेंत नानासाहेबाला शाहूनें बरोबर घेतलें होतें. भाऊसाहेब या स्वारींत होते याबद्दल कोठें पुरावा सांपडत नाहीं. तथापि या स्वारीचें जें वर्णन इतिहासांत नमूद आहे तें वाचण्यालायक असून बाल भाऊसाहेबाच्या शूर मनाला तें उद्दीपित करणारें होतें यांत शंकाच नाहीं.

शाहूची ही स्वारी त्याच्या ऐश्वर्याची निदर्शक आहे. शाहूनें लहानपणीं औरंगजेबाच्या स्वारीचा थाट पाहिला होता, पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत मराठेशाहीच्या वैभवाचा कळस झाला. त्याच्या सरदारांस हिंदुस्थानांत सर्वत्र विजय मिळत गेले. या भाग्यशालित्वाचें निदर्शक म्हणून औरंगजेबा-प्रमाणें आपल्या चतुरंगदळासह थाटानें स्वारीचा समारंभ करावा असें शाहूच्या मनांत येणें स्वाभाविक आहे. लहानपणचे संस्कार संधी आली. कीं, बाहेर वाट काढूं पहातात त्यांतलाच हा प्रकार होता. शाहूच्या स्वारीचें वर्णन असेंच हृदयंगम असून हिंदुपदपातशाहीच्या अभिमानी मनाला उचंबळून सोडणारें आहे. या स्वारीचें वर्णन इतिहासकारांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे. "कूच करणें तें दोन तीन कोसांचें करावें ऐसें केलें, आणि सुमुहूर्तें डेरे-दाखल झाले. पागा हुजुरात सर्व तयारी करून उतरल. तोफखाना तयारी होऊन काढिला व सर्व सरदारांस आले तालूके व मसलतींचे बंदोबस्त राखून पांच, चार, दोन हजार फौजेनिशी ज्यांचें त्याप्रमाणें बरोबर यावें असे नेमून दिल्याप्रमाणें उतरले. त्यास मिसलीस राहाण्याचे व मुख्य स्वारी चालण्याचे निर्बंध नेमून दिले. सेनाधुरंधर व सेनासाहेब सुभा भोसले यांस अघाडीस नेमले. प्रतिनिधी व मुख्य प्रधान अमात्य सचिव मंत्री यांचे उजवे बाजूस मिसल नेमले. पंडितराव सुमंत व न्याया-धिश यांस डावे बाजूस नेमून दिलें. चिटणीस, पोतनिस वगैरे कारकुन मंडळी जामदारखान्यालगत उजवे बाजूस नेमले. फडणीस व दप्तरकोटी वगैरे डावे बाजूस नेमले. सोयरे लोक मानकरी व फत्तेसिंग भोसले उजवे बाजुस नेमले. पिछाडीस सरलष्कर व त्याचे निसबतीचे सरंजामी हे नेमले. डेऱ्यापुढें व शागीर्द पेशा लोक वगैरे जिकडील तिकडे मिसली नेमुन दिल्या. सर्वांनीं स्वारींत आपापले मिसलींत चालावें, गलबला कांहीं एक होऊं नये. पातशाही स्वारींत महाराज होते त्याअन्वये सर्व मातबर मुत्सद्दी प्रधान व

सरदार यांनीं अंबाऱ्यांत बसोन, सरकारचे पाठीमागे जनानखाना, त्यामागे चाळीस पन्नास अंबाऱ्या चालाव्या. पुढें तोफखाना, त्यापुढें ढाला व निशाणें व त्यापाशीं गारद व करोळ व पागा चालावी. सर्वांपुढें बिनीवाले सेनाधुरंदर यांनीं चालावें. निशाणामागें अघाडीचे सरदार यांचे लोक चालावे. त्यामागें जिलीब नानाप्रकारचीं रणवाद्यें, त्यामागें जिलबीचे हत्ती, घोडे, रथ, सांडणी यांनीं चालावे. त्यामागे नगारखाना, शहाजाने, त्यामागे वाजंत्री व धाडी व त्यामागे चोपदार भालदार चालावे. वाटेनें सक्के ( पाणी शिंपणारे ) व पखाला यांनीं पुढे शिंपकाव करीत असावा. याप्रमाणें दोन तीन कोस चालून डेरेपर्यंत कोरबंदीचे लोक म्हणजे सलामीचे स्वार यांचे मुजरे घेत जावे. याप्रमाणें मजला करून उंबरज मुक्कामीं आले...श्रीपतराव प्रतिनिधींनीं आज्ञेप्रमाणें उदाजी चव्हाणावर जाऊन त्यास जरब दिली व चव्हाणास घेऊन महाराजापाशीं आले. दुसरे वर्षी तोफखाना व सामान देऊन, मिरजचें ठाणें मोगलाकडे होतें तें घ्यावें म्हणोन त्यास रवाना केले. बाहिरोपंत पिंगळयाचे चिरंजीव आबाजीराव पेशवाई काढली म्हणोन उद्विग्नता वागवीत होते, त्यांची परीक्षा पाहाणें म्हणोन संताजी डुबल यास बरोबर देऊन तीस हजार फौजेसहित रवाना केले. त्यांनीं जाऊन किल्लयास शह दिला. परंतु किल्ला लांबणीत व बांधणींत मजबूत इलाज न चाले. यामुळें प्रतिनिधींस आज्ञा केली कीं, उद्या हल्ला चढवून किल्ला घ्यावा. दुसरे दिवशीं जोराचा हल्ला केला. ईशान्येकडील बुरूज तोफा लावून ढळला. निशाण लावून किल्ला घेतला. शेपन्नास मेले. पांच पन्नास जखमी झाले. तें जाऊन मोर्चेबंदी करून तोफा लावून मारगिरी केली. यावरून किल्ला तहास येऊन ता. ३ आक्टोबर स. १७३९ रोजीं दिला. यावरी महाराजांची स्वारी किल्ला पहाण्यास गेली. धूळगांवचा बाळोजी बिन शिवाजी साळुंके ऊ. डुबल पटवर्धनांचे पदरीं होता, त्याजकडे मिरजेचें ठाणें देऊन किल्लयाचा व प्रांताचा बंदोबस्त करवून स्वारी परत आली...दोन वर्षें छावणी उंब्रजवर होती. त्यानंतर सुमारें एक वर्षें मिरजेवर होती. नंतर श्री चाफळी जाऊन श्रीचें दर्शन करून पूजा ब्राह्मण भोजन करून १७४० च्या फाल्गुनांत साताऱ्यास आले. शहरचे देवांच्या पूजा करविल्या. शहरांत गुढ्या उभ्या केल्या. रस्त्यांत सडे रांगोळ्या

घालून सर्व नगर आलंकृत केलें. सर्व लोक पुढें सामोरा नजरा घेऊन आले. रस्त्यांत घरोघरीं स्त्रिया आरत्या घेऊन उभ्या राहिल्या. समारंभेंकरून वाड्यांत प्रवेश केला."

वसईचा संग्राम तर अत्यंत स्फूर्तिदायक होता. या मोहिमेची तयारी चिमाजीनें आधीं दोन वर्षांपासून करून ठेवली होती. हा संग्राम १७३९ त संपला. मोहिमेला १७३७ च्या उन्हाळ्यांत सुरुवात झाली. दमणपासून ते दविपर्यंत सर्व किनाऱ्यावरील व यांच्या मध्यभागीं असलेल्या निरनिराळ्या ठाण्यांवर फौजा ठेवून जेथें शत्रू असतील तेथें त्यांचा नाश करण्याचा उद्योग चिमाजीनें सुरू केला होता. व सर्वांवर नजर ठेवीत तो ठिकठिकाणीं स्वतः फिरत होता. या मोहिमेंत कोणीही पळून जातां कामा नये, आपापल्या जागीं कटुन राहून शत्रूला तोंड दिलें पाहिजे, अशा सूचना बाजीरावही आपल्या सरदारांना देत होता. "ज्या ज्या वाटा पळून जावयाच्या आहेत तेथें चौक्या बसवून पळतील त्यास धरून डोकीं मारणें सरदार प्यादा न म्हणणें. विना एकाद दुसरा अगर परदेशी कानडे मारल्याशिवाय माणूस भय धरून वर्तणार नाहीं." बाजीरावानें रामचंद्र हरी पटवर्धन यांस या सुमारास पाठविलेल्या पत्रांत वरील सूचना केल्या आहेत. यावरून हे दोघे भाऊ या संग्रामाचें काम किती व्यवस्थित रीतीनें चालवीत होते हें कळून येण्यासारखें आहे. वसईचा हा संग्राम शेवटचे तीन महिने तर अत्यंत जोरांत चालला, या संग्रामांत पेशव्यांनीं आपलें होतें नव्हतें सर्व बल खर्ची घातलें. सुधारलेली युद्धसामुग्री व शस्त्रें वापरणाऱ्या एका युरोपीय राष्ट्राशीं हा झगडा चालू होता. शत्रूकडून तोफांचे धडाक्यावर धडाके चालू असतां त्याच्यावर चालून जाणें सामान्य माणसांचें काम नव्हतें. या संग्रामांत रामचंद्र हरी पटवर्धनांसारखे ब्राह्मण सरदार अत्यंत हिरीरीनें लढले. तोफांच्या सुटणाऱ्या फेरीला त्यांनीं जुमानलें नाहीं. किल्ल्याच्या दरवाज्यांत आपलें धड तरी पडलें पाहिजे इतक्या आवेशानें पेशव्याच्या या सरदारांनीं हा संग्राम चालविला. या संग्रामाचीं सर्व सूत्रें चिमाजीच्या हातीं होतीं. या संग्रामाच्या वेळीं इंग्रज पोर्तुगीजांना दारुगोळा पुरवीत होते ही गोष्ट चिमाजीस समजली त्या वेळीं त्याचा संताप अनावर झाला. पश्चिम किनाऱ्यावरील सर्व युरोपियनांची बसत चाललेली

सत्ता नामशेष करण्याचा या पेशव्यांचा पूर्वींपासूनच बेत होता. पण एकाच वेळीं सर्व शत्रूंना आंगावर न घेण्याचें युद्धधोरण स्वीकारूनच त्यानें प्रथम पोर्तुगीजांचा कांटा काढण्याचें ठरविलें होतें, आणि वसईच्या मोहिमेंत पोर्तुगीजांचा संपूर्ण पराभव करून त्यानें या लोकांना पश्चिम किनाऱ्याच्या या भागांतून कायमचें हांकून लावलें. चिमाजीनें या लोकांना इतका बेमालूम मार दिला कीं त्यांनीं पुन्हा इकडे आपलें डोकें वर उचललें नाहीं. वसईचा किल्ला १३ मे १७३९ रोजीं मराठयांचे ताब्यांत आला. यानंतर एक महिन्यानें इंग्रजांचा वकील इंचबर्ड चिमाजीस भेटला. “ इंग्रजांनीं पोर्तुगीजांना दारूगोळा पुरवला, मग आम्हाला कां ते पुरवीत नाहींत ” या चिमाजीच्या प्रश्नाला इंचबर्ड दुसरें काय उत्तर देणार ? “दारूगोळा देण्याजोगा शिल्लक नाहीं ” असलेंच बेशरमपणाचें उत्तर त्यानें दिलें. हा वकील सातारा-पुणें या भागांत फिरून गेला व पेशव्याच्या मुलखाचें व त्याच्या कारभारासंबधाचें साद्यंत वृत्त त्यानें आपल्या वरिष्ठ इंग्रजी अधिकाऱ्यांना कळविलें.

“ पुण्याकडील प्रदेश फारच सुपीक दिसला. पुण्यास तोफा व गोळ्या करण्याचा कारखाना आहे तो पाहिला. हें सामान ते चांगलें करतात. तेरा इंची गोळयाचा सांचा होता... प्रदेश सारा चांगला लोकवस्तीनें गजबजलेला असून इतर प्रांतांच्या मानानें येथें रयतेवरील सारा माफक आहे ... शाहू महाराजांजवळ स्वतःची वीस हजार फौज व बाजीरावाजवळ चाळीस हजार फौज आहे.* इंचबर्ड साहेबाच्या पत्रांतील हा उतारा किती बोधपूर्ण आहे. युद्धप्रयत्नांच्या बाबतींत जगांतील कोणत्याही राष्ट्राच्या मागें राहत कामा नये असाच प्रयत्न ते करीत असल्याचा या पत्रांतील उताऱ्यावरून दिसून येत नाहीं काय ? मुलुख आबादी आबाद आहे, रयतेवर सारा माफक आहे या गोष्टीसुद्धां काय दर्शवितात ? पेशव्यांचा कारभार चोख, मराठी राज्यविस्ताराला पोषक असाच होता, हेंच यावरून सिद्ध होत नाहीं काय ? या सर्व कारभाराचें श्रेय चिमाजी अप्पाशिवाय दुसऱ्या कोणाकडे जाणार ? बाजीरावाला मुलुखगिरीशिवाय कांहीं सुचत नव्हतें. वाढत चाललेल्या राज्याच्या प्रत्यक्ष कारभाराकडे त्याचें मुळींच लक्ष नव्हतें. ऐषआरामांत वाढलेल्या शाहूला कारभाराची ही दगदग नको होती. तेव्हां हा सर्व

*म. रि. म. वि. १, पा. ३१०.

कारभार चिमाजीच्या देखरेखीखालींच चालला होता व तो इतक्या चोख रीतीनें चालला होता कीं त्यांत दोष देण्याला यत्किंचितही जागा राहिलेली नव्हती. एकच उणीव या कामांत राहिलेली होती व ती म्हणजे बाजी-रावाच्या अवाढव्य उद्योगाला लागणारा अवाढव्य पैसा चिमाजी पुरवूं शकत नव्हता. दुर्दैवाची गोष्ट ही कीं, अवाढव्य मुलुखगिरीवर अवाढव्य पैशाची मागणी करणारा बाजीराव व ही मागणी पुरी करण्यास झटणारा चिमाजी हे दोघेही अकालींच वारले. ही जोडी आणखी कांहीं वर्षें जगती तर पेश-व्याच्या कारभारांतील या उणीवेबद्दल कोणालाही नांवें ठेवण्यास जागा राहिली नसती. पण आपल्या वडिलांना जें करतां आलें नाहीं तें या दोघांच्या सुपुत्रांनीं, नानासाहेबानें व भाऊसाहेबानें करून दाखविलें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

वसईहून आल्यावर चिमाजी आजारी पडला. त्यास वाखा झाला व तोच आजार अधिकाधिक वाढत जाऊन त्यांतच त्याचा १७ डिसेंबर १७४० रोजीं अंत झाला. यापूर्वींच एप्रिल महिन्यांत बाजीराव निधन पावले होते. चिमाजीबरोबर त्याची पत्नी अन्नपूर्णाबाई सती गेली. चिमाजीची ही दुसरी बायको. भाऊसाहेबाची आई रखमाबाई वारल्यानंतर त्यानें हें लग्न ९ डिसें-बर १७३१ रोजीं केलें होतें. चिमाजी स्वभावाचा दिलदार होता. दुसऱ्याचें मन न दुखवितां युक्तीनें त्याच्याकडून काम करून घेण्यांत तो पटाईत होता, तो विचारी होता. संयमी होता, मनमिळाऊ होता. त्याचें आचरण शुद्ध होतें. तो करारी होता. यामुळें त्याच्याविरुद्ध जावयाची कोणाची प्राज्ञा नव्हती. चिमाजी बाजीरावापेक्षां पांच वर्षांनीं लहान खरा पण आपल्या दिलदार व चोख वर्तनानें त्यानें आपल्या वडिल भावालाही आपल्या अंकित करून ठेवलें होतें. मुलुखगिरींत नेहमीं गुंतल्यामुळें व आणखी प्रत्यक्ष कार-भाराकडेही लक्ष द्यावें लागत असल्यामुळें चिमाजीला भाऊच्या शिक्षणाकडे लक्ष देण्यास फुरसत नव्हती, तरी सुद्धां चिमाजीचें वर्तन व कारभारच असा होता कीं, त्यापासून कोणीही बोध घ्यावा व बिनदिक्कत त्याचें अनुकरण करावें. शुद्ध बीजापोटीं, फळें रसाळ गोमटीं ॥

भाऊसाहेबाच्या बालमनावर परिणाम करणाऱ्या आणखी एका प्रसंगाचा उल्लेख केल्याशिवाय हें प्रकरण संपविणें योग्य होणार नाहीं. नादिरशहाची

हिंदुस्थानवर स्वारी हा तो प्रसंग होय. भोपाळच्या लढाईत सपशेल चीत झाल्यानंतर निजामानें मराठ्यांची नांगी मोडण्याकरतां म्हणून नादिरला हिंदुस्थानांत बोलावलें. पण याचा परिणाम उलटच झाला. नादिरशहाच्या या स्वारीमुळें मराठेशाहीचें कांहीं वांकडें झालें नाहीं; उलट मोडकळीस येत चाललेल्या मोगल पातशाहीला आणखी एक धक्का बसला.व देशांतील मुसलमानी सत्तेला उतरती कळा लागली. दिल्ली काबीज करून नादिरशहा दक्षिणेकडे वळूं शकला नाहीं. खुद्द दिल्लींतच त्याची लुटीची हौस पूर्ण झाल्यावर त्याला इकडे तिकडे जाण्याचें कारण काय ? निजामच्या अपेक्षेप्रमाणें मराठ्यांच्या तख्ताला हात लावण्याचें दूरच राहिलें पण नादिरनें त्याच्या बदला मोगल बादशहाचें सुप्रसिद्ध मयूर सिंहासन उखडून टाकलें व तें तो स्वदेशीं घेऊन गेला. नादिर एवढेंच करून थांबला नाहीं. हिंदुस्थानी जनतेवर आपला धाक व दहशत कायम ठेवण्याकरितां कांहीं तरी निमित्त करून त्यानें आपल्या पठाणी लष्करास दिल्लीच्या नागरिकांची सरसहा कत्तल करण्याचा हुकूम केला व शहरातून निरपराधी असंख्य स्त्रीपुरुषांच्या रक्ताचे पाट वाहविले !

नादिरशहाच्या या अघोरी कृत्याच्या बातम्या दक्षिणेंत पोंचल्या. पण त्याच वेळीं वसईचा संग्राम जोरांत चालू असल्यामुळें बाजीरावाला तिकडे जातां आलें नाहीं. हा संग्राम आटोपल्यावर बाजीराव तिकडे निघालाही. पण नादिरशहा आपली राक्षसी मोहिम आटोपून स्वदेशीं परत गेल्याच्या पुन्हा बातम्या आल्यामुळें तिकडे जाण्याचें बाजीरावाला पुढें प्रयोजनच उरलें नाहीं.

बादशाहीचें वैभव धुळीला मिळाविलें व मोगल बादशाहाचें तख्तही उखडून काढून तें आपल्या देशाला चालविलें असें असतांही नादिरनें बेशरमपणानें पुढील आशयाचें पत्र शाहूस व बाजीरावास पाठविलें. ‘ महमदशहास आम्ही तख्तावर बसविलें आहे, आम्ही त्यास भाऊ समजतों. इतःपर सर्वांनीं त्याची आज्ञा पाळावी. न पाळल्यास आम्ही पुन्हा येऊन सर्वांचें पारिपत्य करूं. ’ आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं असलें पत्र पाठविण्याच्या कामींही निजामाचा हात होता. धन्याच्या गादीचें कांहींही होवो; आपल्या जवळचे प्रतिस्पर्धी मराठे यांना धाक दाखवितां आला तर पहावा एवढाच त्यांत निजामाचा उद्देश होता. निजामाचा हा उद्देश साध्य झाला नाहीं. परकीय सत्तेला आपल्या साह्याकरतां बोलावण्यामुळें हिंदुस्थानांतील हिंदू व

मुसलमान या दोन्ही सत्ता मोडकळीस आल्या. त्यांतल्या त्यांत ज्या लोकांनीं या परकीयांना आमंत्रण दिलें त्यांच्या छातीवर ती प्रथम बसली व तिचा मागमूसही नाहींसा करण्यास ती कारणीभूत झाली.

नादिरशहाची स्वारी व त्यानें पाठविलेलें शेवटलें पत्र हीं यापुढें वीस वर्षांनीं झालेल्या पानिपतच्या प्रचंड मोहिमेची नांदीच होती. अफगाणांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या कराव्या व दिल्लीच्या मोगल बादशाहीचें रक्षण करण्याची हमी घेतलेल्या मराठेशाहीनें ही स्वारी परत गेल्यावर त्याच्यामागून त्यानें बळकावलेल्या प्रदेशाचा पुन्हां कबजा घ्यावा, दोघांची गांठ एकदम कधींच पडूं नये, असा प्रकार या स्वारीपासूनच सुरू झाला. पानिपतच्या मोहिमेंत मात्र या प्रकारचा अंत झाला आणि महत्त्वाची गोष्ट ही कीं ज्या पुरुषानें या प्रचंड मोहिमेला हात घातला त्याच्या बालपणींच त्याला या शोकपर्यवसायी नाटकाच्या नांदीचा इतिहास ऐकावयास मिळाला.



# कर्नाटक



बाप वारला तेव्हां भाऊसाहेबाच्या वयाला दहावें संपून अकरावें वर्ष लागलें होतें. भाऊची आई त्याच्या जन्मानंतर एक महिन्यांतच वारली व त्याच्या तरुण सावत्र आईनेंही आपल्या सावत्र मुलाचें संगोपन करण्यापेक्षां पती-बरोबर सहगमन करण्यांतच आपल्या आत्म्याचें अधिक कल्याण होईल, असें मानलें. अशा रीतीनें पोरकें झालेलें हें पोर स्वतःच्या कर्तबगारीवर आपलें चरित्र बनविण्यास स्वतंत्र झालें. पेशव्याच्या इतर मुलांप्रमाणें त्यांची आजी राधाबाई इच्या शिक्षणाखालीं तोहि वाढत होता. पण भाऊचें कोड-कौतुक करण्यास व त्याच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवण्यास त्याचें असें जिव्हाळ्याचें कोणी राहिलें नाहीं. भाऊचा स्वभाव थोडासा रुक्ष, व हट्टी, बनला याचें कारण हेंच होय. प्रेमाचा ओलावा ज्या मुलांना मिळत नाहीं तीं मुलें बहुधा आपल्या पुढील आयुष्यांत अशींच रुक्ष स्वभावाचीं व हट्टी असलेलीं आढळून येतात.

बाजीराव १७४० च्या एप्रिलांत निधन पावले व ता. २५ जून १७०० रोजीं नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं त्या वेळीं बाजीरावाचें वय लहान होतें. त्याचप्रमाणें नानासाहेबाचें वयही या वेळीं अवघें वीस वर्षांचें होतें. "बाजीरावाचें वय लहान असून त्यांनीं आपल्या उमेदींत दहापांच सरकारच्या कामगिऱ्या संपादून सरकारांत द्रव्यही मिळवून आणून दिलें; प्रतारणा ठेवली नाहीं. बाळाजीपंत लहान, हुशार आहे. मसलत उभी करील, हूडपणा करील, पत घेतली असें होऊं न देतां, याजला संभा-ळून, मसलतीस एकदिल होऊन याचा लौकिक होईल असें तुम्ही करून दाखवा असें शाहूमहाराजांनीं सर्व जमलेल्या सरदारांजवळ मागणें केलें त्या वेळीं 'महाराजांचें यांचे ठिकाणीं चित्त आणि आम्ही हरामखोरी केली तरी

ईश्वर आम्हांस महाराजांचे घरीं अन्न न देवो, असें पायावर शपथ—हात ठेवून बोलले " असें या पेशवाईची वस्त्रें देण्याच्या समारंभाच्या वेळचें वर्णन फारच उद्बोधक आहे. शाहू महाराजांची माणसाची पारख व त्यांची शालीनता या दोन्हीही गोष्टी यांत आढळून येतात.

बाजीरावाप्रमाणें शाहूनें नानासाहेबासही मराठेशाहीच्या धोरणाची व ध्येयाची कल्पना दिली. " बाजीरावांनीं थोरले बाळाजीपंत यांचे मागें बहुत सेवा निष्ठेनें करून मोठमोठीं कार्यें करून दाखविलीं. शेवटीं इराणीचें पारिपत्य करून बादशाही स्थापावी, म्हणोन रवाना केलें. तेथें आयुष्य थोडें झालें. त्यास त्यांचे पुत्र तुम्ही, पातशाही रक्षून हिंदुस्थान सर्व आपलें करावें ऐसा बेत त्यांहीं केला. तो सिद्धीस तुम्ही न्यावा अटकेपार घोडे चालवावे." शिवछत्रपतीप्रमाणें शाहूचीही हिंदुस्थानभर मराठ्यांची सत्ता प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा होती. मात्र 'पातशाही रक्षून' हें सर्व करावें असा शाहूचा या बाबतींत थोडासा आग्रह होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यानंतर सहा महिन्यांनीं चिमाजी वारला त्यामुळें दुय्यम पेशवा नेमण्याची त्या वेळीं जरूरच नव्हती. चिमाजी या जागेचा कारभार पहात होता. दोघा बंधूंच्या जागीं आतां हे चुलतेपुतणे मराठी राज्याचा कारभार पाहूं लागले. पण ही व्यवस्था फार दिवस टिकावयाची नव्हती. निर्घृण काळानें ही जोडीही फार दिवस टिकूं दिली नाहीं. पण या मिळालेल्या अवकाशांतच एका मोठ्या धोरणाचा पुरस्कार चिमाजीनें केला व तो म्हणजे कोल्हापुरची व सातारची गादी मागेंपुढें एक करण्याचा प्रयत्न होय. शाहूस पुष्कळ मुलगे व मुली झाल्या पण दुर्दैवानें एकही मुलगा जिवंत राहिला नाहीं. कांहीं मुलीच जागेवर राहिल्या. त्यामुळें शाहूनंतर कोल्हापुरच्या संभाजीला सातारच्या गादीवर बसवावें व छत्रपतीच्या घराण्यांतील भाऊबंदकी कायमची मिटवावी हा या प्रयत्नाच्या मुळाशीं उच्चतम हेतू होता. नानासाहेबास पेशवाई मिळाल्यानंतर कोल्हापुरचा संभाजी शाहूस भेटण्याकरतां साताऱ्यास आला त्या वेळीं या दोघा चुलत्यापुतण्यांनीं त्याच्याशीं एक गुप्त करार केला. कारण, अशा प्रकारचा करार उघडपणें करणें कधींच शक्य नव्हतें. शाहूला ही गोष्ट मुळींच पसंत पडली नसती. शाहूच्या विरुद्ध हें एक कारस्थानच होतें. मग त्याच्या मुळाशीं कितीही

उदात्त हेतु असो. या कारस्थानाच्या वाटाघाटी होऊन चिमाजीअप्पा व बाळाजी यांनीं आपल्या सहीनें हा कराराचा कागद संभाजीस लिहून दिला. "सातारचें राज्य स्वामीचें आणि एकछत्री शिक्का महाराजांचा चालावा. शाहूमहाराजांचा जीवात्मा आहे तों बाह्यात्कारी आम्ही त्यांचे सेवक परंतु अतर्यामी स्वामींचे. शाहूमहाराज यांनीं कैलासवास केल्यावर दोन्ही राज्यें स्वामींचीं आणि आम्ही सेवक स्वामींचे. स्वामींच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करूं" असा या कराराचा मतलब होता. कोणत्याहि कृत्याची योग्यायोग्यता त्याच्या मागें असलेल्या हेतूवरून ठरवायची असते. चिमाजी व नानासाहेब यांनीं धन्याच्या मागें केलेल्या या गुप्त कारस्थानामाग मराठेशाईच्या एकंदर कल्याणाचाच उदात्त व शुद्ध हेतु होता हें पाहिल्यावर चुलत्या-पुतण्यांनीं केलेल्या करारासंबंधानें त्यांना दोष देण्याचें मुळींच कारण नाहीं.

पण यानंतर पांच सहा महिन्यांतच चिमाजी वारला. बाजीरावाच्या मरणानें नानासाहेबाला दुःख व निराशा वाटली असेल; पण चिमाजीच्या मरणानें तो अधिक दुःखी व निराश झाला यांत शंकाच नाहीं. चिमाजीच्या मरणानंतर त्याचा मुलगा सदाशिवराव भाऊ यास शाहूनें दुय्यम पेशव्याच्या व पेशव्याच्या कारभाऱ्याच्या जागीं नेमलें खरें; पण त्याचें वय अवघें दहा अकरा वर्षांचें असल्यामुळें महादाजी पुरंदरे यांस भाऊचें काम पाहाण्यास सांगितलें, पण यामुळें नानासाहेबाचा एकाकीपणा नाहींसा झाला नाहीं. सदोबाचें+ वय लहान असल्यामुळें महादाजी पुरंदरे काम पहात. कारभाराची माहिती मिळावी म्हणून त्यांना साताऱ्यास ठेवण्यांत आलें. वडिल भावाकडे पेशवेपद व धाकट्या भावाकडे कारभारीपद असा रिवाज शाहूनें पाडला होता व वास्तविक भाऊ कारभाराला लायक होत चालला असतांन नानासाहेब त्याला पुण्यास कां घेऊन जात नाहीं याबद्दल शाहूल राग आलेला दिसतो. यामुळें 'सदोबाला पुण्यास न्यावयाचें नाहीं कीं काय ! अशी विचारणा शाहूनें केली त्यावेळीं नानासाहेबानें भाऊला पुण्यास आणल व कारभारीपदाच्या जागेवर काम करण्यास सांगितलें. पण या बाबतींतही भाऊच्या कर्तृत्वास नानासाहेबानीं द्यावा इतका वाव दिला नाहीं. "भोजन

+सदाशिवराव भाऊस लेखककार व लेखक सदोबा या नांवानें उल्लेखतात.

करून पंक्तीस होते. कामकाज कांहीं नाहीं. पंक्तीस जेवावें दप्तरांत लिहावें" अशी भाऊची कुचंबणा झाली.

नानासाहेबानें भाऊशीं असें वर्तन कांहीं दिवस केलें. याचें कारण तो आपली बायको गोपिकाबाई इच्या कटकटीला बळी पडला असेंच दिसून येतें. नानासाहेबाची ही बायको मोठी स्वार्थी व जहांबाज होती. तिलाही आतां मुलें होऊं लागलीं होतीं. पेशवाई हें कांहीं पिढीजाद वतन नव्हतें. एकामागून एक कर्तृत्ववान माणसें याच भट घराण्यांत दिसून आलीं म्हणूनच केवळ शाहूनें बाळाजी विश्वनाथानंतर बाजीरावास व त्याच्या नंतर नानासाहेबास पेशवा बनविलें. बाजीरावानंतर नानासारख्या अल्पवयी पोरास पेशवा करूं नये, म्हणून रघूजी भोसल्यासारखे सरदार शाहूस सांगत होते व बाबूजी नाइकास पेशवाई मिळवून देण्याबद्दल मसलत करीत होते. पण नाना लहान वयाचा असला तरी बाबूजी नाइकापेक्षां तोच पेशवाई कारभारास अधिक लायक आहे अशी शाहूची खात्री पटली होती. शाहूच्या देखरेखीखालीं नानाचें शिक्षण झालें होतें. त्याचप्रमाणें चिमाजीच्या मृत्यूनंतर भाऊही शाहूजवळ सातान्यास राहूं लागला. त्यामुळें 'सदोबावर'-ही शाहूची मर्जी बसत चालली होती. भाऊ बुद्धीनें चलाख, हिशेबी कामांत चोख व दक्ष आहे असें शाहूच्या नजरेस आलें होतें. पेशवे घराण्यांतील मुलें लहान होतीं तरी त्यांच्या कडून गांवांतील कज्जांचें निवाड्याचें काम देण्याचा रिवाज ठेवण्यांत आला होता. या बाबतींतही भाऊची निःपक्षपाती इनसाफी वागणूक, शाहूनें पाहून ठेवली होती. भाऊच्या आंगची निस्पृहता, त्याची करारी वृत्ति, त्याचें शुद्ध आचरण या गोष्टी शाहूच्या लक्षांत आल्या. भाऊला खोटें कधींच खपत नसे. यामुळें साहजिकच त्याच्या स्वभावांत कडवेपणा उत्पन्न झाला होता व त्याची छाप आजूबाजूच्या माणसांवर बसली होती. चिमाजीचा स्वभाव गोड व मनमिळाऊ होता. भाऊचें त्याच्या उलट होतें. खऱ्याची चाड असणाऱ्या माणसांना गुळमुळितपणा खपत नाहीं. एक घाव कीं दोन तुकडे अशी भाऊची जरबेची वागणूक होती. राज्यकारभाराच्या जागीं अशींच माणसें असावीं लागतात हें शाहू जाणून होता. म्हणूनच नानासाहेबानें त्याला पुण्यास नेऊन त्याला नेमून दिलेल्या कामीं योजावें अशी निकड शाहूनें त्यास लावली होती. 'असे भाऊबंद, जवळ आणून आपले

पोरास ठिकाण नाहीं असें करतील' असें गोपिकाबाईस कितीही वाटत असलें तरी शाहूच्या मर्जीविरुद्ध जाणें नानासाहेबासही शक्य नव्हतें. कारभाराच्या कामांत भाऊ ज्याप्रमाणें चोख व दक्ष आहे त्याचप्रमाणें शिपायीगिरीच्या कामींही तो शूर व लढवय्या स्वभावाचा आहे. चिमाजीचे या बाबतींतले गुणही भाऊंत पूर्णपणें उतरले आहेत ही गोष्ट सुद्धां शाहूच्या पूर्णपणें लक्षांत आली होती. आपल्या चुलत भावाच्या आंगचे गुण खुद्द नानासाहेबाच्या लक्षांत आले नव्हते असें नाहीं. नानासाहेब जात्याच थोडा स्त्रैण व विषयासक्त होता. तेव्हां गोपिकाबाईसारख्या तरुण व सुंदर स्त्रीच्या मोहात तो सांपडला व भाऊच्या कर्तृत्वाला त्यानें द्यावा तसा प्रथम वाव दिला नाहीं तरी भाऊच्या आंगचे एक एक गुण त्याच्या नजरेस येऊं लागले तसतसे घरांतल्या जळफळाटास बाजूस सारून पेशवाईच्या व मराठेशाहीच्या हितासाठीं त्यानें गोपिकाबाईच्या मंत्रापेक्षां भाऊच्या हुशारीला व कर्तृत्वालाच अधिक जवळ केलें. आणि कर्नाटकाच्या बंदोबस्ताचा प्रश्न ज्या वेळीं उपस्थित झाला त्या वेळीं बाबुजी नाइकाऐवजीं त्या कामीं त्यानें भाऊचीच योजना केली. भाऊचें वय या वेळीं सोळा वर्षांचें होतें पण बाबूजी नाइकापेक्षांही ही मुलूखगिरी करण्यास भाऊच लायक आहे, असें त्यानें ठरविलें. प्रत्यक्ष स्वतःच्या जबाबदारीवर एकादी मोहीम करून आपली कर्तबगारी दाखविण्याचा भाऊचा हा पहिलाच प्रसंग होता. या प्रसंगांत आपणावर पडलेली कामगिरी त्यानें अत्यंत यशस्वीपणें पार पाडून दाखविली. व तेव्हांपासून पेशवाईच्या कारभारांत नानासाहेबाबरोबरच भाऊचें नांवही झळकूं लागलें. बुद्धीची व कर्तृत्वाची कुचंबणा न होतां योग्य वाव मिळाल्याबरोबर खरीं कर्तबगार माणसें कशीं पुढें येतात व आपल्या आंगच्या गुणाचा फायदा समाजाला कसा करून देतात, याचें प्रत्यंतर भाऊनें आपल्या उदाहरणानें दाखवून दिलें. तेव्हां भाऊवर सोंपविलेल्या या मोहिमेचा वृत्तांत देण्यापूर्वीं तिच्या पार्श्वभूमीचें विवेचन करणें जरूरीचें आहे.

कर्नाटक म्हणजे कानडी भाषा बोलणाऱ्या लोकांचा प्रदेश. कृष्णानदीच्या दक्षिणेस सामान्यतः या प्रदेशाला सुरुवात होते. शिवाजी महाराजांचे वडील शहाजी यांनीं विजापूरच्या आदिलशाहीचे एक सरदार या नात्यानें कर्नाटकांत स्वारी काढून तेथील कांहीं प्रदेश आपल्या कबजांत आणला. पुढें

शिवछत्रपतींनीं या प्रदेशावर आपला वारसा हक्क सांगून या प्रदेशावरची आपली सत्ता दृढतर केली व वाडिलांनीं मिळवलेल्या प्रदेशांत आणखी थोडी भर घातली. त्यांनीं जुने किल्ले दुरुस्त केले व कित्येक नवीन किल्ले बांधले. जिंजी हा या किल्ल्यांपैकींच एक प्रसिद्ध किल्ला होता. पुढें औरंगजेबानें या प्रदेशांतील कांहीं भागावर आपली सत्ता प्रस्थापित केली. दक्षिणेंतील मोगलांच्या सहा सुभ्यांची गणना करण्यांत येते त्यांत कर्नाटकाचा सुभा प्रमुखपणानें गणला जात असे. खानदेश, वऱ्हाड, औरंगाबाद, बेदर, हैद्राबाद व विजापूर हेच मोगलांचे दक्षिणेंतलि सहा सुभे होत. मोगलांच्या या सुभ्यांपैकीं शेवटच्या दोन सुभ्यांचा विस्तार फार मोठा होता. कर्नाटकांतील जितका प्रदेश मोगलांनीं जिंकला तितक्या सगळयांचा समावेश त्यांनीं या शेवटच्या दोन सुभ्यांत केला. हैद्राबाद कर्नाटक व विजापूर कर्नाटक अशीं नांवें मोगलांच्या कारकीर्दींत या सुभ्यांना मिळालीं. मोगल बादशहांची मध्यवर्ति सत्ता कमकुवत झाल्याबरोबर त्यांनीं हिंदुस्थानांतलि निरनिराळया प्रांतांवर नेमलेले सुभेदार स्वतंत्र बनले. तोच प्रकार कर्नाटक प्रांतांतही झाला. हेच सुभेदार आपापल्या प्रांतांत आपल्याला स्वतंत्र नबाब म्हणवूं लागले. पेशवाईच्या वेळेस असे पांच नबाब आपल्या हाताखालचा प्रदेश दाबून बसले होते. अर्काट, शिरे, कडवे, कर्नूड व सावनूर या ठिकाणचे हे पांच नबाब विशेष सामर्थ्यवान व शिरजोर बनले होते. कर्नाटकच्या बालेघाटावर अर्काटच्या नबाबाची सत्ता होती, शहाजींची कर्नाटकांतील जहागीर जी पुढें शिवाजीनें हस्तगत केली तिचा समावेश शिऱ्याच्या नबाबाच्या मुलखांत होत होता. शिरे, होसंकोटे, कोलार, बाळापूर व बंगलूर हे पांच शहाजींच्या जहागिरीचे परगणे होते. या पांच नबाबांपैकीं सावनूरच्या नबाबाचा प्रदेश बराच विस्तृत होता. कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधील टापूंवर त्याचा अंमल होता. मध्यवर्ती सरकार खिळखिळें झालें म्हणजे त्याच्या नियंत्रणाखालीं असलेले सरदार मोकाट सुटतात आणि त्या त्या भागांतलि त्याच्या हाताखालचे पुंड व गुंड लोकांनाही फावतें व ते जेथें जमेल तेथें सरकारी सत्ता काबीज करून आपापलीं स्वतंत्र संस्थानें निर्माण करतात. मोगल पातशाहीचे सर्व हिंदुस्थानांतच अशा प्रकारचे तुकडे तुकडे झाले त्याप्रमाणें कर्नाटकांतही या पांच नबाबांखेरीज आणखी अनेक संस्थानें उदयास आलीं.

म्हैसूर, बिदनुर, चित्रदुर्ग हरपनहळ्ळी, अनागोंदी, रामदुर्ग हीं यापैकींच संस्थानें होतीं. यापैकीं बिदनूर हें त्यांतल्या त्यांत मोठें संस्थान होतें. हें संस्थान पश्चिम घाटाच्या सरहद्दीवर होतें. या घाटाच्या खालीं सोंधें नावाचें आणखी एक संस्थान होतें. कर्नाटकांत या वेळीं तंजावरचें व गुत्तीचें अशीं दोन मराठी संस्थानें होतीं. मुराररावं घोरपडे हा गुत्ती संस्थानचा अधिपती होता. तो मोठा पराक्रमी होता. सोंडूर व गजेंद्रगड हे दोन किल्ले याच्या राज्यांत होते. थोडक्यांत सांगावयाचें तर पेशव्याचे वेळेस कर्नाटकाचा हा मुलूख अशा रीतीनें अनेक मुसलमान व मराठे सरदारांच्या ताब्यांत जाऊन त्याचे तुकडे पडले होते.

बाळाजी विश्वनाथानें दिल्लीपर्यंत चढाई करून दक्षिणेंतील मोंगलाईच्या सहा सुभ्यांच्या बाबतींत स्वराज्य चौथाई सरदेशमुखीच्या सनदा मिळविल्या. स्वराज्याच्या सनदेंत कर्नाटकचा अंतर्भाव नव्हता. फक्त या भागांतील चौथाई व सरदेशमुखी हक्क वसूल करण्याचा हक्क पेशव्यांना त्या वेळेपासून मिळाला होता. मोगलाई दप्तरांत या सहा सुभ्यांचें उत्पन्न अठरा कोटी म्हणून दाखल करण्यांत आलें होतें. त्या मानानें चौथाई व सरदेशमुखी हक्काचें उत्पन्न सुमारें सहा कोटी होतें. पण हें सर्व उत्पन्न निव्वळ कागदावर होतें. विक्रमशाली फौज पाठीशीं असेल तरच हा वसूल व्हावयाचा. या परिस्थितिमुळें मराठ्यांना एक मात्र फायदा झाला. हिंदुस्थानच्या ज्या ज्या भागांत हा हक्क वसूल करण्याच्या सनदा मराठ्यांनीं मिळविल्या होत्या त्या त्या भागांत जणूं काय स्वैर संचार करण्याच्याच सनदा त्यांनीं मिळविल्या. चौथाई व सरदेशमुखी हक्क वसूल करण्याच्या निमित्तानें प्रांतांतून संचार करावा व तेथल्या सरकारी सत्तेच्या दौर्बल्याचा फायदा घेऊन तो प्रदेश गिळंकृत करावा. हिंदुस्थानच्या इतर भागांत मराठ्यांनीं याप्रमाणें जशी मुलुखगिरी केली, तशीच १७२६ त पेशव्यांनीं कर्नाटकांत केली. या स्वारीच्या वेळीं मराठ्यांनीं कर्नाटकांत जो बंदोबस्त केला तो फार दिवस टिकूं शकला नाहीं. बाजीरावाचें लक्ष उत्तरेच्या मोहिमेकडेच गुंतलें त्याचा फायदा कर्नाटकाच्या मूळच्या सरदारांनीं व पुंड पाळेगारांनीं घेतला.

अर्काट येथें १७३६ च्या सुमारास नबाब दोस्त अल्ली कारभार करीत होता. त्याचा जांवई चंदासाहेब हा मोठा हुशार उपद्व्यापी होता. फ्रेंचांच्या

मदतीनें त्यानें आपलें फौजी सामर्थ्य वाढविलें व त्याच्या बळावर त्यानें त्रिचनापल्लीचें राज्य जिंकलें व तंजावरच्या राज्यावरही तो चालून आला. तंजावरचें राज्य शिवाजीचा भाऊ व्यंकोजी याच्या वेळेपासून स्वतंत्र होतें. सातारच्या छत्रपतींशीं अर्थात् त्याचा स्नेहभाव होता. १७४० च्या सुमारास प्रतापसिंह तंजावरच्या गादीवर बसला. फ्रेंचांच्या कवायती सैन्याच्या बळावर आसपासचीं लहानमोठीं संस्थानें काबूंत घेणारा चंदासाहेब आपल्यावरही तोच प्रसंग आणणार असें पाहून त्यानें शाहू महाराजांकडे मदतीची मागणी केली. छत्रसालाच्या हांकेला ओ देऊन बाजीराव तिकडे धांवून गेला व त्यानें महंमदखान बंगशाचा पाडाव करून छत्रसालाची मुक्तता केली. तंजावरचें राज्य तर खुद्द छत्रपतीच्याच घराण्यांतलें. तेव्हां त्याच्या संरक्षणाकरतां शाहूनें चंदासाहेबाची खोड मोडण्याचें ठरविलें यांत कांहींच नवल नाहीं. १७३७ पासून कर्नाटकावर स्वारी करून तेथल्या चौथाई सरदेशमुखीच्या वसुलाचा बंदोबस्त करण्याचा मराठे मंडळींचा विचार होता.

शाहूनें बाजीरावाचीच या कामावर नेमणूक केली होती. पण बाजीरावास तिकडे जाणें झालें नाहीं. वसईच्या मोहिमेंत सर्व मराठे सरदार गुंतून राहिले व त्यानंतर नादिरशहावरच्या स्वारीचें प्रकरण उद्भवलें. १७४० च्या सुमारास बाजीरावास फुरसत झाली. दक्षिणेंत जावयाचेंच नाहीं, इतर सरदारांचें तें काम; असेंच जणूं बाजीरावानें ठरविलें होतें. यामुळें शाहूनें या कामीं फत्तेसिंग भोसले याची नेमणूक केली व रघूजी भोसल्यास त्याला येऊन मिळण्याबद्दल निकडीचीं पत्रें लिहिलीं. रघूजी भोसले ताबडतोब निघून आला नाहीं. त्यानें थोडी दिरंगाई केली. शाहू हयात असतांनाच त्याचे सरदार कसे बेफिकिर व शिरजोर बनत चालले होते याचा नमुना म्हणून शाहूनें रघूजीस पाठविलेल्या पत्रांतील खालील वाक्यें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. "कर्नाटकांत तुम्ही बराबर मातबर फौज घेऊन सामील व्हावे म्हणून लिहिले होतें. त्याचें उत्तर आपल्या प्रांतांतील बंदोबस्तास फौजी गुंतविल्या आहेत म्हणून तपशिलें लिहिलें, ते कळलें. ऐशास तुम्ही मातबर सरदार तपशिलें लावून लिहिता काय म्हणावे ?" या पत्रानंतर मात्र रघजी तांतडीनें दक्षिणेंत निघून आला. १७४० च्या एप्रिल महिन्यांत फत्तेसिंगास तो जाऊन मिळाला. मराठयांच्या या फौजांस अर्काट व कडाप्पा

या जिल्ह्यांच्यामध्यें असलेल्या दमलचेरीच्या घाटांतच अडविण्याचा दोस्त अल्लीचा उद्देश होता. बरेंच मोठें सैन्य घेऊन तो या ठिकाणीं मराठ्यांवर चालून गेला. सामोपचारानें हें प्रकरण मिटवावें म्हणून मराठ्यांनीं तसा प्रयत्न करून पाहिला. दोस्त अल्लीनें तिकडे लक्ष दिलें नाहीं, उलट उडवा-उडवीचींच उत्तरें मराठ्यांच्या पत्रास पाठविलीं. मे महिन्यांत या संग्रामास चांगलें तोंड लागलें. गनीमी काव्यानें मराठ्यांच्या दहा हजार स्वारांनीं आडमार्गांनीं जाऊन दोस्त अल्लीच्या फौजेस वळसा घातला व युद्धाची लगट केली. तोफा बंदुकांचा सर्रास उपयोग दोन्ही पक्षांतर्फें करण्यांत आला होता. रघूजी भोसल्याच्या तडाक्यापुढें दोस्त अल्लीचा निभाव लागला नाहीं. खुद्द दोस्त अल्ली, त्याचा धाकटा मुलगा हसनअल्ली व इतर त्याचे कांहीं मातबर सरदार या युद्धांत कामास आले. दोस्त अल्लीचा दिवाण मीर आसद यास मराठ्यांनीं कैद केलें. नबाबाच्या फौजेची दाणादाण झाली व मराठ्यांनीं मोठाच विजय संपादन केला. दोस्त अल्लीचा मोठा मुलगा सफदर अल्ली बापाच्या पराभवाची बातमी ऐकून मागें फिरला व वेलोरच्या किल्ल्यांत त्यानें आपलें ठाणें दिलें. दोस्त अल्लीचा जांवई चंदासाहेबही त्याच्या मदतीस आला नाहीं. तो त्रिचनापल्लीस राहिला. या सर्वांची एकजूट असती तर मराठ्याना ही मोहीम अर्थातच जड गेली असती. चंदासाहेबाची कपट-नीति यावेळीं उघडकीस आली. सफदर अल्ली व चंदासाहेब या दोघांनीं एक मात्र खबरदारी घेतली. नबाबाची सर्व संपत्ति व जडजवाहीर व आपलीं सर्वांचीं बायकामुलें त्यांनीं पांदेचरीस फ्रेंचांच्या आश्रयास पाठवून दिलीं. तेथला कारभारी ड्यूमास यानें त्यांना आश्रयही दिला. रघूजीनें ड्यूमासला धाकाचें पत्र पाठविलें. त्यानें दाद दिली नाहीं. उलट एक बाणेदारपणाचें उत्तर पाठविलें व त्याबरोबर कांहीं दारूच्या बाटल्या नजर म्हणून पाठविल्या. रघूजीच्या बायकोस ही फ्रेंच दारू फार आवडली. त्यामुळें रघूजीनें आणखी कांहीं बाटल्या पाठविण्याबद्दल ड्यूमासकडे मागणी केली. ही मागणी अर्थात् मान्य करण्यांत आली. त्यामुळें रघूजीचा राग शांत झाला. दोघां-मधील वैरभाव नाहींसा झाला. ड्यूमास व रघूजी यांच्या पत्रव्यवहाराला तडजोडीचें स्वरूप प्राप्त झालें. शाहूला ही हकीकत कळतांच दारूच्या पायीं राज्य बुडविलें असे शाहूनेंही या प्रकरणाबाबत उद्गार काढले, अशी आख्या-

थिका आहे. रघूजीसारखा सरदार केवळ दारूच्या कांहीं बाटल्यांवर भाळला व मराठ्यांच्या हितास त्यानें धोका आणला हें संभवनीय दिसत नाहीं.

१७४० च्या मे महिन्यांत बाजीराव एकाएकीं मरण पावला. ही बातमी ऐकून रघूजी तावडतोब साताऱ्यास आला. बाजीरावानंतर पेशवाईचीं वस्त्रें बाबूजी नाइकास मिळावीं, असें रघूजीचें मत होतें. शाहूपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. तेव्हां पुन्हां कर्नाटकाचें अर्धवट राहिलेलें काम पुरें करण्याकरतां रघूजी तसाच तिकडे निघून गेला. एवढ्या अवकाशांत कर्नाटकांत बरींच कारस्थानें शिजून राहिलीं होतीं. दोस्त अल्लीच्या मागें त्याच्या मुलास बाजूस ठेवून आपणच कर्नाटकाची नवाबगिरी मिळवावी, या महत्त्वाकांक्षेनें चंदासाहेबानें आपलीं कारस्थानें सुरू केलीं होतीं. अशा परिस्थितींत सफदर अल्लीनें मराठ्यांची मदत मागितली. दोस्त अल्लीचा दिवाण मीर आसद याच्या मार्फत या वाटाघाटी चालू झाल्या. मीर आसद यास रघूजीनें बंधमुक्त केलें. सफदर अल्लीस गादीवर बसवावें, त्रिचनापल्लीवर हल्ला करून चंदासाहेबास कैद करावें असा गुप्त करार या दोन्ही पक्षांत करण्यांत आला. सफदर अल्लीच्या शत्रूंचें निर्मूलन केल्यास मराठ्यांस एक कोट रुपये द्यावे असेंही या करारांत नमूद करण्यांत आलें होतें. पण पाताळयंत्री चंदासाहेबास या गुप्त कराराची बातमी कळली तेव्हां त्यानें फ्रेंचांच्या मदतीनें मराठ्यांशीं दोन हात करण्याचें ठरविलें. व फ्रेंच गव्हर्नर ड्यूमास यानेंही चंदासाहेबास मदत करण्याकरतां आपल्या फौजेची जंगी तयारी केली. मराठ्यांनींही तिकडच्या पुंड पाळेगारांचें साहाय्य मिळविलें. चंदासाहेबाचा बंदोबस्त झाला तर त्यांत तंजावरचें राज्य आपोआपच बचावतें, हें उघड असल्यामुळें प्रतापसिंहानें या कामीं रघूजीला चांगली मदत मिळवून देण्याचें कबूल केलें. त्रिचनापल्ली काबीज करावी, चंदासाहेबाचा कांटा काढून टाकावा व या कामासाठीं प्रतापसिंहानें पंधरा लक्ष रुपये नजर द्यावे असा रघूजी व प्रतापसिंग यांच्यांत तह ठरला. याप्रमाणें जय्यत तयारी करून मराठे चंदासाहेबावर चालून गेले व डिसेंबर महिन्यांत त्यांनीं त्रिचनापल्लीस वेढा दिला. चंदासाहेबानें हा किल्ला चार महिने लढविला. त्यानें आपला भाऊ बंडासाहेब यास मदुरेहून मदतीस बोलावलें. पण मराठ्यांनीं त्याला वाटेंतच गांठून त्याला ठार मारलें व त्याच्या फौजेचा फना

उडविला. तेव्हां असहाय्य झालेल्या चंदासाहेबानें किल्ला मराठयांच्या स्वाधीन केला. चंदासाहेबाची बायकामुलें पादीचरीस होतीं. तो स्वतः व त्याचा वडिल मुलगा रघूजीच्या हातीं सापडला. दोघांच्या सुटकेबद्दल चंदासाहेबानें आठ लक्ष रुपये देऊं केले. रघूजीनें ही गोष्ट मान्य केली नाहीं. त्यास कैद करून मुलासह त्यास सातार्‍यास पाठविलें. चंदासाहेब मराठयांच्या कैदेंत सात वर्षें होता.

रघूजीच्या या कामागिरीबद्दल शाहूनें त्याचा फार गौरव केला. विशेषतः भोसले घराण्याच्या ताब्यांतील तंजावरचें राज्य सुरक्षित राखलें म्हणून शाहूस फार बरें वाटलें. रघूजीस बहुमानाचीं वस्त्रें दिलीं व गोंडवण झाडा तहत कटकची सरदेशमुखीची व मोकाशाची माफी करून दिली. रघूजी भोसल्याचें युद्धकौशल्य व मुत्सद्दीगिरी या मोहिमेंत चागलीच निदर्शनास आली. शाहूचें मन त्याचे बाबतींत प्रसन्न झालें. मराठे सरदार मंडळींत त्याची फार वाहवा झाली.

१७४१ च्या आरंभीं निजाम दक्षिणेंत आला व कर्नाटकच्या या प्रकरणाला निराळेंच वळण लागलें. त्रिचनापल्ली मराठ्यांनीं काबीज केली. चंदासाहेबाला सातारच्या किल्ल्यांत कैद करून ठेवलें व कर्नाटकांतील तंजावरच्या राज्याची सुरक्षितव्यवस्था लावून दिली. हें पाहून निजामाला मराठ्यांच्या संबंधानें अधिकच धास्ती वाटू लागली. त्यानें प्रथम आपल्या बंडखोर मुलाचा बंदोबस्त केला व नंतर मराठयांची दक्षिणेंत वाढत असलेली सत्ता खच्ची करण्याच्या प्रयत्नास तो लागला. रघूजी व पेशवा यांच्यांत बेबनाव घडवून आणण्याच्या कामीं त्याला यश आलें नाहीं. शाहूनें उलट नानासाहेब व रघूजी यांचें सख्य करून दिलें. मराठयांची एकजूट फुटत नाहीं, असें पाहतांच खुद्द कर्नाटक प्रांतावरच स्वारी करण्याचें त्यानें ठरविलें. कर्नाटकचा प्रदेश बादशहाच्या दक्षिणेंतील सहा सुभ्यांत मोडत होता तेव्हां या सुभ्यांचा बादशहानें नेमलेला सुभेदार या नात्यानें निजामानें अर्काटच्या नबाबाकडे खंडणीची मागणी केली. दोस्त अल्लीचा मुलगा सफदर अल्ली या वेळीं अर्काटच्या गादीवर होता. त्यानें खंडणीकरतां म्हणून आपल्या रयतेकडून पुष्कळ पैसा जमाविला होता. सफदरअल्ली यामुळें अत्यंत अप्रिय झाला होता. त्याचा फायदा मूर्तिजा-

अलीनें घेतला. त्यानें सफदरअलीचा खून केला व तो स्वतःच अर्काटचा नबाब बनला. राजघराण्याची ही आपसांतील बंडाळी निजामाच्या चांगली पथ्यावर पडली. बरोबर मोठी फौज घेऊन त्यानें कर्नाटकावर स्वारी केली. १७४३ च्या मार्च महिन्यांत तो अर्काटला येऊन दाखल झाला. निजामच्या या फौजेला तोंड देण्याचें सामर्थ्य बंडखोरांपैकीं एकाच्याही अंगीं नव्हतें. अर्काट काबीज करून व तेथें अनवरुद्दिन नांवाच्या सरदारास बंदोबस्ताकरतां ठेवून निजाम त्रिचनापल्लीवर चालून आला. मुरारराव घोरपड्यानें निजामाशीं युद्धाचा प्रसंग आणला नाहीं. निजामानें गुत्तीचें राज्य मुराररावाकडे कायम केलें व मोठी रक्कम भरून त्यानें त्रिचनापल्ली आपल्या ताब्यांत घेतली. याप्रमाणें मराठयांनीं कर्नाटकांत केलेल्या कामगिरीवर बोळा फिरवून निजाम गोवळकोंडयास परत आला. आपला नातू मुलीचा मुलगा मुजफरजंग याजकडे त्यानें कर्नाटकचा कारभार सोंपविला.

निजामाचा हा उपद्व्याप शाहूच्या कानावर आला. त्यावेळीं त्याला फार उद्वेग वाटला. पण या नाहीं त्या कारणानें कर्नाटकाच्या या प्रकरणाकडे मराठयांना लक्ष देतां आलें नाहीं. कर्नाटकाच्या मोहिमेचें काम मागे पडत चाललें. १७४० पासूनचीं दोन तीन वर्षें शाहूच्या कारकीर्दीत मोठीं जिकीरीचीं गेलीं. नानासाहेब पेशवा हिंदुस्थानांत व रघूजी भोसले बंगाल्यांत गुंतले होते. बाजीरावाच्या मरणानंतर नानासाहेबाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. शाहूनें आपल्यावर टाकलेला विश्वास सार्थ करून दाखविण्याकरितां नानासाहेबास या दोन तीन वर्षांत अविश्रांत श्रम घेऊन उत्तरेंतील मराठयांच्या मुलखाचा बंदोबस्त करावा लागला. रघुजी कर्नाटकांत गुंतल्यामुळें बंगाल्यांत त्याच्या सरदारांची जी ओढाताण झाली ती सावरण्याकरितां तिकडे त्याला लक्ष द्यावें लागलें. त्याचा बरोबर फायदा निजामानें घेतला. १७४३ च्या उन्हाळयांत त्रिचनापल्लीची हकीकत ऐकून शाहूचा जीव तुटत असतांही त्याला त्या बाबतींत कांहीं करतां आलें नाहीं. याच वर्षाच्या मे महिन्यांत शाहूची प्रकृति अतिशय बिघडली. दीड दोन महिने तो अंथरुणावर खिळून होता. आजारांतून बरा होऊन राज्याच्या कारभाराकडे तो लक्ष देऊं लागला तों रघूजी व नानासाहेब यांच्यांत वितुष्ट वाढलेलें त्याला दिसून आलें. आणि या सर्व गोष्टींच्या मुळाशीं बाबूजी नाईक असल्याचेंही त्याला आढळून आलें.

बाबूजी नाईक पुण्यास राहून अनेक उपद्व्याप करूं लागलेला पाहून नाना-साहेबानें त्यास पुण्याच्या बाहेर घालवून दिलें. रघूजीच्या शिफारशीने त्यानें शाहूपासून बारामतीस नवीन जहागीर मिळविली. तेथें नवीन वाडे बांधून तेथें तो आपल्या कुटुंबांतल्या मंडळीसह राहूं लागला. पण तेथें तो स्वस्थ चित्तानें राहिला नाहीं. १७४१च्या स्वारींत तो रघूजी भोंसल्याबरोबर होता. या स्वारींत तर मराठे सरदारांनीं खूप पैसा मिळविला, हें त्यानें पाहिलें होतें. तेव्हां त्याच्याही तोंडास पाणी सुटलें. कर्नाटकचा सुभा आपल्या नांवानें करून घ्यावा म्हणून त्यानें खटपट सुरू केली. बाबूजी नाईक हा एक मोठा सावकार. सावकारीचा धंदा करून तो राहतां तर त्याबद्दल पेशव्यास वैषम्य वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण पेशव्याविरुद्ध शाहूच्या दरबारांत ज्या खटपटी चालत त्यांत तो सामील झाला होता. व सावकारीपलीकडे आणखी जास्त उद्योग करण्याची त्याला हांव होती व रघूजीसारखा एक मोठा सरदार त्याला पाठीशीं मिळाल्यामुळें त्याच्या या महत्त्वाकांक्षेला उत्ते-जन मिळालें होतें. नाइकाला कर्नाटकचा सुभा मिळाला तर त्याचें व रघू-जीचें पारडें जास्ती वजनदार होईल व आज ना उद्यां तें आपल्याला घातक होईल हें नानासाहेबानें जाणलें होतें. पण या बाबतींत नाइकाचाच पक्ष वरचढ झाला व नानासाहेब उत्तरेकडल्या स्वारींत गुंतला असतांना बाबूजी नाइकाकडे कर्नाटकच्या सुभ्याच्या बंदोबस्ताचें काम सोंपविण्यांत आलें. भाऊसाहेब, रघुनाथराव वगैरे पेशव्यांच्या घरचीं मुलें शाहूच्या दरबारीं साता-ऱ्यास असत व तेथील इत्थंभूत हकीकत नानासाहेबास कळवीत. रघुनाथ-राव या वेळीं लहान होता. पण भाऊला मराठ्यांचीं राजकारणें चांगलीं कळूं लागलीं होतीं. पेशव्यांच्या व एकंदर मराठेशाहीच्या हिताच्या दृष्टीनें इष्ट कोणतें व अनिष्ट कोणतें, हें समजण्याइतकी हुशारी भाऊच्या अंगीं होती. यामुळें शाहूनें बाबूजी नाइकावर कर्नाटकाच्या सुभ्याचें काम सोंप-विल्याबरोबर त्यानें नानासाहेबास पुढील मजकूर पत्रानें कळविला, “ बाबूजी नाइकास रा. स्वामींनीं कर्नाटकचा मामला मुकासा सांगून गौरव केला. आबाजी नाइक स्वामीच्या दर्शनास गेले होते, त्यास बहुमान देऊन आबूराव किताब देऊन निरोप दिला. ” शाहूनें बाबूजी नाइकाचा अशा प्रकारचा गौरव केला खरा पण त्यास तो पात्र नव्हता असेंच शेवटीं आढळून आलें.

शाहूच्या कृपेनें जी मामलत बाबूजीस मिळाली तो मामलतीचा मुलूख सावनूरकर नवाबाच्या ताब्यांत होता. त्या प्रांतीं कित्तूर, नवलगुंद, शिरहट्टी, हावनूर व डंबळ येथील देसाई फार प्रबळ होते. हे देसाई व सावनूरकर नबाब बाबूजी नाइकासारख्या सावकाराची थोडीच डाळ शिजूं देणार ? या भागांत उभयपक्षीं झगडा सुरू झाला. त्यांत बाबूजी नाइक फौजेच्या खर्चाखालीं जेरीस आला. तेथल्या संस्थानकांशीं झालेल्या कटकटींत त्याचा पराभव झाला. त्याचा सरंजाम लुटला गेला. फौजेंतील शिपायांनीं खर्चीसाठीं त्याच्या तंबूशीं धरणें घेतलें. या सर्व प्रकारानें गांगरून जाऊन तो साताऱ्यास आला. हा प्रसंग वारण्यासाठीं शाहूपाशीं पांच सात लाख रुपयांची त्यानें मागणी केली. नाइकाची ही मागणी पुरी झाली नाहीं. उलट त्याच्या हातून कर्नाटकाचा बंदोबस्त होत नाहीं, असें पाहून दुसरा सुभा नेमून यांतून मार्ग काढण्याचा शाहूनें विचार केला. आपल्या हातचा सुभा काढून तो दुसऱ्याला देणार, हें पाहून नाइकानें फारच त्रागा केला. शाहूच्या दाराशीं बसून त्यानें उपोषणें केलीं. शेवटीं आत्महत्येचाही प्रयत्न केला. पण अशा त्राग्यानें राजकारणें चालत नसतात. राज्यांतील जबाबदार माणसांना योग्य ठिकाणीं योग्य तींच माणसें नेमून त्यांच्याकडून कामें करून घ्यावीं लागतात. 'ही कमाविशी सदाशिवराव भाऊंच्या नांवें करून तूं हिजवरचा आपला हक्क सोड म्हणजे आम्ही सर्व यथास्थित बंदोबस्त करूं' असें पेशव्यानें नाइकास परोपरीनें सांगून पाहिलें. त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां बाबूजी नाइकास बाजूस सारून या स्वारीचें काम भाऊकडे सोंपविण्यांत आलें.

बाबूजी नाइकास रघूजीचा चांगला पाठिंबा होता. शाहूच्या राण्यांपैकीं थोरली राणी सकवारबाई बाबूजी नाइकाच्या बाजूची होती. तिच्या जवळून नाइकानें कर्ज घेतलें होतें, तें उगवण्यासाठीं नाइकासच पुन्हा कर्नाटकास पाठवावें, असा तिचा आग्रह होता. पण या सर्व गोष्टींकडे नानासाहेबानें दुर्लक्ष केलें व भाऊसच या मोहिमेवर पाठविण्याचें त्यानें ठरविलें. या बाबतींत नानासाहेबानें शाहूची परवानगी घेतली होती कीं नाहीं हा वादाचा प्रश्न आहे. या प्रसंगीं शाहूच्या मनाची केविलवाणी स्थिति झाली होती, एकीकडे रघूजीसारखा एक कर्तबगार सरदार व

थोरली राणी सकवारबाई आणि दुसरीकडे नानासाहेब. दोन्हीही पक्ष समबलच पण त्यांतल्या त्यांत नानासाहेबाकडे पेशवाईचा अधिकार होता. राज्याच्या कारभाराची जबाबदारी त्याच्याकडे होती. खुद्द शाहूनेंच तर रघूजीच्या मर्जीविरुद्ध त्याला पेशवा बनविलें होतें. तेव्हां अशा पेंचप्रसंगीं त्यानेंही नानासाहेबाच्या निर्णयावर हा प्रश्न सोपविण्याचें ठरविलें असल्यास त्यांत कांहींच गैर नव्हतें.

भाऊ वयानें लहान होता तरी त्याच्या आंगची कर्तबगारी मोठी होती. हा पेंचप्रसंग सोडविण्यास तोच समर्थ होता याची पूर्ण जाणीव नानासाहेबाला होती म्हणूनच नानासाहेबानें भाऊचीच या कामीं योजना केली. सल्लामसलतीकरतां भाऊबरोबर महादाजीपंत पुरंदरे व त्याचा हुशार कारकून सखारामपंत बोकील यासही नानासाहेबानीं पाठविलें व जरूर त्या फौजेची व्यवस्था करून दिली. याप्रमाणें ता. ५ डिसेंबर १७४६ रोजीं भाऊ कर्नाटकच्या स्वारीवर निघून गेला.

भाऊची कर्नाटकांत रवानगी झाल्यावर जानेवारी महिन्यांत कृष्णापार होऊन त्यानें आजरें येथें पहिली लढाई मारली. नंतर तुंगभद्रेपर्यंत चालून जाऊन सावनूरकर नबाब व त्या भागांतील देसाई व पुंडपाळेगार यास त्यानें चांगलाच हात दाखविला. सावनूरच्या नबाबापासून पाछापूर, कित्तूर, परसगड गोकाक, यादवाड, बागलकोट, बदामी, नवलगुंद, डंबळ आणि गिरी, तोरगळ हल्याळ, हरीहर, बसवपट्टण वगैरे छत्तीस परगणे त्यानें काबीज केले. याप्रमाणें भाऊवर ज्या विश्वासानें नानासाहेबानें ही कामगिरी सोंपविली त्यास तो किती योग्य होता, हें भाऊने दाखवून दिलें व शिवाजीच्या वेळच्या स्वराज्याचा बराच भाग पुनरपि मराठ्यांच्या स्वराज्यांत सामील करून घेतला.*

याच स्वारीच्या दिवसांत फेब्रुवारी १७४७ मध्यें नानासाहेबानें रामचंद्र बाबास पुढील पत्र पाठविलें त्यावरूनही भाऊसाहेबाच्या आंगची कर्तबगारी लक्षांत आल्याशिवाय राहत नाहीं. "चिरंजीव भाऊ निरोप घेऊन गेल्यावर कित्तूर ठाणें नारायणराव घोरपड्याचें गेलें होतें. ते घेऊन दिल्हे. पुढे मजल दरमजल सोंधयाचे लगत्यांत गेले आहेत. सावनुरकरांचा तह रद्द होणें तो होत आहे.

---

* म. रि. म. वि ३ पा. ७ (ऐ. ले. सं.)

यांची रदबदल लागली आहे. बिदनुरास वकील गेले आहेत. फिरंगीयावरी दबाब असे. जयराम सावंत येऊन भेटले आहेत. तेही आपले साहित्याच्या गोष्टी बोलतात कीं, रेडी वगैरे फिरंगियानें घेतले आहेत त्यास तंबी पोह्योंचवून द्यावी, आपली स्थापना करावी. फिरंगी आपली बोली बोलतात कीं, सावंत आम्हीं समजोन घेऊं, तुम्ही त्याचा पक्ष न धरावा. या प्रकारचें वर्तमान आहे, पहातां अर्थी फिरंगी बेइमान, त्यांचे पारिपत्य करावें तरी ये समयीं बनत नाहीं. दोनही अलग अलग राखले आहेत. कां कीं सावनूरचा दारमदार करणें तो करून घेऊन, सोंधेकराची ही मामलियत चुकवून बिदनूरकराकडे जावें, तेथील मामलियत विल्हेस लावून खबरदार होऊन राखावे सारे पटाण एकवट करावे. नाइक आले तरी त्यास धुडावून द्यावे.' *

कर्नाटकांतलि नबाब व देसाई पुंड पाळेगार यांचा बंदोबस्त करण्यासाठीं भाऊस कर्नाटकांत पाठविलें होतें. या भागांत फिरंग्यांनींही धुमाकूळ घातला होता. त्याचेंही पारिपत्य पेशव्याला करावयाचें होतें. पण एकाच वेळीं सर्व शत्रूंना अंगावर घेणें योग्य नाहीं, ही गोष्ट भाऊनें पूर्णपणें लक्षांत ठेवली होती. यामुळें तो फिरंग्याच्या वाटेस फारसा गेला नाहीं, पुढें मार्च महिन्यांत मायनहळ्ळी येथें झालेल्या लढाईत भाऊनें विजय संपादन केला. कर्नाटकच्या या मोहिमेंत गुत्तीच्या मुरारराव घोरपड्यानें मराठ्यांना मदत करणें जरूरीचें होतें. पण तो या मोहिमेंत सामील झाला नाहीं. मायनहळ्ळीच्या लढाईनंतर भाऊनें बहादुरभिंडा घेतला व तो मार्चमध्यें परत फिरला. नानासाहेब यावेळीं साताऱ्यास होता. शाहूची त्याजवर इतराजी झाली होती. कांहीं दिवस त्याचें पेशवाइपदही शाहूनें काढून घेतलें होतें. हा अधिकार पुन्हा मिळाल्यावर निरोपाचीं वस्त्रें घेऊन साताऱ्याहून बाळाजी निघाला तों तेथून पंढरपुरास जाऊन ता. ९ मे १७४७ रोजीं जेजुरीस आला. भाऊची व त्याची गांठ येथें पडली व हे उभयतां नंतर पुण्यास आले. भाऊनें कर्नाटकची ही मोहीम यशस्वी रीतीनें पार पाडली. कर्नाटकांत पूर्ववत् त्यानें मराठ्यांचा शह बसविला. या मोहिमेंत पैशाचीही बरीच प्राप्ति झाली. स्वतंत्रपणें आपल्या जबाबदारीवर स्वारीवर जाण्याचा भाऊचा हा

* म. रि. म. वि. ३ पा. ९६. ( ऐ. ले. सं. )

पहिलाच प्रसंग होता. या प्रसंगीं पूर्णपणें विजयी होऊन परत आल्यामुळें त्याच्या अंगची कर्तृत्वशक्ति लोकांच्या नजरेस आली. भाऊला या मोहिमेंत चांगला अनुभव मिळाला. या भागांतील अनेक कारस्थानांची माहिती त्याला झाली. अनेक हिंदू, मुसलमान संस्थानिकांशीं त्याचा संबंध आला. कोणाशीं कसें वागावें व आपला कसा मतलब साधावा, हेंही त्यास कळून आलें.

' नाईक आले तरी त्यास धुडावून लावावें ' असें नानासाहेबानें रामचंद्र बाबास पाठविलेल्या पत्रांत उल्लेखिलें आहे, त्यावरून नाइक सुद्धां यावेळीं कर्नाटक भागांत गेला होता, असें दिसतें. पण भाऊनें तिकडे जाऊन धूमधडाका उडविला त्यावेळीं नाइक कोठें होता व त्यानें काय कामगिरी केली याचा उल्लेख मात्र कोठें आढळत नाहीं. नाइकानें तिकडे जाऊन कांहीं पराक्रम केलेला असो किंवा नसो. कर्नाटकासंबंधीं नाइका–पेशव्यांचा तंटा या मोहिमेनें मिटला नाहीं हें मात्र खास. शाहूच्या मरणानंतर नानासाहेब स्वतःच्या मुखत्यारीनें वागूं लागला त्यावेळीं कर्नाटकांत वारंवार मोठमोठ्या फौजा पाठवून तिकडील बंदोबस्त त्यानें केला. कर्नाटकाच्या मोहिमेचें भानगडीचें स्वरूप लक्षांत घेतां केवळ नाइकाच्या हातून हें काम निभावलें नसतें याकरतां भाऊसारख्या कर्तबगार व शूर माणसांचीच गरज होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

यानंतर बऱ्याच वर्षांनीं १७५७ मध्यें नानासाहेबांनीं कर्नाटकावर खुद्दच स्वारी केली. या वेळीं भाऊसाहेब त्यांच्या बरोबर होते. मराठ्यांनीं श्रीरंगपट्टणावरच मोर्चे लावले. त्यांना तोंड देण्याचें सामर्थ्य नंद राजाचे ठिकाणीं नव्हतें. तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या. मराठ्यांनीं ३२ लक्ष रुपयांची मागणी केली. नंद राजानें कसें तरी करून पांच लक्ष रुपये मराठ्यांना रोख दिले, व बाकीच्या रकमेच्या फेडीकरतां म्हैसूरच्या राज्यांतील उत्तम चौदा परगणे मराठ्यांच्या ताब्यांत दिले. शिऱ्याचेंही राज्य मराठ्यांनीं काबीज केलें व पावसाळा सुरू झाल्यामुळें नानासाहेब परत आले.

---

# रामराजा



ता. १५ डिसेंबर १७४९ रोजीं शाहुनगर येथील रंगमहालच्या वाडयांत शाहुछत्रपति मरण पावला. थोरली राणी सकवारबाई त्याच्या-बरोबर सती गेली. शाहूची दुसरी स्त्री राणूबाई व आणखी दोन नाटकशाळाही सती गेल्या. एवढा मोठा राजा निधन पावला व त्याच्याबरोबर कोणी सती गेलें नाहीं म्हणजे काय ? दुर्लौकिकच ! तेव्हां या लौकिकाच्या रक्षणासाठीं रजपुतांप्रमाणें मराठी राज्यांतही ही प्रथा रूढ झाली होती. राजाच्या शवा-बरोबर जितक्या राण्या व रखेल्या आपल्याला जाळून घेतील तितका त्याचा लौकिक जास्त ! रघूजी भोसले मरण पावला त्यावेळीं तेरा राण्यांनीं त्याच्या चितेंत आपल्याला घालून घेतलें ! सकवारबाई ही तर थोरली पट्टराणी. हिच्या मनांत खरोखरी सती जावयाचें नव्हतें. शाहूच्या मागें एकाद्या मुलाला दत्तक घेऊन कर्तेपणानें गादीचा कारभार चालवावा, अशी तिची फार फार महत्त्वाकाक्षा होती. पण ती सफल होऊं शकली नाहीं.

शाहू मरणापूर्वी चार पांच महिने अंथरुणावर पडून होता. दुखण्यांतून तो वांचत नाहीं अशी त्याची व इतरांचीही खात्री झाली होती. तो निपुत्रिक, औरस संतति नाहीं. तेव्हां अर्थातच त्याच्या मागें साताराच्या गादीवर छत्रपति म्हणून कोणाला बसवायचें याचा खल सुरू झाला. त्यावेळीं या बाबतींत पुढील चार प्रकार दरबारी मंडळीपुढें होते. (१) कोल्हापुरच्या संभाजीला साताराच्या गादीवर आणून दोन्ही राज्यें एक करावीं. (२) मालो-जीच्या मूळ वंशांतील विठोजी किंवा शरीफजी यांच्या वंशांतील एकाद्या मुलाला दत्तक घ्यावें. (३) सकवारबाई थोरली राणी तेव्हां तिच्या मर्जीप्रमाणें तिला दत्तक घेऊं द्यावा. (४) ताराबाईचा नातू रामराजा गुप्त होता त्यास आणून राज्यावर बसवावें.

यापैकीं पहिला मार्ग सर्वांनीं पसंत केला असता तर त्यांत कांहींच गैर नव्हतें. नानासाहेबानें व चिमाजीनें तशा प्रकारचा गुप्त करार दहा वर्षांपूर्वींच केला होता. तेव्हां भाऊला तो मान्य नव्हता, असें म्हणण्याचें कांहींच कारण नव्हतें. चिमाजीनें केलेला हा करार अत्यंत दूरदर्शीपणाचा होता. पण तो विचार मागें पडला. पेशवा, चिटणीस व दुसरे कारभारी यांनीं शाहूच्या मतानें जें करणें तें करावें असें ठरविलें. शाहूला वरील गोष्ट पसंत पडणें शक्यच नव्हतें. शिवाय संभाजीही आतां वयातीत झाला होता. त्याला पुत्रसंतान नव्हतें. शाहूइतकी आवरशक्तीही त्याच्या ठिकाणीं नव्हती. त्याच्या निधनानंतर पुन्हा दत्तकाचा प्रश्न उद्भवणारच होता. संभाजीच्या विरुद्ध आणखी एक बलवत्तर कारण होतें. शाहू व संभाजी यांच्यांत पूर्वीं समेट घडून आला होता. दोघेही एकमेकांच्या गळां पडून कडकडून भेटले होते. संभाजीनें वर्ष दोन वर्षांनीं साताऱ्यास राहून आपला हा स्नेह वाढविण्याची कल्पनाही निघाली होती, पण ती योजना फार दिवस टिकली नाहीं. संभाजीच्या दुबळेपणानें म्हणा किंवा त्याची बायको जिजाबाई इच्या कारस्थानी स्वभावामुळें म्हणा किंवा शाहू व पेशवे यांच्याविरुद्ध असलेले सरदार व निजाम यांना साताराच्या गादीला वारंवार शह देण्यास संभाजीचा उपयोग होत होता म्हणून म्हणा, शाहूनें व संभाजीचें वैर कायम राहिलें व शाहूनें अशा परिस्थितींत संभाजीस साताऱ्यास आणूं नये, अशी निक्षून आज्ञा केली. भोसले कुटुंबांतील अगदीं बाहेरचा इसम दत्तक घेण्याची ही कल्पना शाहूस पसंत होती. पण सकवारबाईची महत्त्वाकांक्षा तिच्या आड आली. दत्तकच घ्यायचा तर तो आपल्याच पसंतीचा घ्यावा व साताराच्या कारभारावर आपला वरचष्मा राखावा, ही तिची महत्त्वाकांक्षा होती. भोसल्यांच्या कुळांत यावेळीं आणखी एक महत्त्वाकांक्षी स्त्री ताराबाई, अत्यंत हुशार, कावेबाज व उलाढाल्या स्वभावाची अशी ही स्त्री होती. तिलाही पुढें येण्याची हीच संधि होती. शाहूनें आपल्या हयातींतच त्याच्या इच्छेप्रमाणें भोसले घराण्यांतला एकादा मुलगा दत्तक घेतला असता तर कांहीं बिघडलें नसतें या शेवटच्या दुखण्यांत शाहूला तसें कांहीं करण्याचें धैर्य झालें नाहीं. थोरल्या राणीच्या मनाविरुद्ध एकादी गोष्ट करावी तर त्याचा परिणाम काय होईल ? ही बाईच या नवीन मुलाच्या बाबतींत कांहीं कोटाळ करणार नाहीं कशावरून ?

आपल्या मागें या नवीन मुलाच्या जीवावरच प्रसंग यावयाचा. या भीती-मुळें शाहूनें हा विचार केला नाहीं, असें स्पष्ट दिसतें. या दुखण्यात तो फारसा शुद्धीवर नसे. त्याला बुद्धिभ्रंश झाला होता. जेव्हां केव्हां तो ताळ्यावर येई त्यावेळीं यापुढील व्यवस्थेसंबंधीं गोष्टी चालत. संभाजीला जर गादी-वर आणायचें नाहीं तर सकवारबाईला तिच्या मनाप्रमाणें करूं देण्यास कांहींच हतकत नव्हती. पण खुद्द शिवाजीच्या घराण्यातला राजारामाचा नातू जिवंत असतांना दत्तक काय म्हणून, असें ताराबाईनें सुचविल्यामुळें सकवारबाईची योजना मागें पडत चालली. सकवारबाईचा दत्तक असो किंवा ताराबाईचा रामराजा असो दोघांपैकीं कोणी जरी आला तरी साताऱ्च्या कारभारांत सकवारबाई व ताराबाई या दोघींपैकीं कोणातरी बाईचा वरचष्मा होण्याचा प्रसंग आलाच! अशा परिस्थितींत ताराबाईच्यापेक्षां सकवारबाई पेशव्यांना फारशी जड गेली नसती. पेशव्यांनीं व चिटणिसांनीं सकवार-बाईला या कामीं मदत करण्याचें ठरविलें असतें तर चालण्याजोगें होतें. पण शिवाजीच्या अस्सल वंशाचाच प्रश्न पुढें आला व ताराबाईनें यासंबंधानें शाहूची खात्री करून दिली. त्यामुळें सकवारबाई मागें पडली. पुढल्या व्यव-स्थेचा प्रश्न शाहूच्या संमतीनेंच झाला पाहिजे असाच निश्चय दरबारी मंड-ळींनीं केल्यामुळें सकवारबाईच्या योजनेकडे कोणीच लक्ष देण्यास तयार नव्हतें. ताराबाईचा रामराजा मान्य झाला तर ती आपल्याला निर्माल्यवत् करून सोडणार. ही गोष्ट सकवारबाईला केव्हांही सहन होणें शक्य नव्हतें. शाहूनंतर या दोन्हीही महत्त्वाकांक्षी बाया जिवंत राहिल्या तर साताऱ्च्या कारभारांत कोणत्या कटकटी केव्हां उत्पन्न झाल्या असत्या याचा नेमच नव्हता. या परिस्थितीचा फायदा घेण्यास पेशव्यांचे शत्रू तर टपलेलेच होते. तेव्हां दोघींपैकीं कोणी तरी खतम व्हावयास पाहिजेच होतें. रामराजा ताराबाईचा नातू असल्यामुळें ती तर पेशव्यांच्या डोक्यावर मिरें वाटण्यास राहाणारच होती. प्रश्न राहिला काय तो सकवारबाईचा. अर्थात् शाहूच्या निधनाबरोबर तिलाही मोक्षाला पाठविण्याची कल्पना निघाली असल्यास कांहींच नवल नव्हतें. किती निर्घृण व दुष्ट कल्पना ही! राजकारण काय काय करूं शकत नाहीं! प्रतिनिधी, अक्कलकोटकर, राजाज्ञा दाभाडे आदिकरून सर्व लहान थोरांनीं अगदीं एक विचारानें ठरविलें

कीं, सकवारबाईसाहेबांस सती 'घालवावी; न जातील तर बळें न्यावी, महाराजां-मागें दुर्लौकिक बखेडा करतील, मग विचारी पडावे नीट नाहीं. आतांच शेवट केला पाहिजे.' आश्चर्याची गोष्ट ही कीं, दरबारी मंडळीच्या या विचाराला सकवारबाईच्या खुद्द भावाचेंही पाठबळ मिळालें. ' उद्या या ब्राह्मणाशिवाय राज्यास आवर घालील असा दुसरा सरदार नाहीं. तूं उगाच भलत्याच्या नादी लागून मागें राहशील तर यांचे हरभरे भरडावे लागतील, यांत तुझा पुरुषार्थ नाहीं. . . तूं आपला लौकिक मिळवून जा.' दरबारी मंडळींनीं सकवारबाईला सती घालविण्याचें ठरविलें व खुद्द भावानें या नाहीं त्या रूपानें या निश्चयास पाठिंबा दिला तेव्हां दरबारी मंडळी एवी तेवी आपल्याला जिवंत राहूं देणार नाहींत, असें दिसल्यावर सकवारबाईची उमेद खचली व तिनें सती जाण्यास कबूली दिली व योग्य त्या समारंभानें ती सती गेली. सकवारबाईची ही सती कसली ? तो एक खूनच होता ! या खुनाचा आरोप केवळ एका पेशव्यावरच ठेवणें योग्य नाहीं. सगळ्यांनीं मिळून केलेला तो एक सामुदायिक खून होता. उलट पक्षीं पेशव्यांनीं या गोष्टीस आपली संमतीच दिली नसती, तर सकवारबाईला सती घालविण्याची कोणाचीच छाती झाली नसती, हें तितकेंच खरें आहे. हें सर्व कारस्थान पेशव्याच्या मतानेंच रचण्यांत आलें होतें. पेशव्याला ही गोष्ट पूर्णपणें माहित होती व त्याचा या निर्णयाला पाठिंबा होता हें उघड आहे. अशा परिस्थितींत पेशव्यांनीं सकवारबाईला सती घालविली म्हणजे पर्यायानें तिच्या खुनाला मदतच केली होती ! शास्त्रसंमत व रूढीसंमत असा हा खून होता.

पण या कृत्याला खून तरी कसें म्हणावें ? सकवारबाई राजीखुषीनें सती गेलेली दिसते. सहगमनाची सिद्धता झाली. तिनें हळदीकुंकवाचीं वाणें दिलीं. गोप्रदानाचा वगैरे दानधर्म केला आणि विशेष गोष्ट म्हणजे शाहूच्या कानांतील कुडयांची जोडी सकवारबाईनें प्रसाद म्हणून पेशव्यास दिली ! असेंही या समारंभाचें वर्णन करण्यांत आलें आहे. एकादी तरुण स्त्री चोहोंकडून घेरली गेली, सुटकेचा कोणताच मार्ग तिला दिसेनासा झाला अशा आपत्तींत ती गरीब गाय आपलें शरीर दुसऱ्याच्या स्वाधीन करण्यास तयार झाली तर तिनें राजीखुषीनें ही गोष्ट केली, असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. कदाचित् कायद्यानें हा जबरी संभोगाचा गुन्हा ठरणार

नाहीं इतकेंच. सकवारबाई सती गेली! ती नाउमेद झाली, हताश झाली, आपल्यावर जबरदस्ती होईल, हेंही तिला माहित होतें. अशा परिस्थितींत ती सती जावयास तयार झाली म्हणून तें कृत्य तिनें राजीखुषीनें केलें, असें कसें म्हणतां येईल? पोलिसच्या बंदोबस्तांत फांशीची शिक्षा झालेला मनुष्य फांशीच्या फळीवर चढतो, आप्तेष्टांच्या तो भेटी घेतो व शेवटच्या प्रेमाच्या गोष्टी तो बोलतोच. मराठी राज्याच्या एका मोठ्या धन्याच्या पट्टराणीची ही कथा! मग सामान्य स्त्रीच्या बाबतींत समाज त्या वेळीं कसा वागत असेल, याची कल्पनाच करावी. बंगालमध्यें तर असे अत्याचार त्या वेळीं हरघडी घडत होते.

या प्रकरणांत नानासाहेबांचा हात होताच. पण सदाशिवराव भाऊच्या मताचा यांत कोठेंच उल्लेख नाहीं. भाऊ व रामचंद्रबाबा यांना नानासाहेबानें आपल्या कारभारांत घेतलें होतें. भाऊची संमति या गोष्टीस असती तर त्याचा उल्लेख अवश्य आला असता. अमात्याच्या बखरींत सहगमनाचे प्रसंगीं 'सकवारबाईचे पुढें सदाशिव चिमणाजीनें करंडा ठेवला' असें म्हटलें आहे, पण रियासतकारानीं भाऊसाहेब या वेळीं साताऱ्यास नव्हता तो पुण्यास होता. 'सदाशिव चिमणाजी मागून ६ दिवसांनीं २० डिसेंबर रोजीं पुण्याहून साताऱ्यास आला' अशी टीप देऊन वरील करंडा ठेवण्याच्या हकीकतीचा इन्कार केला आहे. कांहीं असो, या पापाची जबाबदारी नानासाहेबावरच होती. भाऊचा या कारस्थानाशीं कांहींच संबंध नव्हता. नानासाहेब शूर असण्यापेक्षा तो अधिक मुत्सद्दी होता. मुत्सद्दी व राजकारणी माणसाला सर्व गोष्टी माफ होतात व भपकेदार स्वरूप देऊन त्याला त्या पचवितांही येतात.

एकंदरींत शाहूला आपल्या मरणापूर्वी राज्याची कांहींच व्यवस्था करतां आली नाहीं. मरणानंतर त्यानें लिहून ठेवलेल्या दोन याद्यांच्या आधारें रामराजाला आणून नानासाहेबानें त्याला साताऱ्याच्या गादीवर बसविलें.

यादी—१—राजमान रा बाळाजी प्रधान पंडित यास आज्ञा. तुम्ही फौज धरनें. सर्वांस आज्ञा केली त्यांच्या दैवी नाहीं. महाराजांस लिखनें झालें नाहीं. बरे होत नाहींत राज्यभार चालला पाहिजे, तर पुढें वंश बसवनें. कोलापुरचें न करनें. चिटणीसास सर्व सांगितलें तसें करनें. वंश होईल

त्याच्या आज्ञेंत चालून राजमंडळ चालवनें. चिटणीस स्वामीचें विश्वासू. त्याच्या तुमच्या विचारें राज्य राखनें. वंश होईल तो तुमची घालमेल करणार नाहीं. सुज्ञ असा.

यादी–२— राजमान रा बाळाजी पंडित प्रधान आज्ञा जे. राज्यभार तुम्ही चालवाल हा भरंवसा स्वामीस आहे. पाहिलें सांगितले त्याची खातरजमा. ती चिटणिसानीं आढळ केली. तुमचे मस्तकीं हात ठेवला आहे; वंश होईल तो तुमचें प्रधानपद चालवील, करील अंतर तर शपथ असे. त्याचे आज्ञेंत चालून सेवा करनें. राज्य राखनें बहुत काय लिहिनें. सुज्ञ असा.*

या दोन याद्या म्हणजे पेशव्यांनीं आपल्याकरतां मिळविलेल्या मराठी राज्याच्या सूत्रचालकत्वाच्या सनदाच होत्या. या दोन्ही याद्यांत जवळजवळ सारखाच मजकूर आहे. पहिल्या यादींत चिटणीस व पेशवे या दोघाच्या विचारें राज्य राखावें असें म्हटलें आहे पण असा मुळमुळीतपणा उपयोगी नाहीं म्हणूनच कीं काय पेशव्यानीं दुसरी यादी शाहूकडून लिहून घेतली. त्यांत चिटणीसाचें नांव नाहीं. पेशव्यानीं तींत शाहूकडून वरदहस्त संपादन केला आहे. पेशवेच राज्यकारभार चालवतील असें पूर्ण भरंवशाचें आश्वासन त्यांनीं मिळविलें आहे. वारंवार बुद्धिभ्रंश होत असलेल्या व सर्वतोपरि जिकीरींत सांपडलेल्या शाहूकडून केव्हांही एक लक्ष फौज जमा करूं असें छातीवर हात ठेवून सांगणाऱ्या पेशव्यांनीं आपल्या ताकदीच्या जोरावर शाहूकडून या सनदा मिळविल्या. शाहूनें प्रतिनिधीला विचारलें, त्या बिचाऱ्यानें जास्तींत जास्त तीस हजार फौज आपल्याजवळ असल्याचें सांगितलें. ज्याच्याजवळ फौज जास्त तो अर्थात् अधिक ताकतीचा व सामर्थ्यवान्. सर्व मराठी राज्यांत पेशव्याइतक्या ताकतीचा व कर्तृत्ववान माणूस कोणीच नव्हता. तेव्हां शाहूनें आपल्यामागें मराठी साम्राज्याच्या सर्वाधिकाराचें उदक पेशव्याच्या हातांत सोडलें, हें साहजिक होतें. यांत शाहूचा दोष नाहीं. पेशव्यांचा दोष तर नाहींच नाहीं. गेल्या दोन पिढयांत वाढलेलें मराठी साम्राज्याचें सामर्थ्य व वैभव टिकून रहावयाचें असल्यास मध्यवर्ती सत्ताही तशीच भरभक्कम व बळकट पाहिजे, ही गोष्ट नानासाहेब पूर्णपणें जाणून होता. शाहू हयात होता

---

* अस्सल कागद य. रा. गुप्ते इ. सं.

तोंपर्यंत पेशव्यास या गोष्टीचा विचार करण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण शाहूनंतर एकाद्या दत्तक मुलाकडून शाहूप्रमाणें अधिकारानें हें काम होणें शक्य नव्हतें. गादीचा मान राखण्यापुरताच या मुलाचा उपयोग होता. ही मध्यवर्ती सत्ता आत्मविश्वासानें परजणारा पुरुष यावेळीं पेशवाच होता. त्यामुळें शाहूनें आपल्या मनाच्या हलाखीच्या स्थितींत जें केलें किंवा पेशव्यांनीं त्याच्याकडून करवून घेतलें तें मराठी साम्राज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें योग्यच होतें, असें स्पष्ट दिसून येतें. पण साम्राज्याच्या रक्षणाच्या दृष्टीनें ही गोष्ट कितीही योग्य असली तरी साम्राज्यातील अनेक मराठे सरदारांना पेशव्यांच्या हातांत सर्व सत्ता गेली ही गोष्ट मात्र खास आवडली नाहीं. उलटपक्षी शाहूच्या आज्ञेप्रमाणें गादीवर येणाऱ्या रामराजाच्या आंगीं तसे अलौकिक गुण असते व शाहूनें ज्या अधिकारानें व विश्वासानें कारभार चालविला तितक्याच चोख रीतीनें त्यानें कारभार चालविला असता तर पेशव्याला त्याच्यापुढें मान वाकवावीच लागली असती. पण तशी गोष्ट घडली नाहीं. शाहूनें अशा याद्या करून देण्यापेक्षां रामराजास स्वतः आपल्या डोळ्यांदेखत गादीवर कां बसविलें नाहीं, हा प्रश्न शिल्लकच राहतो. थोडक्यांत सांगायचें म्हणजे सकवारबाई जिवंत होती; तिचा या गोष्टीस कट्टर विरोध होता. रामराजाला गादीवर बसविल्यानें ताराबाईचें वर्चस्व वाढतें, ही गोष्ट तिनें कधींच सहन केली नसती. तिला भांडणाची खुमखुम विशेष होती. आपला हेतु सिद्धीस नेण्यासाठीं कोणतेही बरेवाईट उपाय योजण्यास तिनें कमी केलें नसतें. 'सकवार राहिल्यास राज्याचा डोहाणा करील. राज्य बुडावील, कोणाचे पाय भुईस लागूं देणार नाहीं' अशी भीति शाहूलादेखील वाटत होती. आपण जिवंत असतांना रामराजास गादीवर बसविलें तर ही बाई त्याचा घातपातही करायची. या दहशतीनेंच त्यानें हा विचार रहित केला असला पाहिजे हें उघड आहे.

'पाणगावामध्यें राजा असे, तो निघोन सप्तऋषीस (साताऱ्यास) येत असे. त्यास हें वर्तमान आपणास विदीत आहे की नाही कळत नाहीं. यावें यामध्यें उत्तम नाही. मातुश्री सकवारबाईचा मजकुर तर आपणाला विदित च आहे. ती चिंतीतात जे एक वेळ आपल्या हातीं यावा, मग ईश्वर आहे. महाराजांचा चितांतील शोध घ्यावा तर तुर्त समाधान नाहीं, यास्तव धनीण

जवळ असे, बोलता येत नाहीं. बरे जाहलेवर चित्तांतील शोध करुन लिहुन पाठवितो तंव उतावळी करून आणाल तर न आणणें. येथें आलेवर परिणाम बरा नाहीं. तुम्ही सुखरूप राहणें. राजश्री बरे जाहलेवर आम्ही निरोप घेऊन येतो, मग आपले चित्तामध्यें जावयाचें असेल तर निरोप देऊं परंतु तुम्ही तूर्त आहे ऐसाच असो देणें तुम्ही तेथेंच राहणें. खर्चाविचा राजश्री जाणोजी पवार यास लिहिलें असें ते देतील. सकल वर्तमान शिवाजीपंत लिहितील. पत्र फाडून टाकावें.'* या पत्रानंतर शाहूचा मनोदय विचारांत घेऊन शाहूच्या पश्चातच रामराजाला साताऱ्यास आणावयाचें असेंच ठरविण्यांत आलें. शाहूच्या मृत्यूनंतर लगेच दुसऱ्या दिवशीं बार्शी पानगांवाहून रामराजाकरितां मंडळी पाठविण्यात आली. रामराजा ज्याच्या जवळ होता त्या गोंधळयाला पांच हजार रुपये दिले. फौजेसुद्धां ता. २६ डिसेंबर रोजीं रामराजे कृष्णाकाठीं वडूथाजवळ आले. त्याच्याबरोबर त्याची बहीण दर्याबाई निंबाळकर हिलाही आणण्यांत आलें होतें. ताराबाईची व त्याची भेट शकुंतेश्वराच्या देवालयात झाली. महाराज वारल्याची बातमी पुण्यास पोंचल्यानंतर ता. २० डिसेंबर रोजीं भाऊ साताऱ्यास आला. वडूथास जाऊन त्यानें रामराजाची भेट घेतली. शाहू महाराजांचा तेरावा संपल्यावर ता. ४ जानेवारी १७५० रोजीं सुमुहूर्तावर रामराजा सातारा शहरांत दाखल झाला. श्रीमंतांनीं रामराजास पोषाख दिला. त्याच दिवशीं राज्यावर बसविलें रामराजाचें वय या वेळीं २३ वर्षांचें होतें. रामराजा गादीवर बसल्यावर त्यानें दोन लग्नें केलीं. त्याचा जनानखाना तीन बायकांचा झाला. रामराजा गादीवर बसविल्यावर नानासाहेबानें लगोलग सर्व सरदारांना पत्रें पाठविलीं. राज्यारोहण समारंभ निर्विघ्नपणें झाल्याचें त्यांना कळविलें व रामराजे तेवीस वर्षांचे तरुण व तेजयुक्त आहेत, असेंही त्यांना कळविलें. रामराजा गादीवर बसला त्याच वेळीं राज्यारोहण समारंभानंतर ताराबाई व रामराजे यांनीं सर्वांसमक्ष एका ताटात भोजन केलें व हा राजा भोसल्याच्या अस्सल घराण्यांतील आहे, हें सिद्ध केलें.

रामराजाच्या राज्यारोहणानंतर अष्ट प्रधानांची नेमणूक करण्यांत आली नाहीं. कारण सर्वाधिकार आतां पेशव्यास प्राप्त झाले होते. शाहू जिवंत

* म. रि. म. वि. २

असतांना साताऱ्यास प्रतिनिधीचें महात्म्य विशेष होतें. दरबारी कारभारांत प्रतिनिधीचें अंग असायचेंच, हें लक्षांत घेऊन नानासाहेबानें आपला माणूस म्हणून भवानराव यास प्रतिनिधीच्या जागेवर आणलें. भगवंतराव अमात्याच्या खटपटीनें रामराजाचें रक्षण झालें व तो गादीवर आला म्हणून त्यास अमात्यपद देण्यांत आलें. रामराजा गादीवर आल्याबरोबर वास्तविक ताबडतोब त्याचा शिक्का चालू करावयास पाहिजे होता. पण तिकडे नानासाहेबानें मुळींच लक्ष दिलें नाहीं. रामराजाचें महत्त्व कमी करण्यास आतांपासूनच प्रारंभ झाला. रामराजाचा राज्याभिषेक समारंभ झाल्याबरोबर थोड्याच दिवसांत ताराबाई व पेशवा यांच्यात लढा सुरू झाला. राजारामाच्या मागें शिवाजीला गादीवर बसवून राज्याचा संपूर्ण कारभार ताराबाईनें आपल्या हातीं घेतला. त्याचप्रमाणें रामराजाला गादीवर बसविल्याबरोबर या आपल्या नातवाचा कारभार आपल्या मर्जीप्रमाणें आपण करूं, अशी ताराबाईची महत्त्वाकांक्षा. पेशव्याला ही गोष्ट माहित नव्हती असें नाहीं. ताराबाईचा स्वभाव सर्वांनाच पूर्ण परिचयाचा होता. ताराबाईला अगदीं बाजूस सारावें असें पेशव्याचेंही म्हणणें नव्हतें. पण बायकोचा कारभार, व्यवस्था राहणार नाहीं...आईसाहेबांच्या कानावर सर्व गोष्टी घालाव्या व त्यांच्या संमतीनें शक्य तितकें चालावें एवढाच पेशव्याचा आग्रह होता. राज्याभिषेक होऊन दोन महिने झाले नाहींत तोंच पेशव्यांचें व ताराबाईचें बिनसलें व ती रुसून सातारा सोडून सिंहगडास निघून गेली.

शाहू निधन पावला त्यावेळीं यशवंतराव दाभाडे व रघूजी भोसले यांच्या खेरीज बाकी बहुतेक सरदार साताऱ्यास हजर होते. यांपैकीं कोणाचाच ताराबाईला पाठिंबा नव्हता. रघूजी आपल्याला मिळेल, अशी ताराबाईची कल्पना होती, पण ती खोटी ठरली. रघूजी राज्याभिषेकसमारंभाच्या सुमारास साताऱ्यास आला. ताराबाईनें रामराजास ताटांत घेऊन जेवावें असा आग्रह धरणाऱ्या मंडळींत रघूजी होता. पुढें तो साताऱ्यास पांच सात महिने होता. पण त्यानें ताराबाईचा पक्ष उचलून धरला नाहीं. आपल्या वऱ्हाड वगैरे प्रांतांत पेशव्यांनीं दाखल देऊं नये व पेशव्याच्या कारभारांत आपण ढवळाढवळ करूं नये असेंच धोरण रघूजीनें ठरविलें. १७५० च्या

एप्रिलांत नानासाहेब रघूजीस भेटण्यास साताऱ्यास गेला. भाऊ त्याच्याबरोबर होता. रघूजीनें नानासाहेबास व भाऊस पोशाख देऊन त्यांचा गौरव केला.

रामराजा गादीवर आला. साताऱ्यास तो राहूं लागला व कारभाराकडे तो लक्ष देऊं लागला. साताऱ्यास येतांना त्याच्याबरोबर त्याची बहीण दर्याबाई निंबाळकर होती. छत्रपतीच्या गादीवर तो आरूढ झाला तरी छत्रपतीचे अधिकार तो बजावूं शकत नव्हता. त्याच्या नांवाचा शिक्कासुद्धां तयार करण्यांत आला नव्हता. ताराबाईनें रामराजाला आणलें तेव्हां आपल्या मनाप्रमाणें त्यानें वागावें आपल्या मर्जीनुरूप मुखत्यारीनें साताऱ्चा कारभार करावा अशी ताराबाईची महत्त्वाकांक्षा. पण रामराजाला गादीवर आणल्याबरोबर कोणीच या बाईला कांहीं महत्त्व दिलें नाहीं. ती रुसून सिंहगडास जाऊन राहिली व गोविंदराव चिटणीसांच्या देखरेखेखालीं नानासाहेबांच्या सूचनेबरहुकुम साताऱ्चा कारभार चालूं लागला. रामराजा पन्हाळ्याच्या कारागृहात जन्मला. कोल्हापूरच्या संभाजीच्या भतीनें ताराबाईनें त्याला अमात्यांच्या हवालीं केलें. पांच वर्षांचा होईपर्यंत तो अज्ञातवासांतच होता. पुढें तो पानगांवास मावशीकडे गेला. तेथें त्याला अज्ञातवासातच राहावें लागलें. तेव्हा ही मागची कटकट मिटावी म्हणून तुळजापुराला नेऊन त्यांना भुत्याची दीक्षा देण्यांत आली. कवडयाची माळ, कवडयाचा टोप व कापडाचा पोत घेऊन देवीच्या सेवेस राहिलेल्या व देवीस वाहिलेल्या मुलाची कोणीच चौकशी करीत नाहीं. वयाच्या सात वर्षांपासून तेवीस वर्षांपर्यंत म्हणजे साताऱ्यास गादीवर येईपर्यंत देवीपुढें नाचण्याशिवाय किंवा गोंधळ घालण्याशिवाय त्याला कांहीं माहित नव्हतें. हें सर्व खरें असलें तरी राजघराण्यांत जन्मलेल्या तरुण पुरुषास आपल्या हक्कांची जाणीव होण्यास किती दिवस लागतील ? शिवाय आपण मूळचे कोण हें समजून देण्यास व त्याप्रमाणें वागण्याची शिकवण देण्यास त्याची सख्खी बहिण दर्याबाई त्याच्याबरोबर साताऱ्यास आली होती व त्याच्याजवळच राजवाडयांत रहात होती. शिवाय त्याचें वय तेवीस वर्षांचें होतें म्हणजे तो कांहीं लहान पोरांत जमा नव्हता. कित्येकांच्या मतें त्याचें वय यावेळीं पस्तीस वर्षांचें धरलें तर तो चांगलाच पोक्त होता व बरें वाईट, वाजवी गैरवाजवी, समजण्याइतकी बुद्धि त्याच्या ठिकाणीं होती, असें मानण्यास कांहींच हरकत नाहीं. आपल्याला शाहू छत्रपतीच्या गादीवर बसविलें पण

अधिकाराचे नावानें शून्य; साधा पत्रव्यवहार करावयाचा तर आपल्या नांवाचा शिक्का सुद्धां पेशव्यानें तयार करून दिला नव्हता. रामराजानें आपल्या मनाप्रमाणें वागावें, आपण देऊं तें खावें व सांगूं तें बोलावें असें ताराबाईच्या मनांत होतें. ताराबाई त्याची आजी. तिच्या रदबदलीनें व खटपटीनें तर तो गादीवर आला. तेव्हां तिच्या मर्जीबाहेर जाणें त्याला शक्य नव्हतें. आजीची रदबदली असली तरी नानासाहेबांनीं त्याला तुळजापुराहून आणलें व आपल्या फौजेच्या बळावर त्याला गादीवर बसविलें. तेव्हां पेशव्याचेही उपकार त्याला बाजूस सारतां येत नव्हते. कारभाराच्या बाबतींत रामराजा ताराबाईला अनुकूल असला तरी पेशव्यांना स्त्रीचें वर्चस्व कारभारांत खपत नव्हतें. यामुळेंच तर ताराबाई रुसून सिंहगडास जाऊन राहिली होती. 'आतां राहिले पेशवे. त्याच्या बाबतींतही तो लीनतेनें वागत होता असें साताऱ्याहून भाऊसाहेबास आलेल्या एका पत्रांत उल्लेखिलें होतें. पेशव्यांनीं मजवर राग कां करतात ? माझे आईबाप गणगोत जे आहेत तें तेच आहेत त्याखेरीज आणिक कोणी नाहीं ?×' राज्याभिषेक झाल्यानंतर चार महिन्यांनीं आलेल्या पत्रात हा उल्लेख आहे. या ठिकाणीं हें सांगणें जरूरीचें आहे कीं, नानासाहेबानें व त्याचा कारभार मुखत्यारीनें पाहूं लागलेल्या भाऊनेंही साताऱ्यास व रामराजासभोंवतीं आपल्या तर्फेच्या लोकांची पेरणी केली होती आणि हे लोक रामराजाच्या वर्तनांतील व राहणींतील अगदीं क्षुल्लक गोष्टीदेखील पुण्यास या दोघां भावांकडे कळवीत होते.

वर आलेल्या उल्लेखावरून १७५० च्या एप्रिलमध्यें तरी रामराजाचें पेशव्याचें कांहींच विनसलेलें नव्हतें. पण यानंतर १७ जून १७५० मध्यें व्यंकटराव मोरेश्वरांचें जें पत्र पेशव्यास आलें त्यांत वरील पत्रांतील भावनेच्या अगदीं विरुद्ध मजकूर आढळतो. तो असा:—

'राजश्री रघूजी भोसले याजकडे बाबुभट उपाध्ये पाठविले. त्यासमागमे राजश्रींनीं सांगून पाठविलें कीं, तुम्ही वडील आहांत. आमचा परामर्श करीत नाहींत आणि वाडियांत येत नाहींत. येथें ब्राह्मणांनीं बहुतसा राडा केला आहे. तमाम माझ्या राज्यामध्यें खेल आहे. हे तुम्हास बरे दिसते की काय ? यावे.

× पे. द. पा. १

आमच्या मिलनींत मिळावे आणि या गोष्टीचें पारिपत्य करावें यैसें आहे. त्यासी तुम्ही नाहीं येत ये गोष्टी कांहीं उत्तम नाहीं. त्यासी याणीं जबाब दिला कीं, तुम्ही कोणतें आमचें म्हणणें ऐकणार ? ज्या पेशवियाणी तुम्हास या पदवीस आणले त्याचा विचार या प्रकारचा केला. चिटणीसाचा खेल झाला. आतां आम्ही चवथे राहिलो आहोंत. त्यासी पेशवियाणी आमचे गोष्टी तुमचे कानावर घातल्या कीं, जिंतीचे हात रोखे व कडीवलतीची देशमुखी व वायदेशी गांव व स्वदेशी माल पैसे द्या, ते भाऊसाहेबांनी मान्य करून आमच्या कामकाजाचा निकाल करून दिल्हा. त्यासी आम्ही येथें असतांच कडीवलीतची देशमुखी बाहिरोपंतास दिली. व जिंतीस हात रोखे व हुजरे पाठविले. गावास आणि परगाणियास वावच नाहीं. येक्या गोष्टीचें शाश्वत नाहीं आणि आपण कांहीं तुम्हाकडे येणार नाहीं. जे पेशवियांनीं केले ते मोडे. तेव्हां आणिक राहिले काय ? आम्हास सुखरूप निरोप देत असला तर उत्तम आहे नाहीं तर पेशवियाची रजा घेऊन जाऊं, यैसे परिच्छिन्न सांगितलें...रघोजीबाबाचा निश्चय येथून जावयाचा आदितवारी प्रहर रात्री जाला आहे. तमाम संरजाम बाहेर काहाडला आहे. लोकास रोजमुरे दिल्हेत व राजश्रींनी गांवामध्यें धामधूम मांडली आहे. जागोजी शेवाले याच्या हवेलीजवल एक कसबी राहात होती तिचें घर लुटून आनले. तमाम याददास्त धरली. सुमार सत्तावीस हजारांचा जाला. यैसें लालची कारभार पडला आहे.' *

या पत्रावरून काय दिसतें ? एप्रिलपासून जूनपर्यंतच्या दोन अडीच महिन्यांत अशा कोणत्या गोष्टी घडल्या कीं, ज्यामुळें पेशव्यास आईबाप व गणगोत मानणारा रामराजा पेशव्याविरुद्ध पक्ष उभा करून रघूजी भोसल्यास त्यांत येऊन मिळण्याबद्दल सांगूं लागला. रघूजीस आपल्याकडे वळविण्याचा ताराबाईनें प्रयत्न केला होता तिलाही त्यावेळीं यश आलें नव्हतें. शाहूच्या मरणापूर्वींच्या दिवसांत रघूजी सातान्यास असता तर त्यानें कोणाचा पक्ष घेतला असता हें सांगतां येत नाहीं. पण जी सुरळीत व्यवस्था, आपल्याला जशी पाहिजे होती तशी व्यवस्था, शाहूकडून पेशव्यानें करून घेतली तशी मात्र खात्रीनें करून घेतां आली नसती. रघूजीला दक्षिणेतल्या या भानगडींत पडावयाचेंच

* पे. द. पा. ४०.

नव्हतें. वऱ्हाड नागपूरकडे त्यानें आपला सवता सुभा उभारला होता व तिकडल्या कारभागात कोणी फारशी दखल देऊं नये, एवढेंच त्याला पाहिजे होतें. यामुळें ताराबाईप्रमाणें रामराजालाही 'आपण कांहीं तुम्हाकडे येणार नाहीं' असे त्यानें स्पष्ट कळविलें.

कांहीं असलें तरी सर्वतोपरि आपल्या उपकारांनीं बद्ध असलेल्या रामराजासारख्या छत्रपतीच्या वंशांतल्या तरुणाला त्याच्या मनाला व महत्त्वाकांक्षेला साजतील, असे कारभारांतले योग्य हक्क पेशव्यांनीं त्याला दिले नाहींत हेंच खरें, असें म्हणावें लागतें. उलट त्याच्या आवतीभोंवती ठेवलेल्या लोकांनीं त्याच्या खाजगी गोष्टी बाहेर काढून व प्रसंगवशात् सहज आवेशानें त्यानें कांहीं उद्गार काढले कीं, तेही पेशव्यास कळविले. या पत्रांचा उपयोग रामराजाची बदनामी करण्याच्या कामीं केला नसेल असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं.

व्यंकटराव मोरेश्वर ता. २० जूनला पेशव्यास आणखी कळवितो कीं, 'राजश्रींनीं आज गंगाजी म्हणून संतूबाईकडील आहे त्यासी आणून खूब मार दिला आणि बोलतात कीं, तुजपाशी काये वस्तभाव आहे तें सांगणें आणि त्याचे घरची वस्तभाव संतूबाईची कुल आणली आणि आणिकही मागतो. त्याजविसी राजश्री नानांनीं व रा। राघोजीबाबांनीं रा। गोविंदराव यांनीं रा। रामाजीपंत व नारोपंत रा। दौलतराव यैसे तीघेजन पाठाविले कीं, हे गोष्टी बेहिसाब आहेत आणि यैसी धामधूम करणें उचित नाहीं. शाहू महाराजांनीं केलें नाहीं तें तुम्ही करूं म्हणता हें बरें नाहीं. त्यासी यांणीं सागून पाठविलें कीं, आमचे चित्तास येईल तें करूं आपण या कामांत न बोलावें यैसे म्हणून संतूबाईस आणून वाडियांत बसविलें आहे. आणि राजे बोलले कीं, जो कोणी येईल त्यानें माझी गरदन कापील तेव्हां इला नेईल. यैसे जालें आहे.' १

याच महिन्यांत पुरंदरे यानें भाऊस कळविलें कीं, 'लक्ष रुपये नजर, एक हाती, दोन घोडे व पदक याजप्रमाणें आपणास द्यावे. . . . याप्रमाणें जो देईल त्यास मी मामला सांगेन म्हणोन धमकावणीनें बोलले' *

---

१ पे. द. फ. ६६ * पे. द. पा—६२, ६८

'राजश्रीनीं एकांती हातरोखा राजश्री यमाजीपंतास पाठविला कीं, लाख दोन लाख कर्ज झालें तरी चिंता न करणें, हिंमत न मोडणें तुमचे आवश्येक आहे. तुम्ही खामखा झुंझणें म्हणून राजश्री प्रतिनिधानीं अर्ज करून हातरोखा घेऊन पाटवून दिल्हा व प्रतिनिधींनी यमाजी पंतास सांगोन पाठविलें कीं, तुम्हा करता हत्ती घोडीं सर्वस्व दौलत भराम घालून तुमचें साह्य करूं तुम्ही कांहीं चिंता न करणे हिंमत न सोडणें असेंही सांगोन पाठविलें.' पुरंधरे याचे नाना भाऊस या जून महिन्यातलेंच पत्र आहे. पुन्हा थोड्याच दिवसांनीं त्याच महिन्यांत पुरंदरे केवळ भाऊसच पत्र पाठवून कळवितो कीं, "नव प्यादे अस्व ठेवतात, ठेवले त्यास आपले जवळून पैसे देतात जुने माझे येक कामाचा नाहीं. चट दूर करीन. माझ्या खातरेस येईल त्यास ठेवीन असे बोलतात. वरकड जितके शाहू महाराजांचे आहेत त्यास बोलतात कीं, 'तुम्ही ब्राह्मणाचे मंडलींत मिलला. माझे कामाचे नाहींत. माझे असला तर क्रिया द्या' असे लहानापासून थोरास चौकीदारास देखील म्हणतात. कोणी कोणी इमान प्रमाणें राजश्रीस देतात." अशीं हीं एका महिन्यांत सहा पत्रें साताऱ्याहून भाऊस व नानासाहेबास आलीं. पेशव्यास आईबाप गणगोताच्या ठिकाणीं मानणारा छत्रपति रामराजा पेशव्याविरुद्ध झाला व आपल्या तर्फेचे लोक उठवून फौज जमा करण्याकरतां त्याना पैसे देऊन पेशव्याशीं दोन हात करण्यास तयार झाला. रामराजा कांहीं तिरस्ट कांहीं पोचट, क्षणभर विश्वास, क्षणभर अविश्वास, असें त्याच्या स्वभावाचें पुरंदऱ्यानें नानास पाठविलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे. रामराजा असा चंचल स्वभावाचा होता. पेशव्याविरुद्ध त्यानें चालविलेलें कारस्थान त्याचें स्वतःचें नव्हतें. त्याच्या मुळाशीं दर्याबाई निंबाळकर आहे. दर्याबाईनीं हवालदारासी नातें लावून राजकारण केलें. हजार दोन हजार सरलष्करची फौज जमा करतील राजश्रीची इतबारी फौज राजश्री धणी इतक्यानिशीं सर्वोवर आक्रमण दाखवून राज्यभार करतील. परंतु स्वामीचे हातचा लगाम जाईल जरी स्वामी समूळ वृक्ष काढतील तरीच या राज्याचा लगाम स्वामीचे हातीं राहतो.' या पत्रावरून साताऱ्च्या पेशव्याच्या हेरांनीं दर्याबाईवर आरोप करून तिलाच येथून हालविली पाहिजे, असें सुचविलें. पेशव्यानें या सूचनेप्रमाणें दर्या-

बाईला साताऱ्यांतून काढून लावण्याबद्दल तावडतोब हुकूम दिले. दर्याबाई आपण होऊन जात नसेल तर तिला जबरदस्तीनें साताऱ्याबाहेर काढून तिच्या सासरीं निंबाळकरांच्या घरीं पोंचवावें याप्रमाणें हें प्रकरण निकरावर आलें. त्या वेळीं रामराजा सावध झाला. पेशव्याच्या हुकुमाला प्रत्यक्ष साताऱ्यांत विरोध करण्याची त्याची ताकतच नव्हती. पेशवे मनांत आणतील तर ते आपल्या माणसाकरवी आपल्याला बाहेर घालवतील, हें दर्याबाईनें ओळखलें. 'दर्याबाईस काढावयास विराजी नाइक व जानराव व तुकाराम नाईक तयार आहेत' असें पुरंदरे भाऊ–नानास लिहितो. त्यावरून दर्याबाईचा कांटा काढून टाकण्याची सर्व तयारी पेशव्यांनीं केली होती. 'तूजला कोण काय करतो तें पाहीन तुझी मान खालती माझी वरती आहे' रामराजाची ही धमकीची भाषा पोकळ होती. दर्याबाईनेच आपली शोभा होऊं नये म्हणून सातारा सोडून जाण्याचें ठरविलें. भाऊबहिणीच्या या वियोगाचें वर्णन पुढील ता. ५ जून १७५० च्या पत्रांत पुरदरे यानें नानास व भाऊस कळविलें. 'दर्याबाईस एक हत्ती दिला. मागती राजश्री रात्रींचे दर्याबाईच घरास गेले होते तेथे एकमेकें रडलीं. उदयीक दर्याबाई निघून जाणार...मग हे उभयता पडद्याबाहेर निघाले. मग बहिणभाऊ एकमेकांचे गला हात घालून बहुत रडली. त्यामध्यें दर्याबाईनीं बहुत ग्लान कारभारी यास शिव्या व स्वामींस दिल्या. आपणास दौलत नव्हतीसी नाहीं. राजा तुझें बरें व्हावें तुजला शिकवावें म्हणोन मी आलो शेवट माझी तूट पडली म्हणोन बोलली. दोन्ही राण्याही आल्या. असी चौघीजणी मागती रडली. दर्याबाई बोलूनचालून माहेरवाशीण. केव्हां तरी ती आपल्या घरीं जाणारच होती. पण भावापाशीं राहून तिनें पेशव्याच्या विरुद्ध आणखी कांहीं कवटाळे रचूं नयेत म्हणून नानासाहेबांनीं या बहिण भावांची ताटातूट केली. पण एवढयावरून हें प्रकरण थोडेंच मिटणार होतें ?

रामराजाचा राज्याभिषेक, त्याची मुंज व लग्न या समारंभांत पहिले दोन महिने गेले. पण ज्या आकांक्षेनें ताराबाईनें रामराजाला साताऱ्च्या गादीवर आणलें तो आपला हेतु साध्य होत नाहींसा पाहून ती रुसली व मार्चमध्यें सिंहगडावर जाऊन राहिली हें मागें सांगितलेंच आहे. ताराबाई सिंहगडावर रहावयास गेली त्याच संधीस भाऊची बायको उमाबाई पुण्यास

मरण पावली. तेव्हां भाऊचें व विश्वासरावाचें अशीं दोन्ही लग्नें एकदम करावीं. त्या वेळीं ताराबाईला पुण्यास बोलवावें व तिचें समाधान होईल अशी साताऱ्च्या कारभाराची कांहीं तरी व्यवस्था लावावी असा नाना-साहेबानें बेत केला. या विचारांत रघूजी व इतर सरदारही होते. भाऊचें लग्न एप्रिलांत पार्वतीबाईशीं व विश्वासरावाचें मेमध्यें लक्ष्मीबाईशीं असे दोन्ही समारंभ झाले. विश्वासरावाचें लग्न त्यांतल्या त्यांत मोठया थाटानें झालें. अष्टप्रधान वगैरे सर्व मंडळी लग्नास आली होती. लग्ना-करितां मंडप उभारण्यासाठीं पुण्यांतील कांहीं नागरिकांचे वाडे पाडले व त्यांना दुसरी जागा नेमून दिली. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, ताराबाई या समारंभास हजर राहिली नाहीं.

ताराबाई सिंहगडावर होती तेथें ती गप्प बसली नाहीं. सिंहगडचा किल्ला सचिवाचे ताब्यांत होता. ताराबाईनें सचिवाशीं लाडीगोडी करून त्याला आपले पक्षांत सामील करून घेतलें. तेव्हां हा बंडावा आणखी वाढूं नये, ताराबाईची कांहीं तरी समजूत काढलीच पाहिजे म्हणून पेशव्यानें तिला पुण्यास मुद्दाम बोलावून आणलें. तिला आणण्यासाठीं रघुनाथराव शिवा-पुरास व स्वतः नानासाहेब कांहीं अंतरावर सामोरे गेले होते. ताराबाईबरोबर भगवंतराव अमात्य व सचिवपंतही पुण्यास आले. रामचंद्र बाबाचा सात-मजली वाडा कसबा पेठेंत होता तेथें ताराबाईच्या राहण्याची व्यवस्था केली.

प्रतिनिधी, बाबूजी नाईक, सचिव, दाभाडे ही मंडळी पेशव्याविरुद्ध होती. त्यामुळें साहजिकच त्यांचा ताराबाईकडे ओढा होता. या मंडळींत यमाजी शिवदेवही होता व तो सर्वांत अधिक हुशार समजला जात असे. तेव्हां ताराबाईची समजूत काढण्यापूर्वी या मंडळीचा समाचार घेणें पेशव्याला भाग होतें. ताराबाईला आपल्यापाशीं पुण्यांत ठेवून या मंडळीचा बंदो-बस्त करण्याचें त्यानें ठरविलें. या सर्व खटपटींत भाऊचें अंग होतें व कांहीं प्रसंगीं स्वतःच्या मताप्रमाणें भाऊ वागला म्हणजे नानासाहेबाचें व त्याचें बिनसतही असे.

या बाबतींत प्रथम नानासाहेबानें सचिवाचा बंदोबस्त केला. तुंग व तिकोना हे सचिवाचे किल्ले ताब्यांत घेऊन सचिवास त्याच्या मुलासह अट-केंत ठेवलें. सुरक्षित व कारस्थानें करण्यास सोयीस्कर स्थळ म्हणून ताराबाई

सिंहगडाचा उपयोग करी, राजारामाच्या समाधीचें तें स्थान असल्यामुळें तिला तेथें जाण्यास अटकाव करणेंही शक्य नव्हतें. या किल्ल्यावर सचिवाचा ताबा होता. हा किल्ला सचिवाकडून काढून घेऊन त्याच्या बदला कांहीं मोबदला सचिवाला देण्याचें पेशव्यानें ठरविलें. सचिव आपला किल्ला पेशव्याच्या स्वाधीन करण्यास तयार होईना. तेव्हां खासगीवाले यांना सैन्यासह किल्ला काबीज करण्याकरतां पाठविण्यांत आलें. सचिवाचे लोक किल्ला लढवूं लागले त्यांत त्यांना यश आलें नाहीं. खासगीवाल्यानें किल्ला व त्याच्या खालील गांवेंही ताब्यांत घेतलीं. सचिव नरम आला. पेशव्यांनीं महाराजांकडून मोबदल्याच्या सनदा त्यास करून दिल्या तुंग व तिकोना हे दोन्ही परत दिले व दोघां बापलेकांना बंधमुक्त केलें.

ताराबाईप्रमाणें रामराजालाही पुण्यास आणलें होतें. रघूजीही पुण्यास आला होता. पण रामराजाचा मुक्काम पुण्यास फार दिवस राहिला नाहीं. प्रतिनिधीचा बंदोबस्त करण्याकरतां त्यास भाऊबरोबर सांगोल्याकडे पाठविण्यांत आलें. रामचंद्र बाबा शेणोलीकर हाही या स्वारींत होता. छत्रपतीच्या दरबारांत प्रतिनिधी व पेशवे सारख्याच योग्यतेचे; किंबहुना पेशव्यापेक्षां प्रतिनिधीचें महत्त्व कांकणभर जास्तच. तेव्हां प्रतिनिधीचा बंदोबस्त करायचा तर तो खुद्द छत्रपतींनींच करायला पाहिजे होता म्हणूनच रामराजाला या स्वारीवर पाठविलें व नानासाहेबानें या स्वारीवर न जातां भाऊला त्याजबरोबर तिकडे पाठविलें. प्रतिनिधीचा बंदोबस्त करून कारभाराची व्यवस्था कशी करावयाची याची योजना पेशव्यानें आंखली होती व या योजनेची कल्पना भाऊसाहेबास देऊनच भाऊस व रामचंद्र बाबास तिकडे पाठविण्यांत आलें होतें.

वऱ्हाड, गोंडवण व बंगाल यांच्या स्वतंत्र सनदा रघूजी भोंसल्यास करून देऊन त्याची कांहीं तक्रार ठेवली नाहीं व त्याला आपल्या कार्यक्षेत्रांत स्वातंत्र्यानें वागण्याची मुभा दिली. मध्यवर्ति सरकारचें नियंत्रण सर्व प्रांताच्या कारभारावर असावयास पाहिजे या दृष्टीनें ही व्यवस्था सदोष होती. पण तात्पुरती योजना म्हणून नानासाहेबानें या पद्धतीचा अवलंब केला. या व्यवस्थेमुळें रघूजीचें व पेशव्याचें सूत जमलें व आपल्या पायाखालची जमीन कायम झाल्यामुळें पेशव्यानें गायकवाड वगैरेंच्या बाबतींत जी

व्यवस्था केली होती तिकडे रघूजीनें लक्ष दिलें नाहीं व पेशव्याशीं विरोध करण्याचें तर त्यानें सोडूनच दिलें.

राहतां राहिले प्रतिनिधी व यमाजी शिवदेव. रामराजा, भाऊ व रामचंद्र-बाबा हे त्रिवर्ग गोव्याकडे स्वारीवर निघाले याचें कारण उघड होतें. यमाजी शिवदेवानें प्रतिनिधीचें हें ठाणें आपल्या ताब्यांत घेऊन पेशव्याविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें होतें. नवीन व्यवस्थेच्या या वाटाघाटीच्या प्रसंगीं रघूजीच्या आग्रहावरून पेशव्यानें प्रतिनिधी यास बंधमुक्त केलें व त्यास व यमाजी शिवदेवास पुण्यास आणलें होतें. साताऱ्याच्या पूर्वेकडील प्रदेश प्रतिनिधीच्या ताब्यांत. अर्थातच रामराजाच्या कारभारावर प्रतिनिधीचाही ताबा राही. पेशव्याला ही गोष्ट मान्य नव्हती. तेव्हां साताऱ्याकडील हा प्रदेश प्रतिनिधीनें सोडून द्यावा, अशी योजना प्रतिनिधीपुढें मांडण्यांत आली. त्यानें ती मनापासून मान्य केली नाहीं. हा प्रदेश पेशव्याच्या हवालीं करण्याच्या निमि-त्तानें यमाजी शिवदेव तिकडे गेला व सांगोल्याच्या जोडाला मंगळवेढयाचे ठाणेंही आपल्या ताब्यांत घेऊन त्यानें पेशव्याशीं दोन हात करण्याचें ठरविलें. प्रतिनिधीचाच हा एक डाव आहे हें लक्षांत घेऊन भाऊनें एकदम पहिल्यांदा सांगोल्यावर चाल केली. प्रतिनिधीच्या तर्फेनें लढून रामराजाला ताब्यांत घ्यावें व पेशव्याला तोंडघशीं पाडावे, असा यमाजी शिवदेवानेंही घाट रचला होता. पण भाऊनें मोठया धूर्ततेनें हे दोन्ही डाव साधूं दिले नाहींत. यमाजी शिवदेवानें सांगोल्याची गढी मोठया शर्तीनें आठ पंधरा दिवस लढविली. सदाशिवरावानें मोर्चे घेऊन सांगोल्याचें ठाणें काबीज केलें. यमाजी शिवदेव भाऊस शरण आला. सांगोल्याप्रमाणें मंगळवेढयाचें ठाणेंही हस्तगत करून भाऊ, रामराजा व रामचंद्रबाबा या त्रिवर्गांनीं सांगोल्यासच महिनाभर मुक्काम केला व पुढील कारभाराची व्यवस्था व सरदारांच्या जाहागिरी संबंधाने ठराव भाऊनें महाराजाकडून लेखी करून घेतले. ही व्यवस्था करण्याच्या कामीं रामचंद्रबाबाचाही अर्थात् हात होताच. गोविंदराव चिटणिसही या प्रसंगीं हजर होते. ताराबाईस सांगोल्यास न आणतां तेथें रामराजास एकाकी गांठून त्याच्याकडून पुढील राज्यकारभाराच्या व्यवस्थेच्या ठरावावर सही शिक्का करून घेण्यांत आला. ताराबाई या ठिकाणीं सांगोल्यास असती तर ती स्वस्थ बसली नसती. तिनें या बाबतींत

अडथळा आणला असता हें अगदीं उघड आहे. सांगोल्यास ठरविलेली व्यवस्था पुढीलप्रमाणें होती.

१ भगवानरावास राज्याभिषेकसमयीं प्रतिनिधीपदावर आणले त्यास कायम करून यमाजी शिवदेवाचा पुतण्या वासुदेव यास त्याचा मुतालिक नेमावा.

२ दाभाडे यास खर्चापुरती रक्कम गायकवाडांनी देण्याचें ठरवून गुजराथ प्रांत पेशवे गायकवाडानीं निमेनिम वांटून घ्यावा.

३ कर्नाटक प्रांत बाबूजी नाइकाकडे होता तो जास्ती रसद कबूल करून पेशव्यानीं स्वतःकडे घ्यावा.

गोविंदराव चिटणीसानी महाराजांपाशीं राहून पंतप्रधानांचे अनुमतीनें कारभार करावा. बापूजी खंडेरावांनीं फौजेसह महाराजापाशीं राहावें. त्याजबद्दल प्रतिनिधींकडील कांहीं मुलुख व इतर मिळून चार लक्षांचा सरंजाम हे दोघे चिटणीस व त्याचा पुतण्या रामराव जिवाजी या तिघांच्या नांवें करून द्यावा.

५ यशवंतराव पोतनीस यास कारखाने व खासगी कारभार सागून पोतनिशी व चाळीस हजारांचा सरंजाम द्यावा.

६ देवराव लपाटे यांस हुजूर खासगीचें काम व तालुके, त्यांचे त्याजकडे करार करावे.

७ हुजूरचे खर्चास पूर्वीं अष्टप्रधानांकडून व सरदार मामलेदारांकडून नेमणुकीप्रमाणें सालाबाद पाठवावी. त्याच्या वराता हुजुरून करून ऐवज मागवून घ्यावा. ( कोणी काय द्यावयाचा, याची तपशिलवार नांवनिशी ताब्यांतील मुलखासह दिलेली आहे. )

सांगोल्याच्या या व्यवस्थेंत अष्टप्रधानांच्या नवीन नेमणुका करण्यांत आल्या. चिटणीस, खासनीस व पोतनीस, सरखेल, राजाज्ञा, वजारत माब, सर लष्कर या अष्टप्रधानांशिवाय नवीन नेमणुका करण्यांत आल्या.

बाबूजी नाइक, यमाजी शिवदेव, दाभाड याच्या संबंधानें वाटाघाटी झाल्या.

मिरजेचें ठाणें सकवारबाईचा आत साळुंके ऊर्फ डुबल याजकडे होतें तें शिवाजी बल्लाळ यांजकडे देण्यांत आलें.

सांगोल्याची ही व्यवस्था नानासाहेबाच्या अनुमतीनेंच झाली असली पाहिजे असें सकृद्दर्शनी वाटतें खरें. पण ही व्यवस्था झालेली पाहतांच नानासाहेबाचे मनांत भाऊच्या या कारभाराबद्दल विकल्प उत्पन्न झाला. भाऊनें रामचंद्रबाबा व गोविंदराव चिटणीस याच्या सल्ल्यानें का होईना पण स्वतःच्या मुखत्यारीनें व आत्मविश्वासपूर्वक ही व्यवस्था केलेली पाहतांच नानासाहेबाला वैषम्य वाटूं लागलें. यावरून नानासाहेबाला अगदीं पाहिजे होती तशी ही व्यवस्था झाली नाहीं असेंच दिसतें. आतां-पर्यंत ताराबाईचाच विरोध होता, आतां हें विरोधाचें भूत आपल्या प्रत्यक्ष घरांतही शिरलें असें नानासाहेबाला वाटूं लागलें. वास्तविक या व्यवस्थेंत नवीन असें कांहींच नव्हतें. शाहूनें मरणापूर्वी दोन याद्या करून दिल्या होत्या. त्यापैकीं पाहिल्या यादींत चिटणीस स्वामींचे विश्वासू. त्याच्या तुमच्या विचारें राज्य राखनें असें म्हटलें आहे. तर या व्यवस्थेच्या चौथ्या कलमांत 'गोविंदराव चिटणीसांनीं महाराजांपाशीं राहून पंतप्रधानाचे अनुमतीनें कार-भार करावा' असें नमूद केलें आहे. शाहूनें दिलेल्या यादीप्रमाणें मराठी राज्याचा कुलमुखत्यार नानासाहेब झाला होता. उद्यां दत्तक घेतला तरी त्याच्या हातून या राज्याचा कारभार चोख रीतीनें होणें शक्य नाहीं हें जाणूनच शाहूनें अशी व्यवस्था केली होती. सांगोल्याच्या व्यवस्थेमुळें जें काय घडून झालें तें हें कीं, शाहूच्या या यादीला खुद्द रामराजाकडून भाऊनें पाठिंबा मिळवून घेतला. मग या बाबतींत नाना-साहेबाला वैषम्य वाटण्याचें कारण काय ? नानासाहेबाला हा चिटणीस सुद्धां नको होता काय ? शाहूच्या मरणानंतर त्याच्या इच्छेला अशा रीतीनें डावलणें शक्य नव्हतें. रामराजापासून आपल्या कुलमुखत्यारीला पाठिंबा मिळवायचा असल्यास शाहूच्या यादीबरहुकूमच तो मिळवावयास पाहिजे होता. अशा परिस्थितींत वैषम्याचें हें एकच कारण संभवतें. भाऊ आतां रामचंद्र बाबा व चिटणीस यांच्या साहाय्यानें स्वतंत्रपणें वागूं लागला, कारभारांत आत्मविश्वासानें ढवळाढवळ करूं लागला. त्याचें वजन वाढूं लागलें. नानासाहेबाला यामुळें संतोषच वाटावयास पाहिजे होता. चिमाजीनें बाजीरावाचा कारभार चोख रीतीनें चालविला. बाजीरावाला ज्याप्रमाणें चिमाजी त्याप्रमाणें भाऊही आपल्याला उपयोगी पडूं लागला म्हणून नाना-

साहेबाला धन्यता वाटली पाहिजे होती. पण तसें झालें नाहीं. नानासाहेबाच्या मनांत भाऊसंबंधानें तेढ उत्पन्न झाली. याचें कारण गोपिकाबाई होती, तिनें नानासाहेबांच्या मनांत भाऊविषयीं विकल्प उत्पन्न केला. नानासाहेबाला भाऊबद्दल वैषम्य वाटण्याचें हेंच कारण खरें असेल तर तें फारसें महत्त्वाचें नाहीं. पण गोपिकाबाईनें आपल्या नवऱ्याचें मन भाऊच्या बाबतींत गढूळ केलें असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारावर त्याचा परिणाम झालेला दिसत नाहीं. भाऊ विरुद्ध वैषम्य व तेढ उत्पन्न होण्याजोगे प्रसंग आले त्यावेळीं नानासाहेबानें हें प्रकरण चिघळूं न देतां भाऊला आपलासा करण्याचेच प्रयत्न केले आहेत. आणि भाऊनेंही उलट आपल्या सहकार्याचा हात कधींही मागें घेतला नाहीं.

सांगोल्याची व्यवस्था म्हणजे रामराजाकडून छत्रपतिपदाचा घेतलेला राजीनामाच होय, असा करार करून घेऊन पेशव्यांनीं साताऱची छत्रपतींची गादी बुडविली, त्या ठिकाणीं ब्राह्मणशाही प्रस्थापित केली, १६७४ त शिवाजी महाराजांनीं जें राज्य प्रस्थापित केलें तें १७५० त या सनदेनें खतम झालें. अधिकारलालसेनें पेशव्यानें छत्रपतीला नामशेष केलें असे जे आरोप नानासाहेबावर करण्यांत आले आहेत, त्यात कांहींच अर्थ नाहीं. नानासाहेबानें जें काय या बाबतींत केलें तें शाहूच्या यादीप्रमाणें केलें आणि भाऊनें आपल्या मुखत्यारींत या बाबतींत कोणताही दोष पेशव्यांवर येतां कामा नये, अशी खबरदारी घेतली. नानासाहेबाला कदाचित् वैषम्य वाटलें तरी चालेल, पण शाहूच्या शब्दाबाहेर जातां कामाचें नाहीं, अशी दक्षता भाऊनें घेतली. रामराजाला तुळजापुराहून आणून साताऱच्या गादीवर बसविलें त्यावेळीं छत्रपतींच्या कुळांतला तो तरुण राजपुत्र तेजयुक्त व भाग्यवान, असें पेशव्यालाच काय कोणालाही वाटलें असेल. पण गादीवर आल्यानंतर त्याला आपलासा करण्यांत नानासाहेबाला यश आलें नाहीं म्हणा किंवा दुसऱ्या कोणाच्या कानमंत्राला तो बळी पडल्यामुळें म्हणा पांचसहा महिन्यांतच त्याचे जे गुण दिसून आले त्यावरून साताऱच्या गादीला व कारभाराला तो योग्य नाहीं, असेंच आढळून आलें. मराठेशाहीचा वाढतां कारभार या तरुण चंचल स्वभावाच्या राजाकडून चालणें शक्य नाहीं, असें प्रत्यक्ष पाहूनच पेशव्यानें व भाऊनें ही सांगोल्याची व्यवस्था केली. ताराबाई, बाबूजी नाईक यासारख्या पेशवेविरोधी

लोकांच्या हातांत रामराजा पडूं नये म्हणूनच केवळ अशी तरतूद करणें पेशव्यांना भाग होतें.

परंतु नानासाहेबाच्या मतानेंच भाऊनें अशी कितीही खबरदारी घेतली तरी या प्रकरणांतली कटकट चालूच राहिली. नानासाहेबाला आपण केलेल्या व्यवस्थेबद्दल वैषम्य वाटलें, असें पाहतांच या बाबतींत खुलासा करण्याकरतां भाऊ व रामचंद्रबाबा पुण्यास आले. ताराबाई यापूर्वींच पुण्याहून निघून गेली होती. रामराजा सांगोल्यास गेल्यावर सेप्टेंबर महिन्यांत शंभू महादेवाच्या दर्शनाच्या निमित्तानें ती लवकरच साताऱ्याचे किल्ल्यावर आली. इकडे येण्यापूर्वी आगाऊच साताराचा किल्लेदार शेख मिरा यास पत्रें पाठवून किल्यावर दारुगोळा व इतर युद्धसाहित्य तयार ठेवण्याचा हूकम तिनें पाठविला होता. साताऱ्याच्या किल्ल्यावर आल्यानंतर ताराबाईनें तेथील हवालदार, सुभेदार, कारखानीस, व इतर मंडळी यांच्याकडून आपल्याबद्दल एकनिष्ठ राहाण्याच्या शपथा घेतल्या. त्यांना बाक्षिसें दिलीं व रामराजाच्या दोन्ही राण्या व नातो बरोबर घेऊन ती किल्ल्यावर राहूं लागली.

नोवेंबरांत रामराजाही सिंगणापूर महादेवाचें दर्शन घेऊन साताऱ्यास आला. गोविंदराव चिटणीस व त्रिंबक सदाशिव पुरंदरे त्याच्या बरोबर होते. 'महाराजांचा मुक्काम शाहू नगरच्या वाड्यांत किल्ल्याखालीं आला. त्यांनीं मातोश्रींस दाबून सर्व बंदोबस्त करावा, असें प्रधानांचें मानस. परंतु त्यांचें तेज न पडे. तेव्हां रामचंद्रबाबानी सदाशिवरावास समजाविलें कीं, आईसाहेब व राजे याचे वाकडेपणांत न पडता होईल तें पाहावें. गोविंदराव चिटणीस व महादोबा पुरंदरे यांचें जूग फुटल्यावांचून नानाची मर्जी ठिकाणावर येत नाहीं. त्याचे मतें महादोबा कारभारी नसावे. राजद्वाराचा कारभार आपल्या इतल्याशिवाय होऊं नये, याविशी कारस्थान काढून महादोबास घरीं बसवून सदाशिवराव व महादोबा कारभार करूं लागले.' सांगोल्यास रामराजाला नेऊन तेथें त्याच्याकडून नवीन व्यवस्थेची सनद लिहून घेतल्यावर ताराबाई व रामराजा यांच्या भांडणांत आपण पडूं नये. ताराबाईलाही नाराज करूं नये असें भाऊचे व रामचंद्रबाबाचें मत होतें व त्याचप्रमाणें पुढेंही ते वागले. महादोबा पुरंदरे हे भाऊच्या जागीं पूर्वी कार-

भार पहात होते. पण आपल्यामुळें नानासाहेब व भाऊ याच्यांत वितुष्ट पडतें असें पाहून त्यानेंच आपल्या जागेचा राजीनामा दिला. 'आम्ही चाकर ते भाऊ आहेत त्यांचे न ऐकल्यास दौलत फाटेल. सदाशिवरावास कारभार सांगावा. आम्ही घरीं बसतों.' * असें महादोबा पुरंदरे यानें मिनतवारीनें नानासाहेब पेशव्याला कळविलें. सांगोल्याच्या व्यवस्थेच्या बाबतींत ताराबाईनें ढवळाढवळ करूं नये म्हणून नानासाहेबानें खबरदारी घेतली; पण भाऊनें इतर कारभारी मंडळींच्या मदतीनें स्वतंत्रपणें ही व्यवस्था, केली, हेंही नानासाहेबाला पटलें नाहीं. मनाच्या अशा द्विधा स्थितींत नानासाहेबानें महादोबाचा राजीनामा स्वीकारला व भाऊला व रामचंद्र बाबाला कारभारांत घेण्याबद्दल संमति दिली. कोणतींही चार दोन कर्तृत्ववान् माणसें एकत्र आलीं कीं, तीं आपल्याविरुद्ध कारस्थान करतील, या भीतीनें नानासाहेबाच्या मनाची तगमग होई. महादोबा कारभारांतूनच दूर झाल्यामुळें गोविंदराव चिटणीस व महादबा पुरंदरे यांचें जूग फुटलें. पण त्याबरोबरच चिटणीस, रामचंद्र बाबा व भाऊ यांचें त्रिकूट जमलें, ही गोष्टसुद्धा नानासाहेबाला फारशी आवडणारी नव्हती. पण घरांतच कलहाग्नि पेटूं नये म्हणून नानासाहेबाला या गोष्टीकडे दुर्लक्षच करावें लागलें.

सांगोल्याच्या व्यवस्थेप्रमाणें रामराजाला गोविंदराव चिटणीसाच्या सल्ल्याप्रमाणें व पंतप्रधानाच्या संमतीनुसार कारभार करणें भागच होतें. याप्रमाणें रामराजा हातचा गेल्यामुळें ताराबाईचें कारस्थान मूळच धोरनासें झालें. किल्ल्यावरील कारभारी व पुराणिक वगैरे मंडळींनीं, कोणत्याही युक्तीनें रामराजास किल्ल्यावर आणून दाबून टेवावें, अशी ताराबाईस सल्ला दिली तर दुसरीकडे रामराजानें आईसाहेबांची समजूत काढावी व तिला किल्ल्याखालीं आणावी म्हणून बोलणें करण्याकरतां मध्यस्थ घातले. किल्लेकरी व कारभारी पुराणिक यांना ही गोष्ट पसंत पडली नाहीं. मध्यस्थीचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें पाहून रामराजा स्वतःच ता. २३ नोव्हेंबर (१७५०) रोजीं किल्ल्यावर गेला. कारभाऱ्यांना व पंतप्रधानाला बाजूला ठेवून केवळ आपल्या सल्ल्यानुसार रामराजानें चालावें व आपल्या बाजूच्या प्रतिनिधी वगैरे मंडळींना पुन्हा एकत्र करून त्यांच्या फौजेच्या

* म. रि. म. वि., पा. २५६.

मदतीनें पेशव्याशीं दोन हात करावे, हें ताराबाईचें म्हणणें रामराजाला मान्य झालें नाहीं.

स्वतःच्या अंगीं कर्तबगारी नसल्यामुळें रामराजाची बिचाऱ्याची ओढाताण झाली. पेशव्यांचें—बामणाचें—नियंत्रण त्याला कितीही आवडत नसलें तरी त्याला तें मान्य करणें भागच होतें. ताराबाईनें—आजीनें—कितीही उपकार केलेले असले तरी पेशव्यापुढें आजीचें कांहीं चालणार नाहीं, उगाच आपण मात्र तोंडघशीं पडूं एवढें मात्र त्याला पक्कें समजून चुकलें होतें. ताराबाईच्या म्हणण्यास रुकार न देतां रामराजा किल्ल्यावरून खालीं येऊं लागला त्या वेळींच किल्लेकऱ्याचा त्याला किल्ल्यावरच रोखून ठेवण्याचा भलताच रोख पाहून बापूजी खंडेराव, रामराजाचे शरीरसंरक्षक, वेळींच सावध झाले व राजाच्या पालखीभोंवती पक्का बंदोबस्त करून महाराजांसह ते खालीं आले.

हा बेत फसला म्हणून ताराबाई थोडीच डगमगणार? तिनें नवीनच डाव रचला. दुसरे दिवशीं चंपाषष्ठीचें पारणें होतें. पारण्याचें जेवणाचें आमंत्रण आईसाहेबांकडून देण्याकरतां किल्ल्यावरून लोक आले. रामराजांनीं हें आमंत्रण स्वीकारूं नये, असें बापूजी खंडेरावानें महाराजांस सांगून पाहिलें. पण कांहींच उपयोग झाला नाहीं. आजीच्या बाबतींत आपल्या मनांत कोणतेंच किल्मिष नाहीं, हें दाखविण्याकरतां कोणासही कळूं न देतां रामराजा किल्ल्यावर गेला. बापूजी खंडेरावास ही बातमी समजतांच तो मागोमाग किल्ल्यावर गेला पण त्याला रोखण्यांत आलें. त्याला वर जाण्यास मनाई करण्यांत आली. पारण्याचें जेवण वगैरे झाल्यावर महाराज खालीं येण्यास निघाले. ताराबाईनें त्यांस तेथें राहण्याबद्दल आग्रह केला. राजांनीं तें ऐकलें नाहीं. तसेंच खालीं जाण्याकरतां निघाले. किल्ल्याच्या दरवाजापाशीं आले. तेव्हां सुभेदार, हवालदार वगैरे मंडळींनीं महाराजांस आडवें जाऊन ताराबाईसाहेबांची परवानगी नसल्याचें सांगितलें. रामराजांनीं तसाच घोडा चालविला तेव्हां दरवाजे बंद करण्यांत आले. रामराजा ताराबाईचा कैदी झाला.

या प्रसंगीं रामराजा थोडासा धैर्यानें व नेटानें वागता तर त्याच्यावर हा प्रसंग खात्रीनें आला नसता. राज्याचा मालक तो होता. आवेशानें तो हवालदार व सुभेदार यांच्यावर चालून जाता तर उलट ताराबाईलाच

कैदी होण्याचा प्रसंग आला असता. पण तितका नेट रामराजानें दाखविला नाहीं. स्थिर बुद्धीनें तो कोणावरही विश्वास ठेवून वागला नाहीं. याचमुळें स्वतःवरच्या आत्मविश्वासालाही तो पारखा झाला.

याप्रमाणें रामराजाला ताराबाईनें सातारा किल्ल्यावर कैदेंत टाकलें. किती लाजिरवाणी गोष्ट होती ही ! लाख पन्नास हजार सैन्य पाठीशीं जय्यत तयार असलेल्या पेशव्याला छत्रपतीचा सांभाळ करतां आला नाहीं, अशी आपली दुष्कीर्ति बाहेर सर्व हिंदुस्थानभर होऊं नये, अशी पेशव्याची इच्छा होती. याकरतां नानासाहेबानें ताराबाईशीं यापुढें मिळतें घेण्याचे पुष्कळ प्रयत्न केले पण ते सर्व निरुपयोगी ठरले.

उलट ताराबाईनें रामराजाला कैदेंत टाकून पुन्हां अनेक कारस्थानें करण्यास सुरुवात केली. यमाजी शिवदेव प्रतिनिधी व बाबूजी नाईक यांना हाताशीं धरून राज्यांत बखेडा उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. हैद्राबादच्या सलाबत जंगाचा दिवाण रामदासपंत याच्यांशीं संधान बांधलें. त्याच्या पुतण्यास पेशवाई देण्याचें कबूल केलें. उमाबाई दाभाडे हिला एका प्रकारें व दमाजी गायकवाड यास दुसऱ्या प्रकारें पेशव्याविरुद्ध उठविलें. शिंदे होळकर व रघूजी भोसले यांना फितूर करण्यांत मात्र तिला मुळींच यश आलें नाहीं. आणि पेशव्याच्या सामर्थ्यापुढें वरील कारस्थानेंही फिकीं पडलीं. पण या जहांबाज म्हातारीनें आपल्या हातीं अधिकार मिळविण्याकरतां जंग जंग पछाडले यांत शंकाच नाहीं. ताराबाईनें बाहेर ज्याप्रमाणें अनेक कौटाळें रचण्याचा प्रयत्न केला त्याचप्रमाणें आपल्या पुराणिक कारभारी वगैरे मंडळींच्या साहाय्यानें प्रत्यक्ष रामराजासही वळविण्याचा प्रयत्न केला. विशेष हें कीं, रामराजा ताराबाईच्या कह्यांत राहाण्यास तयार झाला नाहीं. याच सुमारास म्हणजे ता. ९ जाने. १७५१ रोजीं पुरंदरे यानें भाऊस पत्र पाठवून रामराजाचा निश्चय काय आहे हें त्यास कळविलेंच. पण त्याबरोबरच रामराजास सोडविण्याचाही हुकूम मागितला. रामराजाची खालीं येण्यासंबंधानें किती उत्सुकता आहे, हेंही एका पत्रानें नानासाहेबास कळविलें आहे.

' राजश्री तर वर जाऊन फसले... राजश्रींनीं आम्हास व त्रिवर्ग कारभारी यांस किलयावरून बहुत चोरून भवानी मर्धा याच्याबरोबर विडे व

दाखिलें पाठविलीं. मला खालते उतरोन न्यावयाची तजवीज करा, असे ग्लानतेनें सांगून पाठवितात. आईसाहेबाचे कारभारी, पुराणिक भिवजी नारोजी राजश्रीला म्हणतात कीं, आईसाहेबांचे विचारें करा. राजे परिच्छिन्न म्हणतात कीं माझे कारभारी नाना खालते आहेत त्याशिवाय मी कांहीं करीत नाहीं. राजा आपले लगामाशिवाय नाहीं. स्वामींची मात्र आज्ञा परिच्छिन्न यावी. म्हणजे इतक्यांत सामानानें बाहेर बंदोबस्त करतो.'

रामराजा पेशव्यावर विश्वास ठेवून होता व पुरंदरे वगैरेंनीं जबरदस्तीनें किल्ला लढवून राजास बाहेर काढण्याबद्दल नानासाहेबाला सुचविलें, पण नानासाहेबाला हा उपाय अंमलांत आणणें शक्य नव्हतें. अवघड जागीं दुखणें असावें, काळजाजवळच्या शिरेवर करट उत्पन्न व्हावें, अशी ही परिस्थिति होती. किल्ल्यावर रामराजा छत्रपतीच्या गादीचा मालक व शिवाजीची सून ताराबाई किल्ल्याला असतांना मोर्चे लावावयाचे व तोफांचा मारा करावयाचा ही गोष्ट शक्यच नव्हती. आपण असला कांहीं प्रयत्न करणार आहों, असें ताराबाईला कळलें तर ही 'बाई' आकाशपाताळ एक करील व खुद्द रामराजाचा खून करण्याची व्यवस्था करण्यासही मागेंपुढें पाहावयाची नाहीं. शनवार वाड्यांत १७७३ सालीं जो प्रकार झाला तो सातारा किल्ल्यावर १७५१ त घडून आला असता या सर्व पंचाइतीमुळें ताराबाई-रामराजे व पेशवे यांच्यांतला पेंचप्रसंग सुटला नाहीं व बिचारा रामराजा जवळ जवळ बारा वर्षें सातारा किल्ल्यावर ताराबाईच्या कैदेंत राहिला.

नानासाहेबासारखा कर्तृत्ववान् पेशवा असतांना मराठी राज्याचा छत्रपती साताराच्या किल्ल्यावर बंदिस्त होऊन राहतो ही गोष्ट पेशव्यांच्या कारभाराला नामुष्की आणणारी होती व या परिस्थितींतून कांहीं तरी मार्ग काढला पाहिजे, असें त्या वेळच्या पेशवेपक्षीय मंडळींना वाटत होतें. त्याचा एक नमुना या दृष्टीनें पुढील पत्र लक्षपूर्वक वाचण्याजोगें आहे. ता. ३ फेब्रुवारी १७५१ रोजीं साताऱ्याहून पुरंदरे हा नानासाहेबांस व भाऊस दोघांसही उद्देशून लिहितो व या पेंचप्रसंगांतून बाहेर पडण्याचे मार्ग सुचवितो :—

"एक प्रकार—पडभरूपणाचा—जी आईसाहेब करतील त्यास अनुमोदन

द्यावे. दिल्हे ते खावे. सुखरूप असावे. आभिमान धरूं नये. मग ती कांहीं करोत. आपण इतके खोलींत पडू नये.

दुसरा प्रकार—कुरूपाचा, केलें शेवटास न्यावयाचा. राजा तुमचा तुमचा म्हणतो यास्तव दोन महिने लागोत चार महिने लागोत आटा बंद करून चौक्या बसवाव्याच. जोर पोहोंचून राजा खालीं आणावाच. आईस हमवार करावी.

तिसरा प्रकार—तुंदपणाचा. आपण जबरदस्तीनें आपल्या मुलकांत असावे. हमेश सावधच असावे. पुन्हां यमाजीस धरावे. नाझऱ्याचा कासेगांवचा मुलूख लुटावा. दादोबाचें तिकडील बल मोडत चाललें, मग तेथें निर्माल्यच जाणावा गडकऱ्याचीं मुलें माणसें धरावीं. जबरदस्तीनें राहावें. यादोबाची गुज मोडली पाहिजे. जिकडे मावले जमा झाले आहेत तिकडे हजार पांचशे वरकंदा जमवून आपल्याकडील घालावे. म्हणजे या मावल्याचें उडाण फुटेल. मग हा किल्ला व आईसाहेब आम्ही पाहून घेतच आहों.

आणखी एक प्रकार—म्हातारी पुरी कपटी. संभाजी राजाकडे सूत्रें खेलतच आहे. पाहील पाहील या राजश्रीस पुर्ते ठेवील. संभाजीराजास आणील. मगही आपल्यास जड जाईल. मग हेंही गमावलें व तेंही गेलें. किल्ल्यावर संभाजी राजे आले मग सारी एक, आपणच निराले असे होईल.

चवथा प्रकार—सकवारबाई बोलली कीं, या राज्याचा खावंद संभाजी राजा. हें नवें उभें केलें आहे, हें खूल आहे. संभाजी राजाचा चाकर म्हणवील तो इमानी. त्याचें बरें होईल. या खुलाला हातीं धरून बसवील. ही गादी या धन्याची त्यास देईल त्यास बरें होणार नाहीं, हें साफ सती निघते वेळेस बोलली. त्यास सकवारबाई राजा शाहू ईश्वरस्वरूप व स्वामीचे ठाई दुसरा भाव त्यांचा कदापि नव्हता. परंतु ते वेलेस स्वामीला चौघांनी भर देऊन त्याचें यैक्य नये असें करून हे खूल उभें केलें. बरे, इतकेंही करून स्वामींनीं जें जें केलें त्याचें फल. या झाडास येरंडाचीं फलें आलीं. म्हातारीनें इमान सोडून पाठी लागली. बाकी ठेवली नाहीं. राजाही न होय. या गोष्टी फुटल्या अतःपर बाकी कोणती! आतां जें असेल तें असो. संभाजी राजा आणावा. शाहू महाराजाचे गादीवर बसवावा. सारे खुशालही डागही नाहीं. मग आईसाहेब वरती काय करतील ते पाहतो. यांत फार गोष्टी आहेत. संभाजी राजे आणले तर मग कुणाऱ्यानें

कांहीं होत नाहीं. सुखरूप खाली असावे...सकवारबाई जीत सती. आपली खावंद आई. तिनें सांगितलें तें केलें. कांहीं बेमानी नाहीं.... जोंवर त्याचें इमान तोवर आपलाही दुसरा विचार नव्हता. आतां त्यानींच इमान सोडून आपले पाठीं लागले. दुसरा मनसुबाच त्याचा नाहीं. मग आपलें इमान काय ठेवून ? आपल्याकडे कांहीं नाहीं. *

या सर्व प्रकरणांत व भाऊ रामचंद्र बाबा ताराबाईच्या बाजूचे होते. एवढ्याच दृष्टीनें कीं, ताराबाईला आग्रहास पेटवून हा पेंचप्रसंग आणखी बिकट होऊं नये. ताराबाईचा हा भुंगा बाजूस सारण्यासाठींच सांगोल्याची व्यवस्था करण्यांत आली. पण रामराजाच्या दुर्बलतेमुळें व अस्थिर स्वभावामुळें तो ताराबाईच्या कैदेंत अडकला. अर्थात् आतां या व्यवस्थेचें कांहीं महत्त्व राहिलें नाहीं. तेव्हां वरील पत्रांत सुचविल्याप्रमाणें संभाजीला छत्रपतीच्या गादीवर आणलें असतें तरी कांहीं बिघडलें नसतें. आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून ताराबाई संतापून जाई व रामराजांची निर्भर्त्सना करी. ज्या राजाबरोबर एका ताटांत ताराबाई जेवली, राजा खरा असल्याबद्दल गंगोदक हातांत घेऊन प्रतिज्ञापूर्वक सांगितलें तीच आतां उलटली.

रामराजाला कैदेंत ठेवलें. करूं नये तें केलें. कैदेंत असतांना राजाचे हालही फार करण्यांत आले. दुरुत्तरें तर राजाला ताराबाईकडून सारखीं ऐकून घ्यावीं लागत होतीं. वर्षामागून वर्षें गेलीं. आपला हेतू सिद्धीस जात नाहीं. असें तिनें पाहिलें. राजा बाहेर नसल्यामुळें पेशव्यांनीं अर्थातच सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. तोच सर्वाधिकारी झाला. ताराबाईशीं समेट करण्याचे पेशव्याचे प्रयत्न चालूच होते. समेटाची एक यादी ताराबाईकडे पाठविण्यांत आली त्या वेळीं ताराबाईनें रामराजा मुळांतच खोटा आहे असें पुढीलप्रमाणें लिहून पाठविलें. ता. १५ मे १७५८ चें हें पत्र आहे.

"चिरंजीव कैलासवासी झाल्यावर साहेबांनीं आम्हांस खावंद करून दिला. जो देव वडिलांनीं करून दिला, त्याची पूजा आम्ही करूं लागलों म्हणून अर्ज लिहिला ऐशास याचा विचार तुम्हांसही कळून गेलाच आहे. प्रथम दिवशीं श्री कोटेश्वरी साहेबांची स्वारी नेली तेंव्हां श्रीच्या

* पे. द. ६ पा.१२८.

देवालयांत पुराणिक व गोपाळराव यादव व गोविंद खंडेराव व बापूजी खंडेराव चिटणीस यांच्या दुवर्गाच्या साहेबीत तत्क्षणींच आज्ञा केली कीं, 'ही वस्तु खरी नाहीं. वंशास डाग लागतो. तेव्हां दूर करणें. चौघांनीं अर्ज केला कीं, आतां समय नाहीं म्हणायचा नव्हे. घात होतो. याप्रमाणें साहेबांच्या बुद्धीस भ्रंश करून तो समय या प्रकारें संपादला. साहेबांचे मानसीं कित्येक क्षणीं तुम्हांस समक्ष बोलावून हे आज्ञा करावी तों मध्यस्थ कारभारी यांचे चित्ती कीं, समक्षता होऊं न द्यावी हे मानस, त्यावर दुसरा प्रकार प्रायश्चित्त आरंभिलें तेव्हां साहेबी आज्ञा निरोपिली कीं, पुर्ता शोध होऊ द्या, मग हा विधी करणे हेही कोणाच्या विश्वास न ये. तोही विधी केला. मुंजी बंधन व शरीरसंबंधाच्या निकडी होऊं लागल्या ते समयींही आज्ञा करीतच गेलों कीं, त्वरा कार्याची नाहीं. कार्यभाग न समजेत ऐसी वर्तणूक करून अपभ्रंशीं पाडलें. गोतपत आरंभिली. तेव्हां साहेब व रामाऊ भोसली यांनीं एकंदर तट केला कीं, हें काय करतां. ते वेळेस मराठे यांनीं तरी विचार करावा, तर त्यास ताकीद तुमची. सर्वांनीं भिंडस्तव कर्दम केला. आतां तुम्ही तो आशम धरून, खरें खोटे प्रत्ययास आणून द्यावे, ऐसा दुराग्रह करून अभिमानांत पडून, हा पर्याय पुढें आणून विनंति लिहिता तर तुमचा या पक्षी अभिमान पूर्ण असतो, मराठे निर्दोष खोटे असे म्हणू शक-तात कीं काय ? तुम्हीच याचा विवेक चित्तांत आणून भोसल्यांच्या वरदी राज्यास व वंशास डाग न लागो ऐसे करावे. हें तुम्हा मंत्रियास उचित आहे. खामखा दुराग्रहच करून येथील अमर्यादाच करावी; हाच निश्चय पुरता धरिला असला तर बेरड महार मांग शहरांत घातले आहेत ते अन्योन्य वर्तणूक करतात यांतच तुमची मातबर सेवकाची कीर्ति असली तर हेंही उत्तमच आहे. मागे पुढें जनास बोलावयास झालें जे तक्ताची मर्यादा ऐशी घडोन आली. साहेबाच्या मानसीं कीं वंशास डाग लागून राज्यभार करावा हे किमपि घडणार नाहीं. इहलोक आणि परलोक उत्तम तेंच व्हावें मानवी देहास दुराग्रह नसावा. कोणतेही गोष्टीची शाश्वति नाहीं ऐसे चित्तास आणून उत्तम मार्ग असेल तो करावा. त्यांतच निर्दोष आहे. हा खोटासा परिच्छिन तुमचे चित्तीं कळलाच आहे. इतःपर संशय न धरणें. खरें आहे तेंच सर्वथा करावे. विलंबावर न टाकणें."

ताराबाईचें हें पत्र म्हणजे तिच्या कारस्थानी स्वभावाचा एक नमुनाच आहे. ताराबाईनीं अशी उलटापालट केली तरी आतां इतक्या वर्षांनंतर रामराजाला ताराबाईच्या कैदेंत असतांना त्याला खोटा ठरवून दुसराच कांहीं उद्योग करणें पेशव्यास शक्यच नव्हतें. पेशव्याच्या दुष्कीर्तींत यामुळें आणखी भरच पडली असती. त्यानें या पत्राकडे दुर्लक्ष केलें व ताराबाईशीं समेट घडवून आणण्याचा नादही सोडला.

रामराजा व ताराबाई यांच्यांतील या झगडयामुळें गोविंदराव चिटणीस, भाऊ व रामचंद्र बाबा एका बाजूस व नानासाहेब दुसऱ्या बाजूस अशी परिस्थिति मात्र निर्माण झाली. ताराबाई वरीलप्रमाणें खऱ्याखोट्याची पर्वा न करणारी आपला हेतू साधण्यासाठीं अनेक कौटाळें रचणारी बाई आहे, हें लक्षांत घेऊनच तिला स्वस्थ बसविण्याकरतां तिच्याशीं मिळतें घ्यावें, असें भाऊचें मत होतें. चिटणीस व रामचंद्रबाबा अगदीं याच मताचे होते. केवळ फौजेच्या बळावर रामराजाला खालीं आणण्यांत यश मिळणार नाहीं. ताराबाईला चुचकारून तसेंच राजालाही युक्तीनें आपलेंसें करून घेऊन मसलत सिद्धीस न्यावी, असें गोविंदराव चिटणीसांचें म्हणणें होतें.

रामराजाला किल्ल्यांत आणून व आपल्याजवळ त्याला कैद करून ठेवल्यानंतर ताराबाईनें अनंत कारस्थानें केलीं. पण तीं कोणतींच फळाला आलीं नाहींत. गायकवाडानें ताराबाईच्या कारवाईस बळी पडून खानदेशांत दंगा केला तो साताऱ्यापर्यंत चालून आला. चिटणीस व पुरंदरे यांच्या फौजेनें त्याचा पराभव केला. गायकवाडाच्या या बंडासंबंधानें भाऊनें साताऱ्यास त्रिंबक नाना पुरंदरे यांस पत्र पाठविलें, त्यांतही 'मातुश्रीस नीट सांगून राजश्री सोडावे लागतील' असेंच मत भाऊनें व्यक्त केलें. मध्यंतरीं ताराबाईशीं जवळ जवळ करार झाला. करारांचीं कलमेंही ठरलीं पण तींही तिनें पाळलीं नाहींत. रामराजा आपल्या हातचा गेला कीं, आपलें वर्चस्व संपलें असेंच तिला वाटे. पण कांहीं असलें तरी ताराबाईशीं मिळतें घेऊनच हें प्रकरण मिटवावें असें रामचंद्रबाबाचें व भाऊचें मत होतें.

पेशव्याच्या एका हस्तकानें त्यास साताऱ्याहून पत्र लिहिलें त्यांत सुद्धां 'राजश्रीस राजश्रीप्रमाणें नेट द्यावे. आईसाहेबांस आईसाहेबांप्रमाणें दमदार करावी व आपला मनसबा सिद्धीस न्यावा' असाच सल्ला त्यानें दिला आहे.

चिटणीस, पुरंदरे व भाऊ ताराबाईच्या बाबतींत तिची कशीतरी समजूत काढावी या मताचा जसजसा जास्तजास्त प्रचार करूं लागले तसतसें नानासाहेबांचें मत पुरंदरे व चिटणीस यांच्या संबंधीं जास्त जास्त कलुषित होऊं लागलें. पण साताऱ्यावर चाल करून आलेल्या दमाजीचा पराभव पुरंदरे व चिटणीस यांनीं साताऱ्याजवळील गेंड्याच्या माळावर केला व त्याला चांगलें ताळ्यावर आणलें, हें नानासाहेबाला जेव्हां समजलें तेव्हां त्याच्या मनांत शिरलेलें हें विकल्पाचें भूत नाहींसें झालें व पुण्यास आल्याबरोबर पुरंदरे व चिटणीस या कारभारी मंडळीच्या उत्पन्नाची नवीन व्यवस्थाही त्यानें लावून दिली.

रामराजाच्या या बंदीवासाच्या दिवसांत कोल्हापूरच्या संभाजीला साताऱ्याच्या गादीवर बसवावा, अशा सूचना नानासाहेब व भाऊ यांच्याकडे सातारच्या त्याच्या खास मंडळीकडून येत होत्या. रामराजा सर्वस्वी नालायक, स्वतः कारभार करण्याची धमक नाहीं व दुसऱ्याच्या तंत्रानें वागण्याची इच्छा नाहीं. असल्या निकामी माणसाच्या नादीं लागण्यापेक्षां संभाजी राजे यांना आणलें तरी चालेल या गोष्टीला ताराबाईसुद्धां तयार झाली होती. संभाजी गादीवर आणला गेला असता तर सातारा व कोल्हापूर दोन्ही गाद्या एक झाल्या असत्या. मराठी साम्राज्याच्या हितवर्धनाच्या दृष्टीनें ही गोष्ट अत्यंत सोयीची झाली असती. पण या बाबतींत मन घालण्यास खुद्द नानासाहेबच तयार नव्हता. संभाजी आतां वृद्ध होत चालला होता. मराठी राज्याचीं सूत्रें आत्मविश्वासानें व हुशारीनें चालवील, अशी धमक व लायकी त्याच्यांत नव्हती. शिवाय आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे संभाजीची बायको जिजाबाई हिचें वर्चस्व कारभारांत वाढलें असतें. ताराबाई संभाजीला अनुकूल होती तरी जिजाबाईचा वरचढपणा तिला सहन झाला नसता. म्हणजे एका बाईच्या ऐवजी दोन बायांतील वर्चस्वाच्या चढाओढीला पेशव्याला तोंड द्यावें लागलें असतें.

अशा परिस्थितींत रामचंद्रबाबा व पुरंदरे यांनीं एक नवीनच युक्ति काढली. भाऊसाहेबाला कोल्हापूरची पेशवाई मिळवून द्यावयाची ही ती युक्ति होय. सातारा व कोल्हापूर हीं दोन्ही राज्यें एकत्र करण्याचा चिमाजी अप्पाचा उद्देश भाऊस कोल्हापुरची पेशवाई मिळाल्यानें साध्य होणारा होता. संभाजीला सातारच्या गादीवर आणलें असतें तर संभाजीच्या

जिजाबाईला ताराबाईचा वरचष्मा सहन करावा लागला असता. यामुळें सासवासुनांमधील तंटा आणखी वाढलाच असता. भाऊ पेशवा झाल्यानें जिजाबाईला ताराबाईच्या जाचाखालीं राहण्याचें कांहींच कारण पडलें नसतें. ताराबाईचा वरचढपणा सहन करण्यापेक्षां भाऊचा कारभार पुरवला असेंच जिजाबाईला वाटलें असतें. भाऊ, पुरंदरे व चिटणीस यांचा कल ताराबाईकडे होता. त्यांतल्या त्यांत आपल्याला अनुकूळ अशीं हीं माणसें आहेत असें ताराबाईला चांगलें माहित होतें. वरील व्यवस्थेमुळें ताराबाईच्या कारस्थानांसही चांगला आळा बसेल हें पाहूनच रामचंद्रबाबानें ही युक्ति शोधून काढली होती. भाऊ कर्तृत्ववान, हुशार, व्यवहारदक्ष, हिशेबी कारभारांत निपुण तसाच शूरही होता. तेव्हां त्याच्यांतील या गुणांचें चीज होण्यास हें नवीन कार्यक्षेत्र चांगलें उपयोगी पडण्यासारखें होतें. बाजीरावानें चिमाजीच्या कर्तृत्वाला हवा तेवढा वाव दिला. नानासाहेबाच्या कारकीर्दीत भाऊची कुचंबणा झाली. हिशेबी कारभारांत चोख व तरवार चालविण्यांत शूर अशा सव्यसाची वाकबगार भाऊसारख्या पुरुषाला रामचंद्र बाबानें एक नवीन कार्यक्षेत्र निर्माण करून दिलें यांत रामचंद्र बाबाचेंही चातुर्य व्यक्त होतें. साताराचा कारभार नानासाहेबानें पहावा व कोल्हापुरचा कारभार भाऊनें पहावा, ही किती तरी स्पृहणीय गोष्ट होती. कोल्हापुरच्या पेशव्यानें दक्षिण हिंदुस्थानचा व साताराच्या पेशव्यानें उत्तर हिंदुस्थानचा कारभार आटपावा अशी कार्यक्षेत्राची वांटणी होऊन मराठी राज्याच्या वाढीस, हिंदुपदपातशाहीच्या चढत्या धोरणास ही व्यवस्था उपकारक ठरली असती. सातारा व कोल्हापूर हीं राज्यें पृथक् राहिल्यानें निजाम वगैरे कारस्थानी मंडळींना चांगलें फावत होतें हा तर नेहमींचा अनुभव होता. पेशव्याच्या विरोधी असलेल्या उपद्व्यापी मंडळींना व मराठी राज्याची वाढ पाहून पोटदुखी वाढलेल्या लोकांना अनेक भानगडी उपस्थित करण्यास कोल्हापुरचा फार उपयोग होत असे. हा प्रकार भाऊच्या कोल्हापुरच्या पेशवाई पदावरच्या नेमणुकीनें अजीबात बंद पडला असता. अशा सर्व दृष्टीनें रामचंद्र बाबानें पुरंदरे व चिटणीस यांच्या सल्ल्यानें रचलेला हा व्यूह फार चांगला होता व या खटपटीस यशही आलें होतें. कारभाऱ्याच्या या बेताला संभाजीनें अनुकूलताही दाखविली होती. पण नानासाहेबाला

रामचंद्र बाबाच्या या कारस्थानांत गृहकलहाचीं बीजें दिसूं लागलीं. भाऊचें असें प्रस्थ वाढूं दिल्यास मागेंपुढें तो आपल्याला जड होईल. असें कोणी त्याच्या डोक्यांत भरवून दिलें. हा उपद्व्याप त्याची बायको गोपिकाबाई इच्याशिवाय दुसरें कोण करणार? गोपिकाबाईच्या या दुश्वासास नानासाहेब बळी पडला व भाऊला कोल्हापूरच्या पेशवाईपदाची प्राप्ति करून देण्याच्या कामीं त्यानें आपली संमति दिली नाहीं, या कारस्थानांत गृहकलहाचा त्याला वास आला त्यापेक्षां भाऊभोवतीं जमा झालेल्या कारभारी मंडळींची त्याला विशेष भीति वाटली. त्यांतल्या त्यांत रामचंद्रबाबाचें वाढत चाललेलें वर्चस्व कमी करणें त्याला अत्यंत जरुरीचें वाटलें. कारण भाऊचें सर्व शिक्षण रामचंद्रबाबाच्या देखरेखीखालीं झालें होतें. रामचंद्रबाबा शिंद्यांच्या दरबारीं असल्यामुळें उत्तर हिंदुस्थानांत मराठयांच्या सत्तेविषयीं, तिचीं सूत्रें हलविणाऱ्या सरदारांविषयीं व त्याच्या कारभाराविषयींची सर्व माहिती रामचंद्रबाबाला होती. शिंद्यांच्या कारभारांतून रामचंद्रबाबाला काढल्यानंतर भाऊनें नानासाहेबाच्या मर्जी-विरुद्धच थोडेंसें वागून रामचंद्रबाबाला जवळ करून आपल्या कारभारांत घेतलें होतें. तेव्हां कोल्हापुरची पेशवाई भाऊला प्राप्त करून देण्याच्या कामीं नानासाहेबानें मदत केली नाहीं. उलट 'अशुभस्य कालहरणम्' या म्हणीप्रमाणें ही गोष्ट दिरंगाईवर लोटण्याचाच प्रयत्न केला. तेव्हां भाऊच्या चरित्राला वळण लावणाऱ्या व ज्याच्या कर्तृत्वाबद्दल नानासाहेबालाही हेवा वाटावा त्या रामचंद्रबाबाच्या जीवनासंबंधीं चार शब्द सांगणें जरुरीचें आहे.

रामचंद्रबाबा (रामचंद्र मल्हार) अरवली गांवचा कुलकर्णी. उदरनिर्वाहा-करतां तो देशावर आला, तो प्रथम सातारा येथें आला. राजगुरु कचेश्वर बाब ओतूरकर यानें त्याला आश्रय दिला. कचेश्वर राजगुरु असल्यामुळें त्यानें त्याची बाळाजी विश्वनाथाशीं ओळख करून दिली. रामचंद्रबाबा कारकुनी कामांत हुशार होता. पेशव्यांनीं त्याची ही हुशारी पाहून अनेक जबाबदारीचीं कामें त्याजवर सोपविलीं. पेशव्याच्या कारभारांत रामचंद्र-बाबाचें महत्त्व हळूहळू वाढतच गेलें. राज्यव्यवस्थेला नीट वळण लावण्याच्या कामीं त्यानें बाजीरावाला व चिमाजीला चांगलीच मदत केली. बाजीराव कारभार पाहात नसे. चिमाजी हाच वास्तविक सर्व कारभार पाही. पण बाजीरावानें

केलेली अशी कोणतीही मोहीम नव्हती कीं, जींत चिमाजी नव्हता. अर्थात् चिमाजीच्या गैरहजिरींत रामचंद्रबाबाच हा सर्व कारभार पाहात होता. माळवा प्रांत हस्तगत झाला, शिंदे, होळकर वगैरे सरदारांनीं हिंदुस्थानांत बराच मुलूख कबजांत आणला, या मुलखांतील वसुलाची व्यवस्था करून देणें व मुख्य सरकारी खजिन्यास किती वसूल द्यावा, हें ठरविणें त्याप्रमाणें सरकार दप्तरीं हिशेब ठेवण्याची पद्धति आंखून देणें जरूरीचें झालें. या कामीं रामचंद्रबाबानें पेशव्यास फार मदत केली. ‘रामचंद्रबाबा कर्ते पुरुष माळव्याचे महालाचा आकार पाहून वांटण्या केल्या. पेशवे ४५ लक्ष, शिंदे २२॥ लक्ष, होळकर २२॥ लक्ष, पवार २० लक्ष याप्रमाणें आकार पाहून माळवा वांटून दिला. या कामासाठीं रामचंद्रबाबा माळव्यांतच सरदारांबरोबर केव्हां केव्हां रहात असे. रामचंद्रबाबाच्या हाताखालीं राहून भाऊ हिशेबी कामांत तयार झाला, त्याचप्रमाणें नानासाहेबासही रामचंद्रबाबानें हिशेबाचे पहिले धडे दिले. नानासाहेबानें वाढत्या मराठी राज्याची हिशेबाची व्यवस्था बांधली ती रामचंद्रबाबाच्या मदतीनेंच बांधली. पुढें माळव्यांत मुलखाची वांटणी झाल्यावर राणोजी शिंद्यांचा उत्तरेंतील कारभार रामचंद्रबाबाच पाहात असे. एक गोष्ट खरी कीं, मराठयांच्या कारभाराची ही वसुलाची व्यवस्था करतांना रामचंद्रबाबानें चांगला हात मारून घेतला. त्यानें खूब संपत्ति मिळविली. पुण्यांतील त्यांचा स्वतःचा वाडा सात मजली होता. याशिवाय ठिकठिकाणच्या देवस्थानाच्या कामीं व दान-धर्माच्या कामीं खूब पैसा खर्च केला. कागदोपत्रीं पहावा तर हिशेब चोख सर्व त्यांच्या त्यांच्या ठरीव प्रमाणांत वसुलाची भरपाई करून दिलेली व त्याबरोबरच हिशेबनवीस मालकांपेक्षांही गबर झालेला. रामचंद्रबाबाची ही परिस्थिति होती. हिशेबाचें दप्तर चोख असल्यावर दप्तर ठेवणारा कसा गबर होतो, याचा विचार करण्याचें कारण काय? पेशव्यांच्या कारभारांत असें आढळून येतें खरें. रामचंद्रबाबासारखे हिशेबनवीसच नव्हे तर ज्यांचे कारभारी आपल्या मालकांशीं पूर्ण इमानी राहिले ते सरदारही पेशव्यापेक्षां गबर झाले. पेशवा कर्जांत बुडालेला व त्याचे सरदार व त्यांचे कारभारी यांनीं गडगंच संपत्तिं मिळविली. राणोजी शिंदा मरण पावल्यावर शिंद्याच्या दरबारीं कारभार पाहणारा रामचंद्रबाबा जयाप्पा वगैरे राणोजीच्या मुलांना जड झाला.

जयाप्पाचें व त्याचें पटेनासें झालें. रामचंद्रबाबाला शिंद्यांच्या राज्यकार-भारांतून काढण्यास आणखी एक कारण झालें.

१७४३ सालीं जयपूरचा सवाई जयसिंग मरण पावला. त्यानंतर तीन चार वर्षांनीं त्याच्या मुलांत जयपूरच्या गादीसंबंधानें जो तंटा सुरू झाला त्यांत मराठे सरदारांनीं जें दुटप्पी धोरण स्वीकारलें तें रामचंद्रबाबाला पसंत पडलें नाहीं. ईश्वरसिंग व माधवसिंग हे सवाई जयसिंगाचे दोन मुलगे. सवाई जयसिंगानें या दोघांत तंटा लागूं नये म्हणून व्यवस्था केली होती. पण ती माधवसिंगानें मानली नाहीं व जयपूरच्या गादीकरतां त्यानें ईश्वर-सिंगावर स्वारी केली. ईश्वरसिंगानें माळव्यांत स्वारीवर असलेल्या शिंदे होळकरांची मदत मागितली. पेशव्याशीं वाटाघाट झाली व पैशाच्या आशेनें त्यांनीं ईश्वरसिंगास मदत करण्याचें ठरविलें व माधवसिंगास वठणीवर आणलें. राजमहाल येथें ही लढाई झाली. या लढाईत कोटा व बुंदी येथील राजे माधवसिंगाच्या बाजूनें लढले. जयाप्पाची फौज मदतीस घेऊन ईश्वर-सिंगानें कोट्यास वेढा घातला. किल्ल्याच्या पायथ्याशीं झालेल्या या लढाईत जयाप्पाच्या हातास गोळी लागून तो जाया झाला. तथापि जयाप्पाच्या फौजे-पुढें कोट्याच्या राजा जालिमसिंग याचें कांहीं चाललें नाहीं. त्यानें दंडा-दाखल जयाप्पास मोठी रक्कम दिली. मल्हारराव होळकराला हें सहन झालें नाहीं. त्याच्या पोटांत दुखूं लागलें. माधवसिंगानें होळकराशीं संधान बांधलें व आपल्यास मदत केल्यास पासष्ट लक्ष रुपये देण्याचें आमिष दाखविलें. होळकरानें मागेंपुढें न पाहतां माधवसिंगाचा पक्ष घेऊन ईश्वरसिंगावर चाल केली.

रामचंद्रबाबास ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं. 'माधवसिंगाचें राज-कारण लटकें, त्यांत जीव नाहीं. स्वामींनीं ईश्वरसिंगाचा अभिमान धरला ऐसे लोकांत ठरलें त्यास आतां हे गोष्ट विरुद्ध आहे.' असें रामचंद्रबाबानें पेशव्यास कळविलें. पैशाकरतां मराठे आज एक पक्ष तर उद्यां दुसरा पक्ष असें करतात. यांत मराठी राज्याची इभ्रत कमी होते, असें रामचंद्रबाबाचें म्हणणें. पण पेशव्याला तें पटलें नाहीं. नानासाहेबानें उलट रामचंद्रबाबा-लाच दोष दिला. 'सांप्रत मल्हारबा अभिमानी. तुम्ही ईश्वरसिंगाचा पक्ष धरल्यास तुमची त्याची एकता चालणार नाहीं. ते द्वैत दाखवितील. आज-

पर्यंतचा ऐक्यभाव बिघर दिसेल ' असें नानासाहेबानें रामचंद्रबाबास उलट पत्रानें कळविलें. एका बाजूला शिंदे व दुसऱ्या बाजूला होळकर यामुळें एकंदर मराठी राज्यकारभाराच्या धोरणावर ठपका येईल. मराठ्यांच्या धरसोडीच्या व वचनभंगाच्या वर्तनामुळें त्यांचा दुर्लौकिक होईल. रजपुतांना मराठ्यांबद्दल प्रेम वाटेनासें होईल. राजपुतान्यांत मराठे अप्रिय होतील, असें उघड उघड दिसत असतां, ही 'स्वामीस पैका मिळतो' व 'खावंदाची मर्जी राखिली जाते इकडेच रामचंद्रबाबानें पहावें' असें नानासाहेब त्यास सुचवितो, ही गोष्ट मराठी दानतीस खरोखरी शोभणारी नव्हती. पण पेशव्याला त्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं. १७४७ त नानासाहेब जयपूरचे राज्यांत नेवाई मुक्कामीं आला असतां माधवसिंगानें पेशव्याची गांठ घेतली. होळकरानेंच नव्हे तर पेशव्यानेंही आपल्याबरोबर पूर्वीं झालेल्या कराराविरुद्ध वर्तन करून माधवसिंगाशीं संगनमत केलेलें पाहून ईश्वरसिंग तडजोडीला तयार झाला. या तडजोडीबाबत "माधोसिंग सवाई जयसिंगाचे कनिष्ठ पुत्र यास ईश्वरसिंगाकडून चार महाल देववले. भाऊपणाचा हिस्सा द्यावयाचा करार केला. नजर करार रु. दहा लाख. सदरहू रुपयांची निशा मल्हारजी होळकरांनीं केली. दुसरे दिवशीं ईश्वरसिंगाकडून तीन लाख रुपये पेशवे सरकाराकरतां व पंचवीस हजार महादजी अंबाजी पुरंदरे याजकरतां नजर म्हणून घेण्याचा करार केला." याप्रमाणें पेशव्यानें दोन्ही पक्षांकडून पैका उपटण्याचा विचार केला. ईश्वरसिंगाला हा करार पाळणें शक्य झालें नाहीं. त्या वेळीं होळकरानें त्याच्यावर हमला केला व त्यास मागें हटवीत जयपुरांत नेऊन कोंडलें. शहराबाहेर सर्वत्र सशस्त्र सेनेचा पाहारा ठेवला. तडजोडीकरतां झालेला करार ईश्वरसिंगाकडून पुरा करून घेण्याकरतां होळकरानें ईश्वरसिंगाचा इतका छळ केला कीं, त्यानें शेवटीं विषप्रयोग करवून घेऊन आत्महत्या केली. या हृदयद्रावक प्रसंगाची कल्पना पेशवे दप्तरांतील पुढील पत्रावरून अगदीं डोळ्यापुढें उभी राहते.

हें पत्र बाबूराव विष्णु यानें गोविंदपंत बुंदेले यास पाठविलें आहे. पत्राची तारीख २१।२।१७५१ आहेः—

"सुभेदार मल्हारराव होळकर दोन लक्ष देऊं केले तरी ऐकत नाहींत. इतराज जाहाले. कांहीं केल्या न येकत मजल दरमजल चालले वकिलांही लेहून पाठविले

कीं हें येकत नाहीं...च्यार पांच लाख रुपये मागतील तर देऊन वाटेस लावावे यैसे दोघां कारभारी यांसी ईश्वरसिंगानें सांगितलें. कारभारी म्हणाले कीं, आम्ही येकंदर न जाऊं. आम्हास तो सुभेदार मारील तुम्ही आपलें हातें मारणें परंतु आम्हास तिकडे न पाठविणें. मग राजा उगाच राहिला. संध्याकाल जाहाला वर्तमान यैकले कीं, सुभेदार येथून दहा कोसावर आले. खिदमदगारास सांगितलें कीं, काला नाग जीत आणविणें व सोमलखार घेऊन येणें औषध करणें आहे. त्याणीं आणून दिलें. दोन प्रहर रात्रीस जहर राजे यांणीं घेतलें. नाग अंगास उसवले. पहांटे ईश्वरसिंग राजा याचा प्राण गेला. त्याच्या बायकांनीं जहर घेतलें. एक कलावंतीण तिनें जहर घेतलें. खंडेराऊ तात्या व गंगाधरपंत तात्या चंद्रचूड नगरावर गेले. सुभेदार व बुनगे तीन कोसावर मागे राहिले. दोन प्रहर पावेतों कोणही गोले टाकले नाहींत. फौज बाहेर उभी. कारभारी राजे यासी गेले कीं महाराज फौज बाहेर येऊन लागली. आपण अजून निजलेले काय ? म्हणून उठवावयास लागले तो खिजमतगार म्हणाला कीं, महाराजानें यैसे कर्म केलें. मग आकांत शहरांत जहाला. राजे याचा मुरदा च्यारी प्रहर दिवसपर्यंत होता. मग सुभेदारांनीं कारभारी आपले मातबर दोघे पाठवून व शेला पाठवून अगिन डाव दिधला...राजे याचे हवेलींतून चौक्या बसविल्या. आणि इकडे माधोसिंगास सांडणी स्वार पाठविला ... माधोसिंग पंधरावे रोजीं आला ... सुभेदार पुढें जाऊन भेटले. एक हत्तीवर उभयता बसले. तैसेच गावांत जाऊन त्यांच्या हवेलींत घातले. माधोसिंग आल्यावरी आठवे रोजीं राजश्री जायाजी सिंदेही आले. पैशाची निकड लावली. आणप्रमाण केले. वसूलास लागले. माधोसिंग याची फौज दहा हजार झाली. त्याची नजर फिरली. मग कुविद्या धरली कीं, सुभेदारास व जायाजी शिंदे यास जेवावयाचें करावें. अन्न अवघे विखाचे करावे. दहा पांच खासे येतील त्यांस जेऊं घालावे. आणि मारावे यैसे केले. याजला बहुत विनंति केली. सुभेदार कबूल झाले. जायापानीं गोष्ट उडविली कीं, आपण येकंदर जात नाहीं. अन्नांत विष, पाण्यांत, ब्राह्मणास द्यावयाच्या पेढ्यांत विष. सोमलखार दोन मण घेतला होता. ईश्वरें सरदारांस वांचविले. जायापाने मोडा घातला, उमेदसिंद बुंदी-वाले यानें मोडा घातला. मग त्यानें अन्न मातींत पुरले...दुसरे

रोजीं विचार केला कीं, गंगाधरपंत व आणखी कारभारी बोलावून आणून येथें मारावे. पहिले जात असत. दोन चार दिवस गांवांत राहात असत. याजकरतां बोलावूं पाठविले. त्याजला सांगोन पाठविले कीं, आपण प्रहर दिवसांत येतो. तैसेच जायाजी सिंदे यांजकडे गेले, तिकडे संध्याकाल पावेतो लागला. शहरांत लोक दहा पांच हजार माणूस शहर पाहावयासी जात असत. ते दिवसी जायाजी शिंदे याजकडील खासे फार शहरांत गेले. च्यार पालखियाचे सरदार बसोन गेले. याणी म्हटले कीं, तात्या आले. वर्तमान राजे यासी सांगितले. दरवाजे लावले. माघ वद्य ९ रोजीं गुरुवासरी राजे याचा हुकूम झाला कीं मराठे लोक आले. कतल झाली. अगोदरच लोकास इशारत होतच. राजा उठोन माडीवर जाऊन बसला, तो प्रहररात्रपर्यंत माणूस कापले. तीन हजार माणूस कापले. येक हजार जखमी झाले. जायापाकडील मातबर मातबर सरदार नामांकित, सिपाय व चाकर सुभेदाराकडील मातबर पंचवीस चाकर वगैरे हजार दीड हजार व ब्राम्हण शंभर व बटकी व पेंढारी व मुलें यैसे कापून काहाडलीं. जखमी जे जाले ते कित्येक मरतात. शेपन्नास माणूस वगैरे जे गांवांत वाचले तेवढे मात्र आले. गांवकुसावरून उडया घालून आले, त्याचे पाय मोडले व कमर मोडले. यैसा कहर शहरांत केला. एक हजार घोडे भले भले चांगले बसोन गेले होते तितकेही गेले. . . इतके मानूस गेले. सुमार नाहीं. मारले फार गेले. मार्ग चालत नाहीं. कासीद देखील वाटेनें मारले जातात. यैसे चौकडून रान नासलें आहे."

वरील पत्रानें ईश्वरसिंगाच्या आत्महत्येची करुणास्पद कहाणी सांगितली आहेच; शिवाय मराठयांच्या बेइमानी व दुटप्पी वर्तनानें सामान्य रजपूत जनतेमध्येंही ते कसे अप्रिय झाले, त्यांची सरसहा कत्तल त्यांनीं कशी केली हेंही सांगितलें आहे. आपल्याविरुद्ध चौकडून रान उठलें आहे हें पाहून शिंदे होळकरांची शहरांत पुन्हा जाण्याची किंवा वरील कत्तलीसंबंधानें जाब विचारण्याची छाती झाली नाहीं. माधोसिंगाबरोबर नुकसान भरपाई-बद्दल दोन्ही तर्फेच्या वकीलांमार्फत बोलणी झाली. खंडणी देण्याचें व नुकसान भरपाई करण्याचें माधवसिंगानें कसेंबसें कबूल केल्यासारखं केलें. त्याप्रमाणें

तो वागला नाहीं. त्यानें वाटाघाटी पुढें ढकलल्या व मराठ्यांनीं रजपुतांच्या या मुलखांतून कसा तरी पाय काढला. मराठे सरदारांचा हा नैतिक पराभवच होता.

ईश्वरसिंगाचा पक्ष कांहीं लाख रुपये मिळतील म्हणून शिंद्यानें घेतला. आणखी कांहीं लाख रुपये मिळतात, असें पाहून होळकरानें ईश्वरसिंगाचा भाऊ माधवसिंग याचा पक्ष घेतला; ही गोष्टच मराठी राज्याच्या इभ्रतीला धोका आणणारी आहे, हें जाणून रामचंद्रबाबानें पेशव्यास 'माधवसिंगाचें राजकारण लटकें. आपला बोज राहत नाहीं.' असें कळविलें. नानासाहेबानें होळकराला कानपिचक्या द्यावयाच्या सोडून रामचंद्रबाबासच दोष दिला. आश्चर्याची गोष्ट ही कीं, रामचंद्रबाबा अशा रीतीनें या दुटप्पी राजकारणा-विरुद्ध असतांही तो होळकराचा पक्ष घेतो अशी जयाप्पा शिंद्याची समजूत झाली व त्याला शिंद्यांच्या कारभारी पदावरून दूर करण्यांत आलें.

रामचंद्रबाबा हे भाऊचे हिशेबी कामांतले व राजकारणी कारभारांतले गुरु होते. आपल्या गुरूंवर ही लटकी तोहमत आलेली पाहून रामचंद्र-बाबाला त्यांनीं आपल्या कारभारांत घेतलें व पुढें पेशव्यानेंही या गोष्टीस संमति दिली. जयापा रामचंद्रबाबाविरुद्ध झाला. होळकराला तर बाबा नकोच होता. याप्रमाणें या दोन मोठ्या सरदाराना अप्रिय झालेल्या माणसाला भाऊनें जवळ केलें व त्याला पुन्हा पेशव्याच्या कारभारांत घेतलें यावरून भाऊची निस्पृहता तर दिसून येतेच. आणि शिवाय त्याला माणसा-ची पारख चांगली होती व कर्तृत्ववान माणसांचा राज्यकारभाराच्या कामीं कसा उपयोग करून घ्यावयाचा हेंही तो पक्केपणीं कसें जाणत होता हेंही स्पष्ट होतें.

रामचंद्रबाबाला भाऊनें कारभारांत घेतलें त्यावेळीं बाबानें भाऊस सदतीस लाख रुपये दिले. यापुढें त्याच्याकडून कांहीं प्राप्ति होईना म्हणून भाऊनें व नानासाहेबानें त्यास हळू हळू दूर केलें, असा आरोप या बंधूंवर करण्यांत आला आहे पण तो पोकळ आहे. रामचंद्रबाबा मरणकालपर्यंत पेशव्यांच्या कारभारांत होता. वाढत चाललेल्या मराठी साम्राज्याच्या कारभाराची व वसुलाची व्यवस्था कशी लावावी याची पद्धति बाबानेंच लावून दिली. पेशव्यांचें कर्ज दूर करण्यासाठीं हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या सरदारांवर

कशी पट्टी बसविण्यांत यांची याचा आराखडा बाबानेंच पेशव्याला करून दिला. त्याचप्रमाणें मध्यवर्ति सरकारला त्याचा योग्य वाटा सर्व सरदारांकडून मिळवून देण्याकरत कमाविसदार नेमण्याची योजना बाबानेंच केली. या योजनेमुळें सरदारांच्या कारभारांवर व वसुलांवर मध्यवर्ति सरकारचा दाब बसला. 'पेशवे सरकारला दरसाल आपले हिशेब दाखवावे लागले. ही मध्यवर्ति सरकारची सरदारांवर नियंत्रण ठेवण्याची योजना भाऊनें पूर्णतेस आणली. पेशवे पुण्यास राहून जासुदाकडून सर्व हिंदुस्थानचा वसूल करून देतील' असें मल्हाररावानें दत्ताजी व जयापा या शिंदेबंधूजवळ बोलून दाखविलें त्याच्या मुळाशीं भाऊसाहेबाची ही योजनाच होती. भाऊ शिस्तीचा भोक्ता होता. प्रसंगीं तो कडक रीतीनें वागे; यामुळें शिंदे होळकरांना विशेषतः होळकराला तो अप्रिय झाला. अशा रीतीनें राज्यकारभाराच्या कामीं हुशारीनें व दूरदर्शीपणानें भाऊला व पेशव्याला मदत करणारा हा पुरुष पुण्याच्या कारभारांत आल्यावर फार दिवस जगला नाहीं. भाऊच्या कारभारांत आल्यापासून तर तो तीनच वर्षांनीं मरण पावला. ४ आक्टोबर १७५४ रोजीं पुण्यास आपल्या राहत्या वाड्यांत त्याचा काळ झाला. त्याला औरस मुलगा नव्हता. दत्तक पुत्र सदाशिवराव रामचंद्र यास सरदारीचीं वस्त्रें देण्यांत आलीं. रामचंद्र बाबाच्या मरणामुळें भाऊला आपल्यावरचें छत्र नाहींसें झालें असें वाटलें असल्यास त्यांत नवल नाहीं.

---

# निजाम

हिंदुपदपातशाहीचे मनोरथ सिद्धीस न्यावयाचे तर दक्षिणेंतील निजामाचा कांटा काढून टाकणें अत्यंत जरूरीचें होतें. पण मराठ्यांना तें शेवटपर्यंत शक्य झालें नाहीं. वास्तविक भोपाळच्या स्वारीच्या प्रसंगींच निजामाला कायमचें खतम करतां आलें असतें. पण या बाबतींत सुभेदारी—पद्धति आडवी आली. बादशाही मुलखांतील चौथाई सरदेशमुखी वसूल करावयाची, जमल्यास मुलुखही हस्तगत करावयाचा, पण हें करतांना बादशहाच्या मंजुरीचा शिक्का ठोकून घ्यावयाचा, अशी परंपरा शाहूच्या वेळेपासून सुरू झाली होती. आपल्या भोंवतालची कटकट दूर करण्याकरतां बादशहानें व त्याच्या भोंवतालच्या मंत्रिमंडळानें निजामाला दक्षिणची वाट दाखविली. दक्षिणेंतील बादशाही सुभ्याचा कारभार त्याच्याकडे सोंपविण्यांत आला. निजामानें या गोष्टीचा पूर्णपणें फायदा घेतला व या भागांत त्यानें आपल्या नांवाची स्वतंत्र गादीच निर्माण केली. एवढेंच करून तो थांबला नाहीं. उत्तरेकडे माळव्यांत व दक्षिणेकडे कर्नाटकांत त्यानें आपले हातपाय पसरण्यास सुरुवात केली व तीसुद्धां बादशहाच्या नांवावर. औरंगजेबानें दक्षिणेंत येऊन दक्षिणेंतील त्यावेळीं अस्तित्वांत असलेल्या मुसलमानी पातशाह्या बुडविल्या व त्या ठिकाणीं आपल्या सुभेदाऱ्या प्रस्थापित केल्या. पण मध्यवर्ति सत्ता कमकुवत होतांच सुभेदाऱ्या स्वतंत्र होऊन दिल्लीच्या बादशाहीच्या डोक्यावरही मिरें वाटूं लागल्या. दक्षिणेंतील या नवीन निजामी सत्तेचा पूर्ण नायनाट करण्यांत आला नाहीं याचें हेंसुद्धां एक कारण होतेंच. दिल्लीच्या बादशाहीला शह देण्यास या सुभेदारीचा मराठ्यांना उपयोग करून घेतां येत होता. पण असें करीत असतांना आपल्यांतील विरोधाचा फायदा घेऊन उत्तरेकडून आलेला समंध आपल्यालाही स्वस्थ बसूं देणार नाहीं, ही

गोष्ट पेशव्यांच्या नीट लक्षांत असावयास पाहिजे होती. अखेर व्हावयाचा तोच परिणाम झाला. असल्या बाडगुळांनीं दिल्लीची बादशाही खाऊन टाकलीच व उलट मराठेशाहीच्या वृक्षालाही वर डोकें काढूं दिलें नाहीं.

हैद्राबादची गादी प्रस्थापित करणारा निजाम चिंकिलिजखान असफजा हा एक कर्ता व कारस्थानी पुरुष होऊन गेला. दिल्लीच्या बादशाही मंत्रिमंडळांत आपल्या कर्तृत्वाला व आकांक्षांना पुरेसा वाव मिळत नाहीं, असें पाहिल्यावर त्यानें दक्षिणचा रस्ता सुधारला. त्यानें प्रथम औरंगाबादेस व नंतर हैद्राबादेस आपल्या सत्तेचें केंद्र बनविलें. उत्तरेंतील दिल्लीची बादशाही व दक्षिणेंतील आपल्या जवळची पुण्याची पेशवाई दोन्ही कमकुवत करण्याकरतां त्यानें आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें. अफगाणिस्थानांतल्या नादीरशहाला हिंदुस्थानांत त्यानेंच बोलावलें. दिल्लीवर नादिरशहानें चाल केली. आपल्या प्रचंड फौजेसह तो तेथें राहिला. दिल्लीच्या नागरिकांची त्यानें सर्रास कत्तल केली. शहर मनमुराद लुटलें. बादशाहीला भूषणभूत असलेलें मयूर सिंहासन उखडून काढून त्यानें तें आपल्या देशीं नेलें. पण दिल्लीच्या बादशाहीवरच लहानाचा मोठा झालेल्या निजामानें त्याची कदर केली नाहीं. नादिरशहानें खालीं सरकून पेशव्याचा समाचार घेतला असता तर त्याला अधिकच बरें वाटलें असतें. तसें घडून आलें नाहीं. त्याच्या फौजेनें खालीं दक्षिणेंत उतरण्याचें नाकारल्यामुळें नादिरशहा अगदीं नाखुषीनें परत स्वदेशास गेला.

धन्याशीं बेइमान झालेल्या या निजामास बाजीरावानें चांगलाच धडा दिला. मराठ्यांच्या फौजा दिल्लीकडे वळल्या. नादिरशहा परत फिरला होता. त्याला त्या गाठूं शकल्या नाहींत; पण ज्यानें हा उपद्व्याप केला त्या निजामाच्या पाठीस त्या लागल्या. भोपाळ येथें बाजीरावानें निजामाचा पूर्ण पराभव करून त्याला दांतीं तृण धरावयास लावलें. निजामानें या वेळीं पूर्ण पडतें घेऊन बाजीरावाशीं तह केला. पण संकटाचे ढग निवळतांच तो पुन्हां उलटला. तहाच्या अटी पाळण्याची टाळाटाळ त्यानें करून पाहिली पण तें त्याला साधलें नाहीं. निजामाच्या या टाळाटाळीच्या कारस्थानांत त्याचा मुलगा नासिरजंगही सामील झाला होता. तेव्हां बापाला ताळ्यावर आणण्याकरतां बाजीरावानें त्याच्या मुलावर आपला मोर्चा फिरविला. चिमाजी अप्पाही बाजीरावास अहमदनगरानजीक येऊन मिळाला. नासीरजंगानें चाळीस हजार फौजेनिशीं

मराठ्यांच्या स्वारीस तोंड दिलें. औरंगाबादेजवळ हें युद्ध झालें. तीन महिने या युद्धाची खणाखणी चालू होती. शेवटीं नासीरजंग जेरीस आला हांडे व खरगोण हे प्रांत पेशव्यास देऊन मुंगीपैठण येथें २७ फेब्रुवारी १७४० रोजीं शेवटीं तहावर सह्या झाल्या.

बाजीरावाच्या मृत्यूनंतर निजामानें आपल्या कारस्थानास पुन्हा सुरुवात केली. माळव्याचा सुभा पेशव्यास देण्याची निजामानें कबुली दिली असली तरी ती त्यानें या वेळीं फेटाळली. अजीमुल्लाखान नांवाच्या दुसऱ्याच एका सरदारास माळव्याची सुभेदारी दिली व बादशहाकरवीं त्यास सुभेदारीचीं वस्त्रेंही दिलीं. हा उपद्व्याप निजामाला पचला नाहीं. नासीरजंगाची खोड मोडण्यासाठीं तो १७४० च्या अखेरीस दक्षिणेंत आला. अशा वेळीं मराठ्यांशीं संगनमत करणें त्याला भागच होतें. एदलाबाद येथें पेशवे व निजाम यांच्या भेटी झाल्या. बाकी सर्व मागण्या निजामानें कबूल केल्या. पंधरा लाख रुपये पेशव्यांस देण्याचें कबूल केलें. पण माळव्याची सुभेदारी देण्यास मात्र तो तयार झाला नाहीं. तहाच्या मागण्या पुढें १७४३ त बादशाही सनदा मिळून पूर्ण झाल्या.

माळव्याची सुभेदारी निजामाच्या मध्यस्थीनें मिळाली नाहीं. या बाबतींत जयसिंगाशींही पेशव्यांनीं संधान बांधलें. तेंही यशस्वी झालें नाहीं. तेव्हां पेशव्यांनीं स्वतःच कंबर कसली. १७४२–४३ त बुंदेलखंड, माळवा व बंगालपावेतों बादशाही मुलखांत आपल्या सरदारांच्या मार्फत पेशव्यानें धुमाकूळ उडवून दिला. पेशव्याची समजूत काढणें बादशहास भागच पडलें. या सर्व बादशाही मुलखावर चौथाईचा हक्क देण्याचें बादशहानें वचन दिलें. पेशवे व रघूजी भोसले यांच्यांत वितुष्ट आलें होतें. त्याचा फायदा घेण्याचा बादशहाचा विचार होता. पेशवा रघूजीपुढें हार जाता तर बादशहानें दिलेलीं वचनें धाब्यावर बसाविलीं गेलीं असतीं. पण १७४३ त पेशव्यानें रघूजीला नरम आणलेला पाहून निजाम व जयसिंग यांनीं माळव्याची सुभेदारी पेशव्यास देण्याबद्दल बादशहास सल्ला दिला. मुसलमानाशिवाय परकीयास सुभेदारी देण्याचें बादशहाच्या जीवावर आलें. त्या वेळीं शहाजादा अहंमद याच्या नांवानें सुभेदारी करून पेशव्यास त्याचा दुय्यम अधिकारी नेमावें, अशी निजामानें व जयसिंगानें त्यांतल्या त्यांत सोय काढली. पेशव्यानेंही तो

प्रकार कबूल केला व सहीशिक्यानिशीं या सनदा १७४३ च्या आगष्टांत साताऱ्यास दाखल झाल्या. या सनदांत बाळाजी बाजीरावाबरोबर चिमाजी आप्पाच्या नांवाचाही उल्लेख करण्यांत आला होता. सनदा पूर्वींच १७४० तच तयार करण्यात आल्या होत्या. पण त्या सहीशिक्यानिशीं पूर्ण होण्याकरता पेशव्याच्या फौजी सामर्थ्याची त्या वाट पहात होत्या. या सनदांत पुढील शर्ती होत्या :

(१) मराठ्यांनीं माळवा प्रांत सोडून दुसऱ्या प्रांतावर स्वाऱ्या करूं नयेत. (२) इतर प्रांतांत मराठे सरदार गेल्यास त्यांचा बंदोबस्त पेशव्यानें करावा. (३) पेशव्यानें पांचशें स्वारांनिशीं आपला एक सरदार बादशहा-जवळ ठेवावा. (४) बादशहास जरूर लागेल तेव्हां चार हजार मराठी फौज त्यांचे मदतीस पेशव्यांनीं पाठवावी. जास्त फौज पाहिजे असल्यास तिचा खर्च बादशाहींतून मिळावा. (५) बादशहानें दिलेलीं इनामें, जहा-गिरी व धर्मादाय पेशव्यांनीं पुढें चालवावे. (६) जमीनदार लोकांकडून शिरस्त्याबाहेर कर घेऊं नये. (७) हल्ली दिलेल्या ऐवजापेक्षां १५ लाख जास्त ऐवज पेशव्यानें मागूं नये. राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, यश-वंतराव पवार व पिलाजी जाधव यांनीं या करारास जामीनदार म्हणून कबु-लायत लिहून दिली होती व हा करार नानासाहेबानें पाळला नाहीं तर त्याची आपण नोकरी सोडून देऊं असेंही बादशहानें त्यांच्याकडून लिहून घेतलें होतें. पेशव्याला व त्याच्या सरदारांना बादशहानें अशा रीतीनें कितीही बांधून घेतलें तरी त्यांची राज्यविस्ताराची भूक थोडीच शमणार होती ?

पेशव्याचा पाय माळव्यांत रोवूं देतां कामा नये म्हणून निजामानें जंग जंग पछाडले. पण त्याचें कांहीं चाललें नाहीं. यानंतर दोन अडीच वर्षांनीं भाऊनें कर्नाटकांत स्वारी करून तिकडील मराठी राज्याची सत्ता तो भक्कम करून आला, हें निजामास पाहवलें नाहीं. भाऊ परत आल्यावर निजामानें तिकडे आपला मोर्चा वळविला व मराठ्यांनीं घेतलेलीं कांहीं ठाणीं आपल्या ताब्यांत घेऊन तेथें आपलें वर्चस्व कायम राखण्याचा त्यानें प्रयत्न केला. शाहूच्या आजारामुळें व इतर अनेक भानगडी साताऱ्यास उत्पन्न झाल्यामुळें भाऊला व नानासाहेबाला निजामाकडे लक्ष पुरविण्यास सवड झाली नाहीं. निजाम व त्याचे मुलगे यांच्यांतही पुढें तंटे माजले आणि या गडबडींतच

निजाम चिंकिलीजखान असफजा १७४८ च्या मे महिन्यांत औरंगाबाद येथें मरण पावला. आपल्या सगळया राज्याचा कारभार त्यानें आपला दुसरा मुलगा नासिरगंज यांजकडे सोंपविला. कारण हाच मुलगा मरणसमयीं त्याचेजवळ होता. गाजीउद्दीन, नासिरजंग, सलाबतजंग, निजामअल्ली, बसालतजंग, मीरमोगल असे सहा मुलगे व दोन मुली निजामला होत्या. निजामाचे हे सर्व मुलगे कर्तृत्ववान् व शूर होते. मुझफरजंग नांवाचा निजामाच्या एका मुलीचा मुलगा तसाच कर्तबगार असून आपल्या सर्व मुलांपेक्षां या नातवावर निजामाची बहाल मर्जी होती. पहिला गाजीउद्दीन दिल्लीच्या बादशहाच्या कारभारांत होता. बादशाही दरबारांतलें आपलें वजन कायम ठेवण्याकरतां निजामानें त्याला तेथें स्थायिक केलें होतें. नासिरजंगाला त्यानें आपली दक्षिणेंतली मिळविलेली गादी सुपूर्द केली होती तरी आपली ही दक्षिणची सत्ता चालविण्यास मुझफरजंगच योग्य आहे असें निजामास वाटत होतें. मुझफरजंगास आपली गादी मिळावी अशी व्यवस्था करून बादशहाची तशी मंजूरीही त्यानें मिळवून ठेवली होती. निजामाचे हे सर्व मुलगे व हा नातू सर्वजण एकजुटीनें वागते तर त्यांनीं सर्व दक्षिण व्यापली असती एवढेंच नव्हे तर दिल्लीच्या बादशाहीच्या दुर्बलतेचा फायदा घेऊन त्यांनीं उत्तरेंतही आपली सत्ता वाढविली असती व फुटकळ वृत्तीच्या मराठे सरदारांस तें जड झालें असतें. पण नासिरजंगास बाजूला ठेवून मुझफरजंगास गादीवर आणण्याची निजामानें व्यवस्था केल्यामुळें या घराण्यांत दुहीचें बीज पेरलें गेलें होतें. मुझफरजंग या वेळीं विजापूरच्या सुभ्यावर होता. ही संधि साधून नासिरजंगानें फौजेंतील सरदार अनुकूल करून घेऊन निजामी हस्तगत केली. मुझफरजंग अत्यंत महत्त्वाकांक्षी होता. नासिरजंगाचें हें कारस्थान हाणून पाडण्याकरतां मुझफरजंगानें मराठयांची मदत घेण्याचें ठरविलें व तो सातार्‍यास आला. सातार्‍यास कैदेंत असलेल्या चंदासाहेबाचीही त्यानें भेट घेतली. दोघांनीं या ठिकाणीं आपापसांत मसलत केली व पेशव्याच्या मदतीनें चंदासाहेबानें अर्काटची नबाबी व मुझफरजंगानें हैद्राबादची निजामी मिळविण्याचे बेत ठरविले.

रघूजीनें कर्नाटकावर स्वारी करून चंदासाहेबास कैद केलें व सफदरअल्लीस अर्काटची नबाबी दिली. सफदरअल्लीस चंदासाहेबाची नेहमीच

मीति असल्यामुळें तो न चुकतां पेशव्यांना दरसालची खंडणी देत होता. पण सफदरअल्ली १७४२ त मारला गेला व अन्वरुद्दीननें अर्काटवर आपला कबजा केला. अन्वरुद्दीन मराठयांची पर्वा बाळगणारा नव्हता. त्यानें मराठ्यांना खंडणी देण्याची टाळाटाळ सुरू केली. यामुळें चंदासाहेबाला अटकेंत ठेवण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं, असें पेशव्याला वाटूं लागलें होतें.

मुझफरजंगाशीं कानगोष्टी केल्या तरी मराठयांची मदत घेऊन पुन्हा गादीवर येण्याची कल्पना चंदासाहेबाला तितकीशी पसंत नव्हती. चंदासाहेबाच्या सुटकेबद्दल पेशव्यांनीं सात लाख रुपये दंडाची मागणी केली होती. हा एवढा मोठा दंड भरायचा कोठून? चंदासाहेबानें आपली ही अडचण फ्रेंचांचा सरदार डुप्ले यास कळविली. चंदासाहेबाची बायको पांदीचरीस होती. तिच्यामार्फत चंदासाहेबास सोडविण्याचें हें सर्व कारस्थान सुरू झालें. कांहींही करून आपली प्रथम सुटका करून घ्या. पण मराठयांची मदत घेण्याचें मात्र कबूल करूं नका, असें डुप्लेनेंच चंदासाहेबास कळविलें. डुप्लेनें सात लाख रुपये दंड भरण्याची जामीनगिरी पत्करली. ती पेशव्यानें कबूल केली व तीन हजार स्वार बंदोबस्तास देऊन चंदासाहेबास त्यानें कर्नाटकास रवाना केलें. १७४१ पासून सात वर्षें चंदासाहेब मराठयांच्या कैदेंत होता. बाहेर पडतांच पुन्हा पहिल्या जोमानेंच गांवोगांवीं फौज जमवीत व वाटेंत आडव्या आलेल्या अन्वरुद्दीनच्या लोकांचा पाडाव करीत तो पांदेचरीस पोंचला. तेथें त्यानें डुप्लेचीही मदत घेतली. आपल्या कामांत यश आल्यास फ्रेंचास कांहीं मुलूख कायमचा तोडून देण्याचें त्यानें कबूल केलें. मुझफरजंगही तीस हजार स्वारांनिशीं त्याला येऊन मिळाला. दोघांनीं मिळून अन्वरुद्दिनवर स्वारी केली. या लढाईत अन्वरुद्दीन ठार झाला. त्याचा एक मुलगा चंदासाहेबाच्या हातीं लागला. दुसरा महंमदअल्ली तेथून पळून गेला. त्यानें त्रिचनापल्ली काबीज करून चंदासाहेबास तोंड देण्याचें ठरविलें. मुझफरजंग व चंदासाहेब यांनीं याप्रमाणें अर्काट ताब्यांत घेतलें. मुझफरजंगानें दक्षिणची सुभेदारी व चंदासाहेबानें अर्काटची नबाबगिरी मिळविली. त्या प्रसंगीं या दोघांना मराठयांची मदत होती. पण ती फ्रेंचांच्या मदतीपुढें फिकी पडली. दोघांनीं पांदेचरीस जाऊन डुप्लेचे आभार मानले.

मुझफरजंग व चंदासाहेब वरचढ झाले. त्यांनीं बंडावा सुरू केला.

अशा परिस्थितींत आपली आतां घडगत नाहीं असें पाहून नासिरजंगानें हा बंडावा मोडून काढण्याकरतां मराठ्यांची मदत मागितली. पेशव्याच्या तर्फेनें बापूजी हिंगणे यानें नासीरजंगाची भेट घेतली. प्रथम मुझफरजंगास नासीरजंगाविरुद्ध पेशव्यानें मदत केली. आणि नंतर नासीर-जंगालाही मुझफरजंगाविरुद्ध मदत करण्यास मराटे तयार झाले. पेश-व्यानें रघूजी भोसल्यास फौजेनिशीं नासिरजंगाच्या मदतीस पाठविलें. मराठयांच्या दुटप्पी धोरणास हें साजेसेंच होतें. एवढ्या प्रचंड तयारीपुढें मुझफरजंग व चंदासाहेब नामोहरम झाले. नासिरजंगानें मुझफरजंगास पकडून त्यास कैदेंत ठेवलें व अन्वरुद्दीनचा मुलगा महमदअली यास अर्काटचा नबाब नेमलें. परंतु डुप्लेनें नासिरजंगाचा हा डाव हाणून पाडला. त्यानें बुसीस जिंजीच्या किल्ल्यावर पाठवून तो काबीज केला. ५ डिसेंबर १७५० रोजीं नासिरजंगाशीं फ्रेंचांनीं दोन हात केले. या लढाईत नासिरजंग मारला गेला. त्यानंतर डुप्लेनें बुसीस मुझफरजंगाकडे पाठवून त्यास सुभेदारीच्या पदावर बसविलें. नासिरजंग मारला गेल्यावर इकडे औरंगाबादचा अंमलदार सय्यद लष्करखान याच्याशीं पेशव्यानें आपला वकील वासुदेव दीक्षित याच्यामार्फत कारस्थान चालविलें.

निजामाचा वडिल मुलगा फिरोजजंग (गाजीउद्दीन) यास हैद्राबादच्या गादीवर स्थापावें, तो न आला तर नासिरजंगाच्या मुलाला या गादीवर बसवावें असा पेशव्याचा इरादा त्यानें वासुदेव दीक्षितामार्फत सय्यदलष्कर खानास कळविला व या कामगिरीकरतां औरंगाबाद व बऱ्हाणपूर हे दोनही सुभे पेशव्यास द्यावे. शहरांतील सर्व खजिना द्यावा व कर्जपरिहार होईल इतकी रक्कमही द्यावी अशी आपली मागणी त्याबरोबरच कळविली. पण या वाटाघाटी चालू असतांच मुझफरजंग मारला गेला व पेशव्यांच्या मार्गांतील हा कांटा परस्परच काढला गेला. पण यानंतर एक नवीनच प्रकरण उपस्थित झालें.

रामदासपंत नांवाचा उपव्यापी ब्राह्मण नासिरजंग याजपाशीं नोकरींत होता. डुप्लेनें या ब्राह्मणास फोडून त्याच्या मार्फत नासिरजंगास नाहींसा करण्याची खटपट केली. रामदासानें कडाप्याचा नबाब महमंदखान यास आपल्या पक्षांत घेतलें. महंमदखानानें नासिरजंगास गोळी घालून कपटानें ठार मारलें,

रामदासाच्या या बहादुरीबद्दल डुप्लेनें त्यास राजा रघुनाथदास अशी पदवी दिली व त्यास मुझफरजंगाची प्रधानकी देवविली. यानंतर थोड्याच दिवसांत मुजफरजंगही मारला गेल्यामुळें बुसी व रामदासपंत यांनीं सलाबतजंग यास निजामी दिली. आणि बुसीच्या मदतीनें तो कर्नाटकांतून हैद्राबादेस कूच करून येऊं लागला. तेव्हां त्यास अडविण्याकरतां पेशवा दक्षिणेस कृष्णाकाठीं गेला. सलाबतजंगानें पेशव्याशीं लढण्याचा प्रसंग आणला नाहीं. जानोजी निंबाळकरामार्फत उभयतांचा करार झाला. सलाबतजंगानें पेशव्यास ' सतरा लक्ष रुपये द्यावे पैकीं दोन लक्ष रोख द्यावे. तीन लक्षांची वरात भागानगरावर व बाकीची वरात औरंगाबाद व बऱ्हाणपूर याजवर देवविली. जमी खानदेश व कुल मोकळी करावी' असा निश्चय झाला. परंतु हा करार प्रत्यक्ष अमलात आणला गेला नाहीं. रामदासपंत व बुसी यांच्या तडाक्यांत सांपडलेल्या सलाबतजंगानें करारांतील कांहीं अटी पाळण्याचें लांबणीवर टाकलें. सलाबतजंग अत्यंत दुर्बल मनाचा होता. मराठ्यांचें वर्चस्व निजामशाहींत वाढूं द्यावयाचें नाहीं, असें बुसीचें धोरण असल्यामुळें हें प्रकरण पुन्हा चिघळत जाणार, असें दिसूं लागलें. पेशवा व बुसी यांच्यांत वाढत चाललेल्या या वैमनस्यांत रामदासपंतानें आणखी भर घातली. उत्तरेकडून पेशव्याकडे येणारा एक खजीना रामदासपंतानें अबदुल खैरखान याच्याकडून लुटविला. रामदासपंत अत्यंत थापेबाज होता. या लुटीबद्दल रामदासपंताकडे तक्रार गेल्यावर 'काय प्रकार आहे, तपास करतों. खजीना घेतला असल्यास परत करूं.' अशा गप्पा रामदासपंत उलट सांगूं लागला. हें प्रकरण घसास लागल्यावर त्यानें दिलेला पुढील जबाब वाचण्यालायक आहे. ' आम्ही न बोलतां खजीना देत आहों. तीन लाख रुपये तों बऱ्हाणपुरीं देवविले. राहिले दोन लाख चोवीस हजार. ते उदैक येथें देववितो. तोंडानें देतों म्हणावें आणि देऊं नये हे गोष्ट सहसा घडणार नाहीं. पांच लक्षांचा विषय तो काय? याजकरतां श्रीमंती संशय मानावा ऐसे नाहीं. या गोष्टीवरून कलह वाढवावा ऐसे नाहीं. हे गोष्ट अनुचित झाली. ' रामदासपंत व बुसी यांचेंच हें कारस्थान होतें. निजामाकडील मंडळीची त्यास भर नव्हती. तरी रामदास व बुसी यांनीं पेशव्यांचें वर्चस्व कमी करण्याकरतां त्याच्याशीं दोन हात करण्याचें ठरविलें.

बुसीच्या सल्लयावरून रामदासपंतानें पेशव्याचे हद्दींत घुसून लढाई देण्याच्या इराद्यानें निजामी फौजेस मराठी राज्याच्या हद्दींत शिरण्याचा हुकूम दिला. निजामी फौज इतक्या जोरानें आपल्या अंगावर चालून येईल, अशी अटकळ पेशव्यास नव्हती. घोडनदीला मिळ-णाऱ्या कुकडी नदीच्या आसपास या लढाईला प्रारंभ झाला. बुसीच्या तोफखान्यानें पेशव्यांस या प्रसंगीं पहिली चुणूक दाखविली. 'पारनेरनजीक श्रीमंतांनीं मोंगलाशीं थोडीबहुत चढाई केली. २१ नोव्हेंबर १७५१ रोजीं दिवसा झटापट झाली. रात्रीं ग्रहण लागतेसमयीं मोंगलाकडील छापा आला. नानासाहेब स्नानास गेले होते तेथें हा छापा आला. पेशव्याच्या पूजेचीं सोन्याचीं भाडीं व देव मुसलमानांनीं लांबविले.' कुकडीच्या या लढाईत पेशव्याचें फारसें नुकसान झालें नाहीं. या लढाईच्या बातमीनें पुण्यांत पळापळ सुरू झाली. पुढें मोगलानें रांजणगांव व दाभाडयाचें तळेगांव उध्वस्त केलें. ९ डिसेंबर रोजीं मांडवगण येथें एक झटापट झाली.

याप्रमाणें युद्ध चालू असतांच सदाशिवरावभाऊ व रामदासपंत यांची भेट कोरेगांव येथें झाली. पेशव्यानें अंतस्थ रीतीनें सलूखाचें बोलणें चाल-विलें होतेंच. हीं बोलणीं चालू असतांच मराठयांनीं त्रिंबकचा किल्ला हस्त-गत केल्याची बातमी आली. त्यामुळें तहाचीं बोलणीं थांबलीं. मोगली फौज हा किल्ला घेण्याकरतां नगराकडे वळली. या फौजेलाही मराठयांनीं खूबच मार दिला. निजाम पुण्यावर जातो असें ऐकतांच रघूजी भोसल्यानें पैनगंगा व गोदावरी या नद्यांच्या दरम्यानच्या निजामच्या मुलुखांत खंडणी घेऊन आपलीं ठाणीं बसविलीं. याप्रमाणें निजामाचें बळ चोहोंकडून कमी होत चाललें. दोन तीन महिने चालू असलेली मोहीम रेंगाळत चालली. पगार न झाल्यामुळें निजामच्या फौजेंत बेदिली उत्पन्न झाली. सलाबतजंगाचे सर्व सल्लागार या युद्धाच्या विरुद्ध होते. केवळ बुसीचाच या बाबतींत हट्ट होता व त्यास रामदास-पंताचें पाठबळ होतें. शेवटीं या लढाईतून कांहीं निष्पन्न होत नाहीं, असें दिसतांच सलाबतजंग तह करण्यास तयार झाला. शिंगवे, परगणे राहुरी येथें हा तह झाला. या तहानें चार लाखांचा मुलूख पेशव्यास मिळाला.

या तहानेंही पेशवे व निजाम यांच्यामधील तंटा मिटला नाहीं. उलट तो वाढतच चालला. तहानंतर त्रिंबकचा किल्ला घेण्याची निजामानें खटपट करून

पाहिली पण ती फुकट गेली. पगार न मिळाल्यामुळें निजामच्या फौजेंतील असंतोष वाढतच चालला होता. पैशाची व्यवस्था करण्याकरतां निजाम हैद्राबादेकडे दरकूच दरमजल करीत चालला. पण या सर्व आपत्तींस रामदास-पंतच कारणीभूत आहे अशी फौजेंतील लोकांची कल्पना झाली होती. रामदासपंत दिवाण, पण तो पैशाची व्यवस्था करीत नाहीं असें पाहून त्याच्यावर बिथरलेल्या लोकांनी वाटेंत भालकी मुक्कामीं त्याचा खून केला.

रामदासपंताच्या खुनानंतर सलाबतजंगानें बुसीच्या सल्ल्याप्रमाणें सय्यद लष्करखानास दिवाणगिरी दिली. सय्यद लष्करखान गाजीउद्दीनच्या पक्षाचा होता. गाजीउद्दीन खानास दक्षिणेस येण्यास ही अनुकूल पर्वणीच होती. बादशहाकडून त्याला तसा हुकूमही मिळाला. आणि विशेष हें कीं, शिंदे होळकरांसह तो दक्षिणेकडे निघाला व नर्मदेवर येऊन पोंचला.

बुसीच्या व इतर कारस्थानी लोकांच्या सल्ल्याप्रमाणें वागणाऱ्या हलक्या कानाच्या व दुर्बल मनाच्या सलाबतजंगाचा पेशव्याला कधींच फारसा उपयोग होत नव्हता. पेशव्यानें सलाबतजंगाचा पक्ष सोडला व गाजीउद्दीनाच्या स्वागताची तयारी केली. पेशव्यानें औरंगाबाद येथील आपल्या वकीलाकडे पत्र पाठवून तेथील अमलदारांतही फूट पाडली होती. भर पावसाळ्यांत पेशवा गाजीउद्दीनास भेटण्याकरतां उत्तरेकडे निघाला. २८ सेपटेंबर १७५२ रोजीं गाजीउद्दीन औरंगाबादेस दाखल झाला.

सय्यद लष्करखानाचा गाझीउद्दीनाकडे ओढा होता. पण तो प्रत्यक्ष औरंगाबादेस आल्यावर आपली काय गत होणार याची काळजी त्याला पडली व तो जानोजी निंबाळकराकडे करमाळ्यास आला. ‘ सलाबतजंगास बादशहाचीं पत्रें आलीं असून असा ठराव झाला आहे कीं, गाझीउद्दीन यानें फक्त औरंगाबादेस येऊन सुभेदारीचा स्वीकार करावा व सलाबतजंगास आपला दुय्यम नेमून परत दिल्लीस जावें. ’ अशी बतावणी सय्यद लष्करखानानें केली. पेशव्यानें अर्थात् ती ओळखली व गाझी-उद्दीनाकडे त्यासंबंधानें चौकशी केली. बतावणी ही अखेर बतावणीच ठरली. व गाझीउद्दीनच्या सांगण्यावरून जानोजीस व सय्यद लष्करखानास पकडण्यांत आलें. पेशव्याची व गाझीउद्दीनची प्रत्यक्ष भेट शहागड येथें झाली व दोन्ही फौजांचा मिलाफ झाला. सलाबतजंग अर्थात् घाबरून गेला.

पेशव्यानें त्याला हातचा सोडलाच होता. गाझीउद्दीन खानाकडे शरण जाण्याशिवाय त्याला गत्यंतर नव्हतें.

दक्षिणेंत आल्याबरोबर पेशव्यांच्या मदतीनें आपल्याला कांहींच कटकट न करतां सुभेदारी मिळाली, याबद्दल गाझीउद्दीनास अर्थातूच हर्ष झाला. या मदतीबद्दल वऱ्हाडच्या पश्चिमेकडील तापी व गोदावरी या दोन नद्यांमधील सर्व प्रदेश त्यानें पेशव्यास देऊं केला. अशा रीतीनें दोन्ही पक्षांची तडजोड होऊन हें प्रकरण निकालांत निघणार इतक्यांत एक शोचनीय प्रकार घडून आला. औरंगाबादेस असलेल्या निजामअल्लीच्या आईनें गाझी-उद्दीनास एक दिवस मेजवानीस बोलावलें व त्यास विषान्न घालून ठार मारलें. या घटनेमुळें पेशव्याचा सर्व व्यूह ढांसळून पडला.

गाझीउद्दीनाचा असा शोचनीय अंत झाल्यावर पेशव्यांनीं आतां सरळच पुन्हां सलाबतजंगाबरोबर तडजोडीचीं बोलणीं चालविलीं. सलाबतजंगाला आतां पेशव्याशिवाय दुसरा कोणाचा आधार नव्हताच. प्रचंड फौज घेऊन आपल्या सरदारांसह पेशवा औरंगाबादेस येऊन राहिला होता. सलाबत-जंगानें कर्तुमकर्तुम् शक्ति असलेल्या पेशव्याशीं वाटाघाट करण्यास संमति दिली. ता. ३ नोवेंबर १७५३ रोजीं उभयतांची भेट झाली. पेशव्यानें त्याजकडून गाझीउद्दीननें कबूल केलेला सर्व प्रदेश आपणाकडे लिहून घेतला. रघूजीनें पैनगंगेपलीकडे जावें व त्याच्या अलीकडील निजामच्या मुलुखास त्रास देऊं नये, ही निजामाची मागणी पेशव्यानें कबूल केली. रघूजीनेंही या गोष्टीस आपली मान्यता दिली. हा तह भालकी येथें झाला व याप्रमाणें नगर, खानदेश, पुणें जिल्ह्यांपैकीं जुन्नरकडील कित्येक प्रदेश पेशव्यास मिळाले. पण बुसीच्या सल्ल्यावरून सलाबतजंगानें पेशव्याशीं वरील प्रकारचा तह केला ही गोष्ट त्याच्या सरदारांस आवडली नाहीं. बुसीनें जो हा सल्ला दिला त्यांत सलाबतजंगाचें सामर्थ्य कमी व्हावें, हाच बुसीचा हेतू होता. नानाला व भाऊला तेंच पाहिजे होतें. निजामाचा कांटा काढून दक्षिण मोकळी करावी, हें मराठेशाहीचें धोरण सिद्धीस जाणार, असें स्पष्ट दिसूं लागलें व मुसल-मानांना आपलें हें दक्षिणेंतील राज्य बुडतें, असें वाटूं लागलें.

भावांशीं कलह, सरदार असंतुष्ट झालेले, जानोजी निंबाळकरासारखे मराठे सरदार तेही दुटप्पी, अशा परिस्थितींत निजामाचें राज्य टिकून राहणें अशक्य

आहे, अशी परिस्थिति निर्माण झाली. या सर्व आपत्तींच्या मुळाशीं बुसी आहे तेव्हां त्याला दरबारांतून काढून लावावा, असा सर्व सरदारांनीं सलाबतजंगाभोवती गिल्ला केला. त्यामुळें बुसीला रजा देणें त्याला भाग पडलें. आपल्या हाताखालीं असलेल्या फौजेच्या जोरावर बुसीनें सलाबतजंगाला निर्माल्य बनाविलें होतें. बुसी गेल्यावर आपल्या पक्षाला बळकटी यावी म्हणून व आपल्या घरांतील कलह नाहींसा करावा म्हणून सलाबत जंगानें निजाम अलीस व बसालतजंगास मुक्त केलें व राज्याच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांना वाटावी म्हणून निजामअलीस वऱ्हाडचा सुभा व बसालतजंगास विजापूर अडवानीचा सुभा दिला.

सलाबतजंगाच्या दरबारांतील सय्यद लष्करखानानें व त्याच्या सांथीदारांनीं फ्रेंचाविरुद्ध कारस्थान केलें, ही गोष्ट डुप्लेस आवडली नाहीं. त्यानें सलाबतजंगाची चांगली कानउघाडणी करून बुसीला पुन्हा कारभारांत घेण्यास त्यास भाग पाडलें. यानंतर तीन वर्षें सलाबतजंगाचे दरबारीं बुसी होता. तेवढया अवकाशांत फ्रेंचांचें वजन निजामच्या राज्यांत वाढलें व बुसीच्या सल्ल्याशिवाय राज्यकारभारांतील पानही इकडून तिकडे हलेनासें झालें. दरबारी मंडळींनीं पुन्हा बुसीविरुद्ध गिल्ला केला व सलाबतजंगानें त्याला एकाएकीं रजा दिली. या कारस्थानाचे मुळाशीं आपल्या तोफखान्याच्या फौजेंतलि सरदार मुझफरखान आहे, असें त्यास आढळून आलें तेव्हां त्याची तळव्याची आग मस्तकास गेली. सलाबतजंगानें बुसीस रजा दिली तरी बुसी हैद्राबाद सोडून बाहेर पडला नाहीं. हैद्राबाद शहरांतीलच चार मिनारच्या बंगल्यावर तो मोठ्या बंदोबस्तानें राहिला. बुसीपुढें आपलें कांहीं चालत नाहीं, असें पाहून सय्यद लष्करखानानें आपल्या जागेचा राजीनामा दिला तेव्हां सलाबतजंगानें शहानवाज खानास दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. पण त्यालाही बुसीचें सारखें वाढत चाललेलें वजन खपलें नाहीं. त्याची खोड मोडावी म्हणून शहानवाज खानानें इंग्रजांची मदत मागितली. परंतु इंग्रजांना या वेळीं निजामाला मदत करतां आली नाहीं. फ्रेंचाविरुद्ध हत्यार उपसण्यास इंग्रज या वेळीं तयार नव्हते. कांहीं झालें तरी बुसीचें पारिपत्य आपण करूं शकत नाहीं तेव्हां त्याला आपल्या दरबारींच ठेवणें काय वाईट असा विचार करून दुबळ्या मनाच्या सलाबतजंगानें

बुसीला पुन्हा तिसऱ्यांदा आपल्या नोकरींत घेतलें. या वेळीं आपल्याशीं निमकहराम झालेल्या मुझफरखानास आपल्या स्वाधीन करावें, अशी त्यानें सलाबतजंगाकडे मागणी केली. सलाबतजंगानें ती मान्य केली नाहीं. मात्र त्याला आपल्या नोकरींतून बाहेर काढून दिलें. मुझफरखान मोठा उपद्व्यापी होता. त्यानें अनेक लटपटी करून पेशव्याच्या लष्करांत नोकरी मिळविली. या हरामखोरास नोकरीवर ठेवूं नये. तो आपल्या धन्यावर केव्हां उलटेल, याचा नेम नाहीं असें भाऊनें पेशव्यास बजावलें पण नानासाहेबानें भाऊचा हा सल्ला मानला नाहीं.

धरलें तर चावतें व सोडलें तर पळतें, अशी बुसीच्या बाबतींत सलाबतजंगाची मनःस्थिति झाली होती. फौजेच्या बळावर बुसी निजामशाहीला गिळंकृत करणार अशी भीति सलाबतजंगाला वाटूं लागली तेव्हां फ्रेंचांचें हें संकट दूर करण्याकरतां सलाबतजंगानें पुन्हा एकदां पेशव्याकडे मदत मागण्याचें ठरविलें. सय्यद लष्करखानाकडे पेशव्याचें चांगलेंच सूत होतें. त्याचप्रमाणें नवीन दिवाण शहानवाजखान यालाही पण पेशव्यानें आपलेंसें केलें होतें. तेव्हां पेशव्यांशीं सलोखा करावयाचा तर शहानवाजखानाला संतुष्ट करणें भाग होतें. म्हणून सलाबत जंगानें शहानवाजखानास पांच लाखांची जहागीर दिली व दौलताबाद व अंतूर हे दोन किल्ले दिले आणि पेशव्यास वीस लाखांची जहागीर देण्याचें कबूल केलें. सलाबतजंगानें पेशव्याशीं हा करार २२ सप्टेंबर १७५७ रोजीं केला.

सलाबतजंगाला पेशव्याची मदत पाहिजे होती. पण कराराप्रमाणें ही जहागीर देऊन पेशव्यास आपलेंसें करून टाकण्याचें धैर्यही सलाबतजंगाच्या अंगीं नव्हतें. कराराप्रमाणें ही जहागीर देण्याची सलाबतजंग टाळाटाळी करूं लागला त्यावेळीं पेशव्यांनीं सलाबतजंगाला ताळ्यावर आणण्याकरिता युद्धाची तयारी केली. बुसीला बाजूस काढून निजामशाहीलाही संपुष्टांत आणण्याकरतां पेशव्यानें या मोहिमेला हात घातला. सलाबतजंगानें कबूल केलेली जहागीर दिली नाहीं, हें एक केवळ निमित्त होतें. पेशव्यानें या मोहिमेकरतां जानोजी भोसल्यास बोलावलें. त्यानें निजामाला उत्तरेकडून खालीं चेपावें व पेशव्याच्या फौजेच्या तोंडावर आणून सोडावें, असा या मोहिमेंत घाट घालण्यांत आला होता.

नानासाहेबानें विश्वासरावाला या मोहिमेवर पाठविलें. दत्ताजी शिंद्यास त्याच्या मदतीकरतां बरोबर दिलें व आपण व सदाशिवरावभाऊ मागें राहून मोहिमेचा पाठपुरावा करण्याचें ठरविलें. विश्वासराव या वेळीं अवघा पंधरा वर्षांचा होता. १७।८।१७५७ रोजीं तो फौजेनिशीं औरंगाबादेवर चालून गेला. दत्ताजी शिंद्याशिवाय दमाजी गायकवाड, महादोबा पुरंदरे, गोविंद हरि व धोंडो बाबूराव चिटणीस वगैरे सरदार मंडळीही विश्वास रावाबरोबर या मोहिमेंत होती.

" औरंगबादेंत त्रिवर्ग निजाम बंधूंचा कोंडमारा झाला तेव्हां त्यांनीं रामचंद्र जाधवास दहा हजार फौजेनिशीं मालकीहून तावडतोब मदतीस बोलावलें. जाधव येत आहे असें पाहून लगेच त्याजवर विश्वासराव व दत्ताजी शिंदे चालून गेले. रस्त्यांत औरंगाबादेचे पूर्वेस सुमारें पन्नास मैलांवर सिंद-खेड नजीक जाधव व दत्ताजी यांची गाठ पडली. तेव्हा बचावासाठीं जाधव सिंदखेडच्या गढींत आश्रय देऊन राहिला. तेव्हां ठाण्यास वेढा घालून दत्ताजीनें मोर्चे लावले. जाधवास सोडविण्यासाठीं निजामअल्लीनें निकड लावली तरी सलाबतजंग जागचा हलेना तेव्हां निजामअल्ली एकटाच सिंद-खेडाकडे चालून आला. इकडे नानासाहेब व सदाशिवराव पुण्याहून निघून नाशकास गंगास्नान करून नगरास येऊन राहिले होते. त्यांनीं गोपाळराव रास्ते व पवार यास शिंद्याचे मदतीस बोलावलें. त्यांनीं निजामअल्लीस अड-वून धरलें. नित्य युद्धप्रसंग चालूं लागले. तेव्हां गोल बांधून सभोंवार तोफांचा आराबा देऊन बाहेर निघाले. दोन कोस झुंजत भांडत सिंदखेडास दाखल झाले. तों खासे नाना व भाऊही येऊन पोंचले. दत्ताजी शिंदे इरेस पडून तमाम हत्यारांचा एकच मार दिला. दत्ताजी शिंदे यांनीं डुकर खळीस येतो तशी इरेनें मारा-मार केली तों नबाब केवळ हातघाईस आला. दत्ताजीचा पराक्रम पाहून भाऊसाहेबांचे नेत्र संतुष्ट झाले. इकडे जाधवराव पाण्याचे तसदीनें जेरीस आला. पुढें पेशवा व निजामअल्ली यांनीं सल्लयाचें सूत्र आरंभलें. आठ दिवसांत साखर खेडले येथें सल्ला झाला. नबाबानें शिकस्त होऊन पंचवीस लक्षांची जाहागीर पेशव्यास दिली. नलदुर्ग किल्ला यावेळीं पेशव्यांनीं

घेतला. ता. २ जानेवारी रोजीं अंबेडनजीक सर्व स्वाऱ्या एकत्र झाल्या." *

सिंदखेडची मोहीम म्हणून ही मोहीम इतिहासांत प्रसिद्धीस पावली. या मोहिमेनंतर निजामच्या गादीबद्दल सलाबतजंग व निजामअल्ली यांच्यांत चुरस लागली. पेशव्यास घेऊन निजामअल्ली औरंगाबादेस आला. इतक्यांत बुसी नुकताच येऊन सलाबतजंगास सामील झाला होता. यावेळीं पुन्हा कलागतीला सुरुवात होणार, असें सर्वांना वाटलें. पण बुसीनें मोठया धूर्ततेनें सलाबतजंगास धनी समजून त्याचा चांगला मान राखला व पेशव्याचीही त्यानें भेट घेतली. सलाबतजंगाला बाजूला काढून स्वतः निजामची गादी बळकावण्याकडे निजामअल्लीचें लक्ष होतें व त्याकरतां त्यानें कारस्थानें रचण्याला सुरुवात केली होती. आणि इकडे बुसीचा दुभाष्या हैदरजंग याचे मनांत स्वतःकरतां दिवाणगिरी मिळविण्याचे बेत चालू होते. हैदरजंगचा हा कावा खुद्द बुसीच्याही लक्षांत आला नाहीं. दौलताबादच्या किल्लेदारास पैसे भरून हैदरजंगानें त्याला वश केलें व त्याजकडून किल्ला आपल्या ताब्यांत घेऊन शहानवाजखानास त्यानें कैद केलें. निजाम अल्लीलाही याचप्रमाणें किल्ल्यांतलि तुरुंगाची हवा दाखवावी, असा हैदरजंगाचा इरादा होता. हे दोघेही परस्परांस ओळखून जशास तसे वागत होते. हैदरजंगानें आपल्या मार्गांतील कांटा काढून टाकण्याकरतां निजाम अल्लीस हैद्राबादच्या सुभ्यावर जाण्यास सुचविलें. निजामअल्ली औरंगाबादेस असेपर्यंत आपल्यास दिवाणगिरी मिळत नाहीं, अशी त्याची खात्री होती. तसेंच हैदरजंगाचा काटा काढल्याशिवाय आपल्याला निजामाची गादी मिळत नाहीं, हें निजामअल्लीही जाणून होता. हैदरजंगानें निजामअल्लीस हैद्राबादेकडे जाण्याची सूचना केली ती त्यानें बाह्यतः मान्य केली व तिकडे निघून जाण्याची सर्व तयारी केली. हैदरजंग मोठया आनंदानें निजामअल्लीचा निरोप घेण्याकरतां तंबूंत आला. त्याबरोबर आपल्या लोकांस इशारा देऊन त्यानें हैदरजंगाचा खून करविला. शहानवाजखानानें हा खून करविला, अशी समजूत झाल्यामुळें फ्रेंच फौजेंतील एका सुभेदारानें शहानवाजला व त्याच्या मुलाला एकटें गांठून कापून काढलें. या भयंकर

* म. रि. म. वि. २ पा. ३८७ ( भा. व. शकावल्या. )

प्रकारामुळें सगळीकडेच गोंधळ उडून गेला. आपल्यावर कांहीं तरी लचांड येईल, या भीतीनें निजामअल्ली बऱ्हाणपुरास पळून गेला. निजामअल्लीवर चालून जाऊन त्याचा पाडाव करण्याची सलाबतजंगाची इच्छा होती पण बुसीला ती पसंत पडली नाहीं. सलाबतला घेऊन तो हैद्राबादेकडे गेला. पेशवाही आपल्या फौजेसह पुण्याकडे परतला.

या सुमारासच निजामाची बाजू सोडून देऊन पांदेचरीला निघून येण्याबद्दल बुसीला हुकूम आला. फ्रेंच गव्हर्नर लालीचा हा हुकूम तोडण्याची बुसीची छाती नव्हती. तो नाइलाजानें वांदिवाश येथें लालीला जाऊन मिळाला. वांदिवाशला इंग्रजांशीं झालेल्या लढाईत बुसी शत्रूच्या हातीं सांपडला. त्याला फ्रान्सला पाठविण्यांत आलें. यानंतर पुढें वीस वर्षांनीं बुसी हिंदुस्थानांत आला व कर्नाटकच्या स्वारींत असतांना मरण पावला.

बुसीचा आधार तुटल्यावर सलाबतजंगाचें धाबें दणाणलें. निजाम-अल्लीचा पक्ष जोरदार झाला. त्यानें आणखी नवीन फौज ठेवली. इब्राहिमखान गारदी त्याला मिळाला. सलाबतजंगाचा भाऊ दिवाण बसालतजंग यानें जानोजी भोसल्यास आपल्याकडे वळवून निजामअल्लीवर चाल केली. इब्राहिमखान गारदीच्या तोफखान्यापुढें भोंसल्याचें कांहीं चाललें नाहीं. वांदीवाशच्या लढाईनंतर फ्रेंचांचा जोर कमी झालेला पाहून सलाबतजंगानें इंग्रजांचें साहाय्य मागितलें व त्यांच्याशीं मित्रत्वाचा तह केला. अशा रीतीनें आपला पक्ष मजबूत करून सलाबतजंग हैद्राबादेस येत असतांना निजामअल्ली त्याजवर चालून आला. सलाबतनें त्याच्याशीं युद्धाचा प्रसंग न आणतां त्याला दिवाणगिरी देऊन खुष केलें व बसालतजंगाला अदवानीचा सुभा दिला. निजामअल्लीला दिवाण नेमतांना इब्राहिमखान गारदी यास आपल्याकडे देण्याबद्दल सलाबतजंगानें मागणी केली. दिवाणगिरीकरतां त्यानें ती गोष्ट मान्य केली. पेशव्यांनीं या परिस्थितीचा फायदा घेऊन सलाबतजंगाकडून इब्राहिमखानाला आपल्याकडे मागून घेतलें. सिंदखेडच्या लढाईत इब्राहिमखानाच्या तोफखान्याचा पराक्रम सदाशिवराव भाऊच्या नजरेस आला होता. तेव्हां अशा शूर माणसाचा आपल्याला चांगला उपयोग होईल या विचारानें भाऊनें त्याला आपल्या नोकरींत घेतलें. मुझफरखान गारदी पेशव्याच्या नोकरींत असतांना इब्राहिमखानास भाऊनें

आश्रय दिला, या गोष्टीमुळें व इतर कांहीं कारणामुळें सदाशिवराव भाऊच्या जिवावरच प्रसंग गुदरला.

## खुनाचा प्रयत्न

कुकडीच्या लढाईनंतर कांहीं आगळिकीस्तव बुसीनें नोकरींतून काढून दिल्यावर मुझफरखानास पेशव्यानें आपल्या नोकरीस ठेवलें. बुसीच्या हाताखालींच तो तोफखान्याच्या व कवाईती फौजेच्या कामांत शिक्षण घेऊन तयार झाला होता. तोफखान्याचें व कवाइती फौजेचें शिक्षण देऊन जीं कांहीं थोडीं माणसें बुसीनें तयार केलीं त्यांपैकीं मुजफरखान हा एक प्रमुख इसम होता. पण हा मुजफरखान आपल्या गुरूवरच उलटला. निजामाच्या कारभारांतून बुसीला काढून लावण्याचें जें कारस्थान सलाबतजंगाचा दिवाण शहानवाजखान यानें केलें त्याच्या मुळाशीं हा इसम होता, असें आढळून आल्यामुळेंच बुसीनें याला आपल्या नोकरींतून दूर केलें होतें. ज्या आगळिकीस्तव बुसीनें मुजफरखानास आपल्या नोकरींतून काढून लावलें तीच ही आगळीक होती.

सदाशिवराव भाऊच्या लक्षांत हीं सर्व कारस्थानें आलीं होतीं. म्हणूनच आपल्या गुरूवर उलटणाऱ्या या निमकहराम इसमास आपल्या नोकरीस ठेवूं नये, असें भाऊनें नानासाहेबास बजावलें होतें. पण नानासाहेबांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यास आपल्या नोकरींत ठेवून पेशव्यानें आपला तोफखाना तयार करविला. बहुसंख्य असलेल्या शत्रुसेनेस थोड्या फौजेनें जिंकण्याची ही युक्ति कुकडीच्या लढाईत प्रभावी ठरलेली पाहतांच तशा प्रकारची तोफखान्यानें युक्त असलेली कवायती फौज आपणही निर्माण करावी, या इच्छेनेंच प्रेरित होऊन नानासाहेबानें या इसमास आपल्या पदरीं ठेवलें. सलाबतजंगानें बुसिला कामावरून दूर केलें त्यावेळीं बुसीलाच आपल्याकडे घ्यावें, असें नानासाहेबांच्या मनांत आलें होतें. पण आपल्या हाताखालच्या प्रभावी लष्कराच्या बळावर बुसीनें सलाबतजंगाला आपल्या हातांतलें बाहुलें बनविलें होतें, ही गोष्ट नानासाहेबाच्या लक्षांत होती. तेव्हां तोच बुसी आपलीही तशीच अवस्था केल्याशिवाय राहणार नाहीं, या भीतीनें नानासाहेबानें बुसीला आपल्या नोकरींत घेण्याचा नाद सोडला होता.

पण त्यानंतर ज्या इसमाची या कामाकरतां निवड केली तीसुद्धां चुकली. मुजफरखान अगदींच वेळ पडेल तसें वागणारा होता. लालुचीस वश होऊन लहरीखातर तो केव्हां कोणत्या पक्षाला जाऊन मिळेल, याचा नेम नव्हता. असल्या बेइमानीची त्याला कांहींच क्षिति नव्हती. पण असल्या इसमास आपल्याजवळ थारा देऊं नये असें भाऊसाहेब बजावीत असतांही पेशव्याच्या नोकरींत त्यास घेण्यांत आलें.

पुरंदर तालुक्यांतील पानशे घराण्यापैकीं यशवंतराव पानशे साताऱ्यास शाहू महाराजांपाशीं दरोगा होता. त्याचा मुलगा माधवराव यास पेशव्यानें तोफखान्याचा मुख्य अंमलदार नेमलें. अर्थात् मुजफरखानाच्या देखरेखीखालीं पानशांनीं तोफखान्याच्या नवीन कवायती सैन्याचें शिक्षण घ्यावें अशी नानासाहेबाची इच्छा असणें स्वाभाविक होतें.

मुजफरखान दोन तीन वर्षें पेशव्यांच्या नोकरींत होता. ता. १४ आक्टोबर १७५४ पासून १२ एप्रिल १७५५ पर्यंत पेशव्यांची कर्नाटकांत दुसरी स्वारी झाली. या स्वारींत महादजी आबाजी पुरंदरे मुख्य होता. त्या वेळीं त्याच्या हाताखालच्या फौजेंतील शिपायांच्या हजेरीसंबंधांत कांहीं कटकट उत्पन्न झाली. या कटकटीचा निकाल पेशव्यामार्फत केव्हांही लावून घेतां आला असता. पण मुजफरखानास तेवढेंच निमित्त पुरें झालें. तो भर स्वारींतून श्रीरंगपट्टणास निघून गेला व सावनूरच्या नबाबास जाऊन मिळाला. आपल्या घरापर्यंत चालून आलेल्या या फौजी जातभाईस सावनूरच्या नबाबानें फोडलें व त्याला आपल्या पदरीं घेतला असल्यास त्यांत कांहींच नवल नव्हतें. मुजफरखानानें ताबडतोब सावनुरच्या नबाबाच्या फौजेंत कवायती तुकड्या तयार केल्या. तोफा ओतल्या व पेशव्याविरुद्ध गोळया चालविण्याची तयारी केली. पेशव्यांनीं अर्थातच या इसमास आपल्या स्वाधीन करण्याबद्दल नबाबाकडे मागणी केली. नबाबानें ती फेंटाळून लावली. प्रकरण चिडीस गेलें. नबाबाची खोड मोडण्याचें पेशव्यानें ठरविलें. १७५६ त नानासाहेबांनीं सावनुरावर स्वारी केली. भाऊसाहेब या स्वारींत होते. नबाबाची खोड तर मोडायचीच पण त्याबरोबर मुजफरखानास पाडाव करण्याचाही या स्वारीचा हेतु असल्यामुळें पेशव्यानें बुसीसही आपल्या मदतीस आणलें होतें. सावनुरकरानें एका

लांचखाऊ इसमाला बगलेंत मारून लढाईची कितीही तयारी केली असली तरी सदाशिवरावभाऊपुढें व बुसीपुढें त्याच्या गमजा चालल्या नाहींत. सावनूरकराचा पूर्ण पराभव झाला. त्याला पाडाव करण्यांत आलें. उभय पक्षांत तह झाला. त्यावेळीं बुसीनें मुझफरखानास आपल्या कबजांत देण्याची अट घातली. पण तो जागेवर कोठें होता? त्यानें केव्हांच झुकांडी मारली होती.

कांहीं महिन्यांनीं हा इसम पुण्यास पुन्हा आला व आपल्याला नोकरीस ठेवण्याबद्दल त्यानें पेशव्याची मनधरणी सुरू केली. असल्या विश्वासघातकी व दगाबाज इसमास नोकरींत न घेण्याबद्दल भाऊंनीं नानासाहेबास पुन्हा बजावलें. तें त्यानें ऐकलें नाहीं. खानानें पुष्कळ आणाभाका घेतल्या पण स्वार्थाकरतां रोजच्या रोज धन्यांची अदलाबदल करणाऱ्या माणसाच्या आणाभाकांची किंमत काय? पण भाऊंची सावधगिरीची सूचना न मानतां नानासाहेबानें पुन्हा त्याला आपल्या नोकरीस ठेवलेंच. भाऊंना चिडविण्याकरतांच जणूं काय नानासाहेबानें हें कृत्य केलें.

१७५६ च्या पावसाळ्यांत मुझफरखान पेशव्याच्या नोकरींत आला. यापुढें झालेल्या मोहिमांत त्यानें भाग घेतला. शिंदखेडच्या लढाईत तो हजर होता. इब्राहीमखानाचा तो नातलग होता. आपल्या कामांत तो इब्राहीमखानापेक्षांही जास्त हुशार होता, यांत शंकाच नाहीं. 'बुसीनें मुजफरखानास चौघटकांत काढून दिलें, त्याजपुढें इब्राहिमखान काय फळ आहे?' या उल्लेखावरून मुझफरखान इब्राहिमखानापेक्षां वरचढ होता हें स्पष्ट होतें.

पुढें १७५८ त जव्हार व त्रिंबक किल्ला घेण्याच्या कामीं पेशव्यांना मुजफरखानाची चांगलीच मदत झाली. बाळाजी विश्वनाथास शाहूनें पेशवाई दिल्यानंतर दोन तीन वर्षांनीं त्यानें एक कार्यक्रम पेशव्याकरतां आंखून दिला होता. या कार्यक्रमाच्या यादींत त्रिंबक किल्ल्याचा निर्देश करण्यांत आला होता. १७१७ सालची ही गोष्ट. त्यानंतर केवढया तरी मोठमोठ्या घडामोडी झाल्या. पण पेशव्यांना या किल्ल्याकडे लक्ष देण्यास आतां सवड मिळाली.

या मोहिमेंतून परत आल्यावर सदाशिवराव भाऊनें इब्राहिमखानास नोकरींत घेतलें, ही गोष्ट त्याला समजली. तोफखान्याच्या कामावर मुज्फर-

खानासारखा एक हुशार इसम असतांना पुन्हा इब्राहिमखानास कां घेण्यांत आलें, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. आपली लष्करी ताकद वाढविण्याच्या दृष्टीनें लष्करांत कर्तृत्ववान् इसमांची भरती करणें योग्यच होतें. पण आपण नाकारलेल्या व अविश्वास प्रकट केलेल्या इसमास नानासाहेबानें जवळ केलें होतें तेव्हां तोडीस तोड म्हणून भाऊनें इब्राहिमखानास एक विश्वासू लढवय्या म्हणून आपल्याजवळ नोकरीस ठेवलें. बाजीराव व चिमाजी हे रामलक्ष्मणासारखे प्रेमाचे भाई होते. तितकें प्रेम नानासाहेब व भाऊसाहेब यांच्यांत मुळींच नव्हतें. अनेक बाबतींत दोघांचे मतभेद होत असत. पण मतभेद फारसे ताणायचे नाहींत; दोघांचींही मनें विटून जाईपर्यंत किंवा दोघांचेही व्यवहार निरनिराळे होईपर्यंत ते ताणायचे नाहींत, अशी खबरदारी दोघेही घेत होते. भाऊची योग्यता व कर्तृत्व नानासाहेबाच्या लक्षांत असल्यामुळें कोणी कितीही भर घातली व फुसलावलें तरी भाऊला जवळ ठेवण्याची कोशीस नानासाहेब करीत असे.

शिवाय १७५९ चा हा काल असा होता कीं, यावेळीं भाऊसाहेबाच्या हातांत लष्कराचीं सूत्रें देण्यांत आलीं होतीं. रघुनाथरावाच्या हिंदुस्थानांतील स्वाऱ्या पेशव्यांच्या कीर्तीत व वैभवांत भर घालणाऱ्या होत्या ही गोष्ट खरी होती. तथापि उत्तरेकडील राजकारण जितक्या कौशल्यानें चालावयास पाहिजे तितकें कौशल्य रघुनाथरावांच्या आंगीं नाहीं ही गोष्ट नानासाहेबांच्याही लक्षांत आल्यामुळें भाऊला लष्करी खात्याचा मुख्य नेमून त्याच्या हाताखालीं रघुनाथरावाला देण्यांत आलें होतें. रघुनाथरावाच्या स्वारीमुळें कर्जाची वाढ होते, हें एक केवळ निमित्त होतें. तेव्हां संधी येतांच भाऊनें इब्राहिमखानास पदरीं ठेवून पेशव्याच्या तोफखानी फौजेचें सामर्थ्य आणखी जास्त वाढविलें.

मुजफरखानास ही गोष्ट सहन झाली नाहीं. भाऊसाहेबानें आपल्याविरुद्ध प्रतिस्पर्धी उभा करण्याकरतांच इब्राहिमखानास आणलें अशी त्यानें स्वतःची समजूत करून घेतली. तो संतापून गेला. आपल्या नेमणुकीविरुद्ध भाऊसाहेबांचें मत होतें हें तो जाणून होता. भाऊसाहेबांना तो पाण्यांत पाहूं लागला.. इब्राहिमखानाची नेमणूक हा आपला अपमान आहे; आपल्याला नोकरीवरून काढून टाकण्याची ही तयारी आहे. तेव्हां या गोष्टीचा सूड घेण्याचें

त्यानें ठरविलें. तशा संधीची तो वाट पाहूं लागला व २८ ऑक्टोबर १७५९ रोजीं पुणें येथें सदाशिवरावभाऊ गारपिरावर असतां मुजफरखानाचा जांवई हैदरखान भाऊच्या डेऱ्यांत शिरला व त्यानें त्याच्यावर हत्यार चालविलें. शिलेदार नागोजी गुजर भाऊजवळ उभा होता. त्यानें खुनी इसमाचा हात वरचेवर धरून भाऊचा बचाव केला. तरी सुद्धा बरचीचें टोंक भाऊच्या पाठींत घुसलें व त्याला लहानशी जखम झाली. हैदरखानास पकडण्यांत आलें. थोडीशी दमदाटी देतांच मुजफरखानाचे सांगण्यावरून आपण हें काम केलें असें त्यानें कबूल केलें. त्याचबरोबर मुजफरखानासही ताबडतोब पकडण्यांत आलें. त्यानेंही आपला गुन्हा कबूल केला. विशेष तपास न करतां व चर्चा न करतां दोघांचाहि एकदम शिरच्छेद करण्यांत आला.

भाऊसाहेबांच्या कैफियतींत या प्रकरणासंबंधानें पुढील उल्लेख आढळतो.

" संध्याकाल समयीं मुजफरखानाचा जांवई भाऊचे डेऱ्यांत येऊन पाठी-मागून हूल चालविली. ते चुणी लागली. खुनी सांपडला. त्यांनीं नांवे घेतलीं. त्यासुद्धां डोकीं मारलीं. मुजफरखानाचें डोकें मारलें. तपास फारसा केला नाहीं. रामचंद्र नारायण प्रभू म्हणून कोणी त्या मसलतींत होता. त्यासही धरून आणून मरेपर्यंत एका किल्ल्यावर ठेवलें. दोन हजार फौज मुजफरखानाचें घर कैद करावयास पाठविली. हस्तगत करून व माल सर-कारांत दाखल करून बायकामुलें सिंहगडावर घातलीं. "

खुनासंबंधानें व खुनी लोकांच्या पारिपत्यासंबंधानें लिहितांना ' विशेष तपास न करतां व चर्चा न करतां ' अशी शब्दयोजना मराठी रियासतींत (म. रि. म. वि. ३ रा पा. ३९७) करण्यांत आली आहे. खाली टीपेंत (का. सं. प. या. पृ. ५०६ खंड २ प. १५१ खंड १ टीप २३१) असा हवाला दिला आहे. भाऊच्या कैफियतींत तपास फारसा केला नाहीं, असें म्हटलें आहे व रामचंद्र नारायण प्रभू या मसलतींत होता, ही एक नवीन गोष्ट सांगितली आहे. तेव्हां हा रामचंद्र नारायण प्रभू कोण व याबाबत विशेष तपास केला नाहीं व चर्चा केली नाहीं, याचा अर्थ काय ? या दोन्ही उल्लेखांवरून भाऊसाहेबाचा खून करण्याच्या या प्रय-त्नाच्या मुळाशीं केवळ मुजफरखानाचा संताप व सूडबुद्धीच नव्हती तर भाऊसाहेबाचा खून करण्याचा कट झाला होता व त्यांत कांहीं महत्त्वाच्या

व्यक्ति होत्या, अशी शंका येण्यास प्रबळ जागा आहे. थोडासा जास्त तपास केला असता व गुन्ह्यासंबंधानें आणखी चर्चा चालू ठेवली असती तर या कटांतील व्यक्तींचीं नांवें बाहेर पडलीं असतीं, असाच त्याचा अर्थ होतो.

## उदगीरची मोहीम

शिंदखेडची मोहीम झाल्यावर निजामानें केलेला तह अमलांत आणला नाहीं व तहाच्या वेळीं कबूल केलेला पंचवीस लक्षांचा मुलुख पेशव्याचे हवालीं केला नाहीं. उदगीरच्या मोहिमेच्या मुळाशीं असलेल्या अनेक कारणां-पैकीं, हें एक मुख्य कारण होतें. १७५९ त सलाबतजंगानें आपला धाकटा भाऊ निजामअल्ली यांस दिवाणगिरीच्या पदावर नेमलें, हें मागें सांगितलेंच आहे. निजामअल्ली तरुण व महत्त्वाकांक्षी होता. दिवाणगिरी त्याला मिळाली व निजामी राज्याच्या सर्व कारभाराचीं सूत्रेंच त्याच्या हातीं आलीं. त्याचा त्यानें भरपूर फायदा घेतला. बुसी बाजूला झाला. फ्रेंच लोकांचें दरबारांतील वर्चस्व कमी झालें, तेव्हां सलाबतजंगानें यापुढें आपल्या तंत्रानें चालावें, अशी पेशव्याची व त्याच्या बरोबरच्या मुत्सद्यांची मनीषा होती. सलाबतजंगाच्या कारकीर्दींत निजामी राज्याची सत्ता सर्वतोपरि मोडकळीस आली होती. भावांभावांतील तंटा व त्यापेक्षांही फ्रेंच, पेशवे व इंग्रज यांची या कारभारांत शिरून तो आपल्या हातांत आटोपून घेण्याची खटपट आणि याच्या भरीला मुख्य धनी सलाबतजंग याचा दुबळेपणा या सर्व कारणांमुळें निजामी सत्तेची इमारत पोखरून गेली होती. या सत्तेला सावरून धरायचें तर कोणत्या तरी दुसऱ्या सत्तेचा आधार घेणें जरूरीचें होतें. दिवाणगिरी मिळाल्यावर निजामअल्लीनें हा आधार प्रथम शोधला. इंग्रजांच्या वाढत्या वर्चस्वामुळें दक्षिणेंतील फ्रेंचांची सत्ता निष्प्रभ झाली होती. तसेंच दिल्लीची बादशाही दिवसेंदिवस अधिकाधिक दुर्बल होत चालल्यामुळें मराठयांनीं हिंदुस्थानांत सर्वत्र आपली हिंदुपदपातशाहीची सत्ता वाढविण्याचे प्रयत्न चालविले होते.

निजामी सत्ता सावरून धरण्याकरतां कोणाशीं सहकार्य करावयाचें ? इंग्रजांशीं का पेशव्याशीं ? मुसलमानी सरदारांच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें निजामअल्लीनें स्वराष्ट्रीय पेशव्यापेक्षा इंग्रजच अधिक बरे, असें ठरविलें.

निजामअल्लीच्या बापानें बाहेरच्या नादिरशहास बोलावून दिल्लीची व साता-रची सत्ता मोडून काढण्याचा कट केला होता. तो त्यास साधला नाहीं. बापाच्या मरणानंतर निजामशाहींत अनेक घोटाळे उत्पन्न झाले व निजामाची सत्ता दुर्बल झाली तेव्हां ती सांवरून धरण्याकरतां निजामअल्लींनें बापाचाच कित्ता गिरविला व इंग्रजांसारख्या परकीय सत्तेच्या गळयांत गळा घातला. त्यानें उत्तर सरकारप्रांत इंग्रजांस देऊं करून त्यांचा स्नेह संपादण्याचा प्रयत्न केला. इंग्रजांशीं अशा रीतीनें स्नेह संपादन केल्यानें पेशव्यास चांगला शह देतां येईल व निजामी सत्ता पुन्हा प्रबळ करतां येईल, असें त्याला वाटलें. उत्तर सरकारचा प्रांत सलाबतजंगानें फ्रेंचांस पूर्वीं दिला होता. पण बुसी निघून गेला व फ्रेंचांची या भागांतील ताकद कमी पडल्याबरोबर निजामअल्लीनें तो हस्तगत केला व इंग्रजांशीं सख्य जोडण्याकरतां त्यानें तो इंग्रजांस देऊन टाकला. या बाबतींत सलाबत-जंगाचा सल्ला घेण्याचीही जरूरी त्याला भासली नाहीं. भोळया सलाबत-जंगाला आपली गादी सुरक्षित राहावी, एवढीच इच्छा होती. पेशव्याच्या साह्यानें आपला उद्देश साध्य होत असेल तर त्याला आपल्या मदतीस घेण्यास त्याची तयारी होती. पेशवे काय किंवा इंग्रज काय त्याला सार-खेच वाटत होते. पण महाकारस्थानी निजाम अल्लीला ही गोष्ट पटणें शक्य नव्हतें. राष्ट्रीय हिंदुसत्तेपेक्षां परराष्ट्रीय त्रयस्थच बरे असें त्याला वाटलें. १७५७ सालीं झालेल्या प्लासीच्या लढाईपासून इंग्रजांची हिंदु-स्थानातील सत्ता वाढत्या प्रमाणावर होती. बंगाल व त्यानंतर मद्रासमध्यें त्यांनीं आपले हातपाय पसरले होते. क्लाइव्हचा उद्योग इंग्रजांच्या सत्तेच्या वाढीला कारणीभूत झाला होता. अशा परिस्थितींत निजामअल्लीनें इंग्र-जांशीं सख्य जोडलें व त्यांच्या साहाय्यानें निजामी गादीचें संरक्षण करा-वयाचें व त्याचबरोबर आपल्या जवळच्या मराठी सत्तेला आळा घालून त्यांची नांगी तोडायची, असें निजाम अल्लीनें ठरविलें.

अशा रीतीनें निजामच्या दरबारांत निजाम अल्लीचें वाढत चाललेलें प्रस्थ पाहून व त्यानें चालविलेल्या कारस्थानाचे लांबवरचे धागेदोरे लक्षांत आणून सदाशिवराव भाऊ व नानासाहेब यांनीं दक्षिणेतील मुसल-मानी सत्तेचा हा निजामाचा कांटा कायमचा उखडून काढून त्याचा नाश

करण्याचें ठरविलें आणि ही गोष्ट लांबणीवर पडूं नये म्हणून ता. १ आक्टोबर १७५९ रोजीं दसऱ्याच्या मुहूर्तावर पुण्याबाहेरं गारपिरावर डेरे देखील दिले.

अहमदनगरचा किल्ला रक्ताचा एक थेंबही न सांडतां पेशव्यांनीं हस्तगत केला. या मोहिमेंतील ही अगदीं पहिली घटना होय. अहमदनगरच्या या ठाण्याचा कविजंग नांवाचा एक मुसलमान किल्लेदार होता. किल्लेदारास आपल्याकडे वळवून त्याला लालूच दाखवून किल्ला हस्तगत करण्याचा भाऊचा व नानासाहेबांचा बहुता दिवसांचा विचार होता. काविजंगाचें व हैद्राबादच्या नबाबाचें अंतस्थ वांकडें आलें आहे, ही गोष्ट भाऊस व नानास त्यांच्या हेरांकडून पूर्वींच कळली होती. काविजंगास स्वतंत्र जहागीर देऊन किल्ला हस्तगत करून घेण्याचा विचार या मोहिमेपूर्वींच जवळ जवळ एक दीड वर्ष म्हणजे १७५८ च्या मार्चमध्येंच चालू होता. अहमदनगरप्रमाणें दौलताबाद किल्लाही हस्तगत करण्याचा प्रयत्न त्यावेळीं पेशवे बंधूंनीं चालविला होता. पण हे दोन्ही प्रयत्न प्रत्यक्ष निजामावर मोहिमेवर निघेपर्यंत सफळ झाले नाहींत. मोहिमेवर निघाल्यावर विसाजी कृष्णाच्या कारस्थानामुळें यापैकीं पहिला प्रयत्न साध्य झाला. किल्ला पेशव्याच्या स्वाधीन केल्यास पन्नास हजारांची जहागीर मिळवून देण्याचें विसाजी कृष्णानें कविजंगास आश्वासन दिलें. 'गोळी न वाजतां किल्ला सरकारी लोकांचे हवालीं झाल्यावर मतलबाचीं कलमें वंशपरंपरेनें चालतील,' अशा प्रकारची सनद पोंचल्याबरोबर किल्ला कबजांत आला. हा किल्ला हस्तगत केल्याबरोबर जुन्नर, शिवनेर, त्रिंबकेश्वरपासून नगर औरंगाबादेपर्यंतचा प्रदेश पेशव्यांना ताब्यांत घेतां आला. " पेशव्यांची राजधानी पुणें याच्या टप्प्यांतला हा प्रदेश होता. हा प्रदेश ताब्यांत असल्यामुळें निजामाला अगदीं खुद्द पुण्यावरदेखील चाल करून येतां येत असे."

या मोहिमेंत इब्राहिमखानास भाऊंनीं बरोबर घेतलें होतें. त्रिंबक व नगर हे किल्ले पेशव्यानें घेतले, असें कळल्यावर निजामअली व सलाबतजंग हे दोघेही मराठयांना मुकाबला देण्याकरतां निघाले. सलाबतजंगाचा आणखी एक भाऊ बसालतजंग याची अडवानीच्या सुभ्यावर नेमणूक झाली होती. त्यामुळें

तो तिकडेच होता. तो या मोहिमेंत आपल्या भावांना येऊन मिळाला नाहीं. निजामअलीनें आपल्याकडून लढाईची तयारी केली होती. पण ती फारच कच्ची होती. सलाबतजंगाच्या कारकीर्दींत अलीकडील कांहीं वर्षांत वसूल व्हावा तसा होत नव्हता. पगार न मिळाल्यामुळें फौजेंत असंतोष पसरला होता. पण मराठे एकाएकीं चालून आल्यामुळें त्याची गय करणें शक्यच नव्हतें. कसेंही करून त्यांच्यावर चालून जाणें निजामबंधूंना भागच होतें. निजामच्या तयारींतील हा लंगडेपणा भाऊला व नानासाहेबाला चांगला कळून चुकला होता. यामुळें नगरचा किल्ला घेतल्याबरोबर भाऊ निजामाच्या मुलखांत भरधांवपणें एकामागून एक ठाणीं हस्तगत करीत चालला होता. भाऊनें पेडगांवचा किल्ला हस्तगत केला व त्यानंतर बहादूरगड घेतला. तेथून पूर्वेच्या बाजूस मोर्चा वळवून त्यानें उदगीरवर चाल केली. राखीव फौजेसह खुद्द पेशवा नानासाहेब नगरास मुक्काम करून राहिला. 'निजामअलीखानांनी जहागीर दहा लाखांची व दोन किल्ले नगर व परांडा सरकारांत द्यावयाचा करार केला असता द्यावयास अनमान करूं लागले यास्तव डेरेदाखल होऊन फौज जमा केली'. असें या मोहिमेचें ताबडतोबीचें कारण भाऊनें गोविंद बल्लाळास पत्र लिहून कळविलें व त्याबरोबरच ' इब्राहिमखान सरकारांत येऊन चाकरीस राहिला, हणमंतराव व जानोजीराव निंबाळकर हे निजामाचे सरदार आपल्या घरींच आहेत, तिगस्तापेक्षां यंदा मोगल थोडका आहे' वगैरे गोष्टी कळवून आपली बाजू कशी बळकट व निजामाचा पक्ष कसा लंगडा आहे, हें भाऊनें गोविंदपंत बल्लाळास कळविलें आहे. गोविंदपंत बुंदेले याच सुमारास उत्तरेकडील हकीकतींचीं पत्रें पाठवून तिकडे कोणी तरी खासा स्वारी येण्याबद्दल मागणी करीत होता. त्याला उत्तर म्हणून 'दादांचें येणेंही त्या प्रांतीं आविलंबेंच होईल' असें त्यास आश्वासनही दिलें आहे.

उदगीरच्या या मोहिमेंत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, ही मोहिम खुद्द पेशवे घराण्यांतील पुरुषांनींच केवळ चालविली. पेशवा नानासाहेब नगरास राखीव फौजेसह तर भाऊ, दादासाहेब व विश्वासराव तिघेही एकमतानें या मोहिमेंत सामील झाले होते. शिंदे होळकर उत्तरेंत गुंतले होते व इतर कोणाहि सरदाराला पेशव्यांनीं या मोहिमेंत बरोबर

घेतलें नव्हतें. भाऊ व नाना स्वतःच्या बळावर मोहिम करूं शकतात व तींत यश मिळवूं शकतात, असें जणूं त्यांना जगाला दाखवावयाचें होतें.

निजामाची मात्र चोहोंकडून अगदीं दुर्दशा उडून गेली. एक रामचंद्र जाधवाखेरीज कोणीही मराठे सरदार निजामबंधूंना मिळाले नाहींत. व्यंकटराव निंबाळकर व आणखी एक दोन निजामाच्या पदरचे सरदार आठ दहा हजार फौज जमा करून धारूरास आले होते. तेथें त्यांना गांठून आपलें सामर्थ्य वाढविण्याचा विचार निजाम बंधू करीत होते पण तो त्यांचा बेतही भाऊनें हाणून पाडला. धारूरास जमलेले मराठे निजामास मिळाले म्हणजे निजाम आपल्याला जड जाईल, हें ओळखून 'भाऊ साहेबांनीं मनसबा करून रविवार माघ व॥ २ रोजीं प्रातःकाळीं (ता. ३ फेब्रुवारी १७६०) युद्ध उत्तम करावे असा सर्वांही निश्चय करून चालले. दोन प्रहरा मोगल मुकामास न येता आवळून राहिला. आम्हाकडील तोफ लागली. दोन प्रहरां युद्ध जाहालें. दहा अकरा हत्ती व पंधरा पावेतो तोफा आणल्या. सात आठ मातबर सरदार मारले. प्यादे व गारदी यास मीत नाहीं. आम्हाकडील पांच सात जण केशवराव पानशे तोफखान्यांचे दरोगे वगैरे शंभर दीडशे ठार व तीन चारशे जखमी झाले. दादाचे चिलखतावर तीर लागला. विश्वासरावांनीं तिरंदाजी बहुत उत्तम प्रकारें केली. त्रिवर्ग हत्तीवर स्वार होते.' असें या लढाईचें वर्णन मोठया बहारीचें आहे. या मोहिमेच्या दिवसांत विश्वासराव सडे स्वारीनें रात्रंदिवस घोड्यावर जिन ठेवून व बरोबर फौजा घेऊन मोगलांच्या मुलखांत धावाधाव करीत होता व मोगलाच्या वाटेवरील गांवें व खेडीं उद्ध्वस्त करून व जाळपोळ करून त्याच्या मार्गांत अनेक अडचणी उत्पन्न करीत फिरत होते. 'आतां कमर बांधली ती सोडूं नये' * असें रघुनाथरावानें भाऊस युद्धाला तोंड लागण्यापूर्वी कळविलें होतें. तसेंच.' आणिक एक मनसुबा सुचला आहे कीं, पांच हजार फौज व दोन तीन तोफा अशा भागानगर व जाधवरावाचे मुलखांत घालून खंडण्या घ्याव्या. धामधूम करावी, म्हणजे केवळ मोगल जेर येईल. रघुनाथरावानें सुचविलेला हा 'मनसुबा' फार चांगला होता. उदगीरच्या मोहिमेंतील

* पे. द. २५ पा. २४६

हेंच एक वैशिष्ट्य आहे. भाऊ, दादा व विश्वासराव एकदिलानें या मोहिमेंत शत्रूशीं लढत होते, एकमेकांना प्रोत्साहन देत होते व मोगल जेरीस येईल असे मनसुबे सुचवीत होते. रघुनाथरावाचा ज्योतिषावर फार विश्वास. ऐन मोहिमेंत असले तरी शत्रूवर नवा हल्ला चढवितांना आपली फौजेची तयारी तर जय्यत ठेवायचीच पण त्याबरोबरच आपल्याला यश येण्याकरतां शुभ ग्रहांची व शुभ योगांचीही मदत घ्यावयाची. रघुनाथरावानें यासंबंधाचें आपलें मत ऐन युद्ध प्रसंगीं म्हणजे ता. ३१।१।१७६० रोजीं मोहिमेची धामधूम चालू असतांना कळविलें आहे. ' गुरुवारी, शुक्रवारी, शनिवारी तीन दिवस बरे आहेत. म्हणोन सेवेसी लिहिलेंच आहे. आपणही दिवस पाहिलाच असेल. तरी निश्चयाची गोष्ट लिहिली पाहिजे. त्याप्रमाणें आम्ही सावध असो. गुरुवारपासून रविवारपावेतों बरेच आहे. परंतु बारा तेरा घटका एक मुहूर्त आहे. वेळ पाहून गांठ घालावी लागेल.'* त्या वेळच्या मराठे सरदारांचा व पेशव्यांचा व त्यांच्या घराण्यांतील पुरुषांचा ज्योतिषावर विश्वास होता, ही गोष्ट गंमतीची खरीच पण या सर्व हकीकती-वरून एकच बोध घेतां येईल व तो म्हणजे हे पेशवे बंधू व चुलते पुतणे एकजुटीनें सर्व दृष्टींनीं आपला पक्ष मजबूत बनवून शत्रूशीं दोन हात करीत होते.

या मोहिमेंत इब्राहिमखान गारद्याच्या तोफखान्यानें निजामी सैन्याची अगदीं धूळधाण उडविली. खुद्द नबाबालाही या तोफांच्या माऱ्यापुढें आपले हत्ती माघारे मुरडून न्यावे लागले. " तिसराका प्रहरीं नबाब व निजाम अलीखान दोघे भावांची स्वारी उभी होती. त्याचेजवळ आम्ही उभे होतो. इतक्यांत श्रीमंत भाऊसाहेबाकडील गोले आले ते उभयतां बंधूचे हत्ती उभे होते त्याचेपुढें राऊत उभे होते. हात दहा-काचे अंतराने ते येके राउताचे घोडियास गोला लागला ते घोडा ठार पडला. दुसरा गोला आला ते येक माणूस ठार झाले. गोले फार येऊं लागले तेव्हां नबाबानें हत्ती मुरडून माघारे नेले. ' × उदगीरच्या मोहिमेंत अस-लेल्या एका सैनिकाचें हें पत्र आहे. निजामाला धारूरास पोंचूं द्यावयाचें नाहीं. त्याच्या अगोदरच त्याच्या सैन्याचा फन्ना उडवायचा, या उद्देशानें

* पे. द. २५ पा. २५३. × पे. द. २५ पा. २५४

ता. ४ फेब्रुवारी १७६० रोजीं प्रात:काळीं भाऊ, विश्वासराव व रघुनाथराव निजामावर चालून गेले. मोगल सैन्याला मध्यें घेऊन डाव्या उजव्या बाजूनें त्याच्यावर हल्ले चढवायचे अशी या युद्धाची रचना करण्यांत आली होती. उजवे बाजूस भाऊ व डावे बाजूस रघुनाथराव आपल्या पथकांसह निजामावर तुटून पडले. या दिवशीं निजामअल्ली आपले सैन्याभोंवती तोफखान्याचा गोल धरून पेशव्याच्या सैन्याची फळी फोडून बाहेर पडून निसटून जाऊं पहात होता. त्याचा हा बेत पेशवे बंधूंनीं हाणून पाडला. मोगल सैन्याच्या पिछाडीवर व तसेंच डाव्या व उजव्या बाजूंवर एकसमयावच्छेदेकरून जोराचे हल्ले चढविण्यांत आले. इब्राहिमखान्याच्या तोफखान्यानें तर नेमकीं गोलंदाजी करून शत्रूच्या सैन्याची धुळधाण उडविली. हें युद्ध एक प्रहरपर्यंत फारच निकराचें झालें. हें निकराचें युद्ध असेंच आणखी एक दोन तास चाललें असतें तर निजामबंधू आपल्या सैन्यासह धुळीस मिळाले असते. पण संध्याकाळ होत चालला व निजामअल्लीनेंही प्रसंगावधान राखून पेशव्यांशीं सलोखा करण्याची तयारी दाखविली. दुसरे दिवशीं त्यानें आपले वकील तहाचीं बोलणीं करण्याकरतां भाऊसाहेबांकडे पाठविले. पेशवे सांगतील त्या अटीवर तह करण्यास आपण राजी आहों, हें दर्शविण्याकरितां निजामअल्लीनें विट्ठल सुंदर याजपाशीं शिक्के कट्यार देऊन भाऊसाहेबाकडे पाठविले. तह करण्याच्या बाबतींत पुष्कळ रदबदल्या झाल्यावर पुढील अटीवर तह कायम करण्यांत आला. (१) सोळा लाखांची जाहागीर द्यावी. (२) अशीरगड व दौलताबाद हे दोन किल्ले आणि (३) विजापूर व बऱ्हाणपूर हीं दोन शहरें पेशव्यांस द्यावीं.

उदगीरची ही मोहीम इतकी यशस्वी झाली होती कीं, निजामचा सर्व मुलूख हस्तगत करून दक्षिणेंतील त्याची सत्ता समूळ नेस्तनाबूद करतां आली असती व मराठ्यांचा फार दिवसांचा दक्षिण मोकळी करण्याचा बेत प्रत्यक्ष अमलांत आला असता. परंतु उत्तरेंतील मराठे सरदारांवर आलेल्या पेंचप्रसंगाचीं पत्रें याच वेळीं येऊन पोंचल्यामुळें, हें युद्ध आटपतें घ्यावें लागलें, असें भाऊनें गोविंदराव बुंदेल्यास कळविलें.

उदगीरच्या लढाईत पूर्णपणें पराजित झालेल्या निजाम बंधूंनीं तहाच्या वेळीं अशीरगड व दौलताबाद हे दोन किल्ले पेशव्यास

देण्याचें कबूल केलें त्याप्रमाणें दौलताबादचा किल्ला कबजांत घेण्याकरितां गोपाळराव पटवर्धन यास पाठविण्यांत आलें. तह झाला असला तरी हुजूर हुकूम येईपर्यंत किल्ला कोणाच्याही ताब्यांत देतां यावयाचा नाहीं अशी सबब सांगून दौलताबादच्या किल्लेदारानें किल्ला ताब्यांत देण्यासंबंधानें दिरंगाई चालविली. आपल्या हुकुमाची तामीली ताबडतोब करण्यांत आली पाहिजे अशी पेशव्याची आपल्या सरदारांना नेहमीच ताकीद असे. भाऊचा तर या बाबतींत फारच कटाक्ष होता. किल्ला घेण्याच्या कामीं गोपाळराव पटवर्धन किल्लेदाराच्या गोड गोड थापांना भुलतो व दाखवावा तितका कडकपणा दाखवीत नाही ही गोष्ट पेशव्याला सहन झाली नाहीं. तेव्हां नानासाहेबानें गोपाळराव पटवर्धनाला एक खरमरीत पत्र लिहिलें. अनेक दृष्टीनें विचारार्ह व बोधप्रद असें हें पत्र असून पेशवे बंधू आपल्या हाता-खालील सरदारांशीं कसें धोरण ठेवीत व त्यांच्याकडून दौलतीचीं कामें करून घेत याची कल्पना येण्याजोगी आहे. ता. १ एप्रिल १७६० चें हें पत्र आहे.

" वारंवार लिहिता कीं, हीं स्थळें दुर्घट आहेत. शहास गुंततां येत नाहीं. विचारें कार्यसिद्धि करावी लागत्ये. यास्तव हल्ला रहाविला म्हणून लिहिता. अपूर्व वाटतें ! विचार दुरंदेशी तुम्हासच कळतें हे पूर्ण प्रत्ययास येऊन गेले. परंतु हें राजकारण प्रथम नरम धरिलेत रसद बंद केली ये गोष्टीचीं तारीफ चि. भाऊ वगैरे सर्व शाहाणे फार करतात, तुम्हास स्थळें अवघड वाटतात. परंतु श्रीकृपेनें तृणप्राय आहेत. मल्हारबांनीं घोडपल्ला करून घेतलीं तें स्थळ हल्ला करून घ्यावयाचें होतें. कालच्या मोगलावर उभयता चिरं-जिवांनीं सफेजंगी केली. एका लढाईत मोगल चक्काचूर केला हें कोणाच्या तर्कांत येत होतें ? लाखो असाध्य कामें श्रीकृपातेजप्रतापांमुळें तृणप्राय आहेत. परंतु करणारासारखें फळ होतें. तुम्ही सख्त जलद शिपाई असें जाणून मी तुम्हाला पाठविलें होतें. तुम्हीच आम्हास विचार लिहिणारे इतके कळले असतें तर येकादे लहान सहान पथक पाठविलें असतें. तो प्रथम दिवशींच रसद बंद करतां, कांहीं द्यावयाचें न बोलत, म्हणजे आज काम झालें असतें. तुम्ही मातबर, तुम्हास कार्य झाल्यावांचून आणतां नये. यास्तव तुम्हास यश यावें म्हणून तुम्हासच अन्याय करतो, तें तुम्ही करीत नाहीं. त्याला ये गोष्टींत इलाज कोणता करावा. गोपाळरावजी, हे दौलता-

बाद तुम्हास दुर्घट वाटते. परंतु दोन महिन्यांत सख्तीनें वेढा घालून एक रुपया न देतां घेऊं. कां कीं, त्याची कुमक कोणी करीत नाहीं. मोगलानें कुमक केली तर पुनरपि श्रीकृपेनें पन्नास हजार फौज जमा करून अगदी मोगल दक्षिणेंत होता कीं नव्हतासा करूं. हे मोगल समजले आहेत. तुम्ही समजत नाहीं यास इलाज काय करावा ? तुम्हास बहुत दुरंदेशी समजतें. रागें भरून लिहिले म्हणून तुम्हास राग येईल. परंतु तुम्ही वारंवार आम्हास विचार लिहितां यास्तव लिहिणें प्राप्त झालें. या पत्रापूर्वी कार्य जाहालें असेल तर उत्तम आहे. नाहींतर परिछिन्न शहर फन्ना घेऊन वेढा बसविणें. श्रीकृपेनें कार्य होईल. जो जो तुम्ही राजकारणें करतां तो तो काम नासतें. या उप्पर या पत्रावरून जितका राग येईल तितका त्यावर काढणें. जर कार्य जाहालें असेल तर व्यर्थ राग येऊ न देणें. तुमचा स्वभाव रागीट यास्तव इतके दिवस सतत लिहिलें नाहीं. आता वारंवार तुम्ही विचारूं लागला तेव्हा नाइलाज म्हणून लिहिलें आहे. हें पत्र कोणास ठाऊक नाहीं. लेकरादाखल सेवकावर येकांनीं रागे भरल्यास वाईट मानू नये."

किती खुबीचें आहे हें पत्र ! या पत्रांत काय नाहीं ? दटावणी आहे, लाडीगोडी आहे, उत्तेजन आहे, हेटाळणी आहे, माणसाच्या स्वभावाची पारख आहे. तसेंच त्याच्या कलानेंच घेण्याचें धोरण आहे.

हें पत्र हातांत पडल्याबरोबर गोपाळराव पटवर्धनाला स्वस्थ बसून राहणें शक्यच नव्हतें. त्यानें किल्ल्यावर तावडतोब हल्ला चढविला. या कामीं गोपाळराव खुद्द जातीनें हल्ल्याचें काम पाहात होता. व ता. ८ एप्रिल १७६० रोजीं किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण चढविलें. पण हें सर्व करतांना किल्लेदाराची गोपाळरावानें गय केली. किल्लेदारास पस्तीस हजारांची जाहागीर व एक लक्ष पंधरा हजार नगद देण्याचा करार केला ही गोष्ट नानासाहेबास मुळींच आवडली नाहीं. गोपाळरावांवर याबद्दल त्याची इतराजीही झाली.

भाऊनें बऱ्हाणपुरावर हल्ला करून तें हस्तगत केलें होतें. उदगीरच्या या विजयानें जुन्नर, शिवनेर, त्र्यंबक, सालेर, मुल्हेर, नगर, अशीरगड, दौलताबाद, बऱ्हाणपूर, विजापूर इतकीं ठाणीं व शिवाय बासष्ट लक्षांची जाहागीर इतका प्रदेश पेशव्यास मिळाला. या विजयामुळें निजामाची

सत्ता बहुतेक संपुष्टांतच आली. पेशव्यांनीं ती पूर्णच नष्ट केली असती. पण उत्तरेंत अबदालीशीं दत्ताजीनें केलेला युद्धप्रसंग व त्यांत त्याचा झालेला अमानुष वध याची हृदयद्रावक बातमी उदगीरच्या या लढाईच्या दिवसांतच येऊन थडकली व येथें मिळालेल्या विजयोत्साहांत या बातमीनें मीठ टाकून सर्व आनंदाचें मातेरें करून टाकलें.

---

# पानिपत

## ( पूर्वार्ध )

उदगीरच्या मोहिमेच्या ऐन मोक्याच्या प्रसंगीं उत्तर हिंदुस्थानांतील अनर्थांचीं व दत्ताजी शिंद्याच्या वधाचीं पत्रें येऊन पोंचलीं. त्यामुळें दक्षिण मोकळी करण्याचें काम अर्धेंच टाकून पेशव्याला उत्तर हिंदुस्थानाकडे लक्ष द्यावें लागलें हें मागें सांगितलेंच आहे. उत्तरेंत घडून आलेल्या अनर्थपरंपरेंतून पानिपतच्या मोहिमेचा प्रसंग उद्भवला. तेव्हां या अनर्थपरंपरेची कल्पना येण्यास व पानिपतच्या मोहिमेची भूमिका समजण्यास या प्रसंगापूर्वींच्या दहा बारा वर्षांत दिल्लीचा बादशहा, त्याचे सुभेदार, सरदार, रजपूत राजे, जाट, रोहिले, पठाण, यांच्यामधील परस्पर संबंध व राज्यसत्ता कायम करण्याकरतां यांच्यांत उद्भवलेलीं अनेकविध कारस्थानें यांची साकल्यानें माहिती होणें जरूरीचें आहे. पानिपतच्या इतिहासप्रदेशांत सुलभ संचार करण्यास वरील हकीकतीची सामुग्री अवश्य जवळ पाहिजे.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर दिल्लीची बादशाही कमजोर झाली. या गोष्टीचा फायदा मराठ्यांनीं अर्थातच घेतला. दुर्बल होत चाललेल्या व आपसांतील कलहामुळें आत्मविश्वास नाहींसा झालेल्या सत्तेला स्वसंरक्षणाकरतां नेहमींच दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहावें लागतें. बादशाही मोडकळीला येत चालली त्यावेळीं मराठ्यांची सत्ता वाढत्या प्रमाणावर होती. मराठ्यांचे सरदार अहमहमिकेनें दक्षिण व उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत करीत चालले होते. साहजिकच दिल्लीच्या बादशहांनीं या वेळीं मराठ्यांच्या साह्याची अपेक्षा केली. मनांत आणलें असतें तर मराठ्यांनीं दिल्लीपदपादशाही औरंगजेबाच्या मृत्यूनंतर केव्हांच धुळीला मिळविली असती. सय्यदबंधूंच्या कारस्थानांच्या वेळीं व विशेषतः नादीरशहाच्या स्वारीनंतर सर्वतोपरी हतबल झालेल्या बादशाहील नामशेष

करणें फारसें अवघड नव्हतें. पण मोगल घराण्यासंबंधानें शाहूला वाटणाऱ्या जिव्हाळ्यामुळें बादशाही सत्ता हातात घ्यावी पण बादशाही तख्त कायम ठेवावें. या धोरणामुळें ही बादशाही अस्तित्वांत राहिली. शाहूच्या या धोरणाप्रमाणें कां होईना, त्याचे सर्वाधिकारी पेशवे व त्यांचे सरदार मनापासून व कळकळीनें वागते तर बादशाहीवर वारंवार आलेलीं संकटें टळलीं असतीं व बादशहाला नाममात्र गादीवर ठेवून सर्व सत्ता संपूर्णतया पेशव्यांना आपल्या हातांत ठेवतां आली असती.

बाळाजी विश्वनाथ, पहिला बाजीराव व नानासाहेब या तीन्ही पेशव्यांच्या कारकीर्दींत बादशहानें मराठ्यांकडे मदतीची याचना केली. या सहाय्यादाखल मराठ्यांना कांहीं मुलूख तोडून दिला व बादशाहीच्या जवळ जवळ सर्वच सुभ्यांतून चौथाई सरदेशमुखीचे हक्क वसूल करण्याच्या सनदा दिल्या. पण दुःखाची व आश्चर्याची गोष्ट ही कीं, बादशहाशीं वेळोवेळीं झालेल्या या तहनाम्यांत केलेले करार व दिलेलीं अभिवचनें मराठ्यांनीं पाळिलीं नाहींत. त्यामुळें दिल्लीची बादशाही अधिकाधिक दुर्बल होत गेली आणि या परिस्थितीमुळें मराठी सत्तेचेंही कल्याण न होतां दुसऱ्याच परकीय सत्तांना हिंदुस्थानांत हातपाय पसरण्यास वाव मिळाला. बादशाहीवर ज्या ज्या वेळीं संकटें आलीं त्यावेळीं पेशव्यांनीं खुद्द बादशहाला मदत करण्याऐवजीं त्याच्या वजीरांनीं व इतर दरबारी सरदारांनीं उपस्थित केलेल्या कारस्थानांत ते शिरले व प्रसंग पडेल त्याप्रमाणें एकदां एक व दुसऱ्यांदा भलताच कोणी तरी अशा पक्षाला मदत करण्याचें धरसोडीचें धोरण त्यांनीं पतकरलें. या वर्तनामुळें पेशव्याचें व मराठे सरदारांचें व्यक्तिशः कल्याण झालेलें दिसलें तरी एकंदर मराठी राज्याच्या सत्तेच्या वाढीच्या व शाश्वतीच्या दृष्टीनें हें धरसोडीचें धोरण विघातकच ठरलें. मराठ्यांच्या बळकट मनगटानें बादशाहीचा राजदंड पक्का धरून ठेवण्याचें धोरण न ठेवल्यामुळें बादशाहीखालीं नांदणाऱ्या सरदारांना मराठी राज्याविरुद्ध कारस्थानें करण्यास सवड मिळाली. बाहेरच्या परक्या सत्तांना आमंत्रणें देऊन मराठ्यांना नेस्तनाबूद करण्याचे अनेक प्रयत्न त्यांनीं केले.

हैद्राबादच्या निजामानें नादिरशहाला हिंदुस्थानांत बोलावलें हा त्यांपैकीं पहिला प्रयत्न होता. त्यानंतर संधि सांपडतांच पंजाबचा अदीना बेग

व रोहिल्यांचा सरदार नजीबखान यांनींही अबदालीला हिंदुस्थानांत बोलावून मराठयांचा वरचष्मा हाणून पाडण्याचे एकामागून एक प्रयत्न केले. या त्यांच्या प्रयत्नामुळें या सरदारांच्या वैयक्तिक कारस्थानांनाही यश मिळालें नाहीं. तर उलट दिल्लीची बादशाही सर्वतोपरी कमकुवतच झाली व हिंदुस्थानांतील सर्वच देशी राज्यसत्तांना धक्का देणारा पानिपतचा मोठा प्रसंग यांतून उद्भवला.

अहमदशहा अबदाली यानें १७४८ सालीं हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली. पानिपतच्या मोहिमेच्या मुळाशीं असलेल्या कारणपरंपरेला या स्वारीनेंच सुरुवात झाली. स्वदेशांतील कुरबूर थांबावयाची असल्यास आपल्या जवळच्या फौजेला बाहेर दिग्विजयाचें काम द्यावें लागतें. खडें सैन्य ठेवणाऱ्या सरंजामदारी पद्धतीचा हा नेहमींचाच अनुभव आहे. अहमदशहा अबदालीनें हिंदुस्थानवर स्वारी करण्याचें ठरविलें. त्यांतील मूळ उद्देश हा होता. पण या उद्देशाला पोषक असें आणखी एक कारण घडलें.

नादीरशहाच्या स्वारीमुळें मोगल बादशहांची मध्य आशियापर्यंत असलेली सत्ता आकुंचित झाली. आसेतुहिमाचल अशी हिंदुस्थानची भूमीची अलीकडची कल्पना आहे. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास तसें सांगत नाहीं. हिंदुस्थानच्या चक्रवर्ति सम्राटांनीं काबूल कंदाहार घेऊन मध्य आशियापर्यंत भारतवर्षाची मर्यादा वाढविली होती. बाबर हिंदुस्थानांत आला, मोगली सलतनत हिंदुस्थानांत प्रस्थापित झाली, तरी मोगल बादशहांनीं काबूल कंदाहारपर्यंतच्या मध्य आशियांतील प्रदेशावरील आपला वारसा कायम ठेवला. औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत मोगल बादशहांनीं मध्य आशियांतील हा मुलूख हिंदुस्थानच्या मुलखाचाच एक भाग म्हणून त्याच्यावरील आपली सत्ता नष्ट होऊं दिली नाहीं. नादिरशहानें दिल्ली शहर मनमुराद लुटलें, हिंदी जनतेवर आपली दहशत बसविण्याकरतां शहरांतील नागरिकांची, स्त्री-पुरुषांची, म्हातारेकोतारे व मुलेंबाळें यांचीसुद्धां सरास कत्तल केली. त्याच्या सैन्यानें पुढें दक्षिणेकडे जाण्याचें नाकारलें म्हणूनच तो परत फिरला. पण स्वदेशास जातांना सिंधू नदीपर्यंतच्या प्रदेशावर अफगाणसत्ता कायम करून व त्या ठिकाणीं आपले अधिकारी नेमून तो परत गेला.

अफगाणी सत्तेचें पिलू हिंदुस्थानांत अशा रीतीनें शिरलें व या स्वारीनंतर

पंजाबमधील बादशाही मुलखावरील अधिकारी मंडळींत बेबनाव उत्पन्न झाला. नादिरशहा निघून गेल्यावर पंजाबांतील सुभेदार शहानवाजखान हयात असतांनाच या सुभेदारीच्या बाबतींत त्याचें व त्याच्या धाकट्या भावाचें पटेनासें झालें. हें भांडण दिल्ली दरबारच्या साहयानें मिटवून न घेतां शहानवाजच्या हाताखालील अदिना बेग नांवाच्या एका अधिकाऱ्यानें अहमदशहा अबदाली याच्याशीं खलबत करून सुभेदारीवर हक्क सांगणाऱ्या या धाकट्या भावाची खोड मोडण्याचें ठरविलें. अदीनाबेग सुलतानपूरचा एक साधा कारभारी होता. सरहद्दीकडील मुलखांत नादिरशहाच्या स्वारीमुळें बऱ्याच भानगडी उपस्थित झाल्या. एक सत्ता जाऊन त्या ठिकाणीं दुसरी सत्ता आली. त्याबरोबर अनेक कारस्थानी लोकांचें फावलें. हीं सर्व कारस्थानें अदिनाबेग पूर्णपणें जाणत होता. तो स्वतः महा पाताळयंत्री व प्रसंगीं वाटेल तें करण्यास मागें पुढें न पाहणारा असल्यामुळें तिकडील बादशाही अधिकाऱ्यांना त्याची मदत घेणें जरूर झालें होतें. शहानवाजखानाच्या मदतीकरतां अहमदशहा अबदालीस बोलावणें, हें या कारस्थानी पुरुषाच्या खटपटीचेंच फळ होतें. अबदालीला तरी तेंच पाहिजे होतें. आपल्या फौजेला बाहेर कामगिरी मिळाली व त्याबरोबरच मुलूखगिरी करायला सापडली; तेव्हां या संधीचा पूर्णपणें फायदा घेण्याचें अहमदशहा अबदालीनें ठरविलें असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं.

अहमदशहा अबदाली एक कर्ता, शूर, धाडसी व राजकारणी पुरुष होता. हिंदुस्थानच्या या स्वारीवर तो आला त्या वेळीं त्याचें वय अवघें चोवीस वर्षांचें होतें. नादिरशहाचे पदरीं अगदीं प्रथम त्याला एक सामान्य नोकरी मिळाली. पण थोड्याच वर्षांत आपल्या कर्तबगारीनें तो पुढें सरसावला. नादिरशहानें त्याची योग्यता जाणून त्याच्यावर अनेक जबाबदारीचीं कामें सोंपविलीं. १७४७ च्या जूनमध्यें नादिरशहा मारला गेला. त्या वेळीं त्याच्या मर्जीतल्या या चलाख व कारस्थानी पुरुषानें अफगाणी राज्य आपल्या कबजांत घेऊन थोडक्याच दिवसांत तेथें आपला चांगला जम बसविला. नादिरशहाच्या पदरचे सरदार जहानखान, शहापसंदखान, शहानवाजखां बामोझे वगैरे प्रमुख व लोकप्रिय सरदारांना त्यानें आपलेंसें केलें व आपल्या गोड व लाघवी स्वभावानें आपले विश्वासाचे साह्यकर्ते

बनविलें, अफगाणी दरबारांत अबदालीनें आपलें मनुष्यबळ याप्रमाणें वाढविलें. द्रव्यबल तर त्याच्यापाशीं भरपूर होतें. नादिरशहानें मिळविलेली अलोट संपत्ति त्याच्या हाताशीं होती. तेव्हां अशा रीतीनें उभय बलांनीं युक्त असलेल्या या अफगाणी सरदारानें आपली सत्ता वाढविण्याकरतां व आपल्या फौजेच्या पराक्रमाची रग जिरविण्याकरतां जवळच्याच फाटा-फुटीनें दुर्बल झालेल्या देशावर स्वारी करण्याचें ठरविलें हें अगदीं साहजिक होतें. पंजाबांतील सुभेदारीकरतां दोघा भावांत भांडण सुरू झालें व त्यापैकीं वडिल भावाला मदत करण्याकरतां अहमदशहा अबदालीला बोलावण्यांत आलें. अहमदशहा अबदालीला तरी दुसरें काय पाहिजे होतें ? जय्यत तयारीनिशीं त्यानें पंजाबवर स्वारी केली. १७४८ च्या आरंभीं तो पेशावर येथें आला. सरहद्दप्रांत काबीज करून तो पंजाबांत शिरला व मुलतान, लाहोर हे प्रांत त्यानें हस्तगत केले. वास्तविक पंजाबांतील सुभेदार शहानवाजखान याच्या मदतीकरतां तो आला होता. पण अदीनाबेग-मार्फत चाललेली ही वाटाघाट तेव्हां यशस्वी झाली नाहीं. शहानवाज खानानें उलट अबदालीवरच स्वारी केली. पण त्याचा पराभव झाला. अबदालीच्या तडाक्यापुढें त्याचा टिकाव लागला नाहीं; तो पळून गेला व अबदालीनें खुद्द लाहोरच हस्तगत केलें, हें पाहून दिल्लीचा या वेळचा दिवाण कमरुद्दीनखान अबदालीवर चालून गेला. अर्धांगवायूनें बादशहा आजारी असल्यामुळें तो अर्थातच युद्धास जाऊं शकत नव्हता. गंमतीची गोष्ट ही कीं, शहाजादा अहमद यास या स्वारीवर पाठविण्यास तो तयार नव्हता. शहाजादा या स्वारीवर गेला तर तिकडेच तो स्वतंत्र होऊन बसेल, अशी बादशहाला काळजी वाटली ! अफगाणचा शूर बादशहा हिंदुस्थानावर चालून येतो, तेव्हां या बाहेरच्या संकटाचें निवारण करणें हें पहिलें काम. पण बादशहाला आपला शहाजादा आपल्यापेक्षां शिरजोर होईल, स्वतंत्र होईल हीच विशेष भीति वाटली व शहाजाद्याऐवजीं जयपूरचा ईश्वर सिंग, सफदरजंग व मीरमन्नू या मंडळीस त्यानें वजिराच्या मदतीस पाठविलें. वजीर कमरुद्दीनला ही गोष्ट आवडली नाहीं. त्यानें बादशहाला गळच घातली. तेव्हां शहाजादा वजीराला येऊन मिळाला. मार्चच्या पहिल्या आठवड्यांत झालेल्या युद्धांत अबदालीचा पराभव झाला

व तो हाय खाऊन, सरहिंद सोडून परत अफगाणिस्थानाकडे निघाला. ता. १० मार्च रोजीं रणक्षेत्रावरील आपल्या तंबूंत नमाज पढत असतां कमरुद्दिन तोफेचा गोळा लागून पडला. वजीराच्या या आकस्मिक मृत्यूमुळें दिल्लीहून आलेल्या फौजेंत घोटाळा उडाला. पण त्यापूर्वींच अबदाली परत फिरला होता. बादशाही फौजेनें शहाजाद्याच्या नेतृत्वाखालीं त्याच्या फौजेचा धुव्वा उडविला. अबदालीनें परत जातां जातां कमरुद्दिनचा मुलगा मीर मन्नू यास पंजाबचा कारभारी नेमलें व सिंधू ओलांडून मे महिन्यांत तो कंदाहारास पोंचला. यापुढें दोन तीन वर्षें खुद्द अफगाणिस्थानांतील बंडें मोडण्याकरितां त्यास आपलें सर्व बळ खर्चीं घालावें लागलें. या स्वारींत अबदालीला कांहीं लभ्यांश झाला नाहीं. कमरुद्दिनखान मेल्याची बातमी त्याला लागली त्या वेळीं परत फिरण्यांत आपण उगाच घाई केली, असें त्यास वाटलें. एकदां फौज मागें फिरल्यावर व ती नामोहरम झाल्यावर शहाजाद्यानें अबदालीला काबूलपर्यंत मार देत मागें हटविलें. स्वदेशांत गेल्यावर अबदालीनें ठठ्ठा व काबूल हे नादिरशहाला बादशहानें पूर्वीं दिलेले प्रांत आपल्याला मिळावे, अशी मागणी केली. पराभूत झालेल्या अबदालीच्या या मागणीला कोण पुसणार? अबदालीनें नेमलेला मीर मन्नूच त्याच्यावर उलटून काबूल कंदाहारापर्यंतची त्याची सत्ता उखडून काढण्याच्या कामीं शहाजाद्याला मदत करीत होता. अशा रीतीनें १७४८ च्या या स्वारींत अबदालीला पूर्ण अपयश आलें. बादशाही दरबारांतील सरदारांनीं एकजुटीनें शहाजाद्याला मदत केल्याचा हा परिणाम होता.

शहाजादा अहमदशहा याप्रमाणें अबदालीला काबूलपर्यंत मार देऊन परत दिल्लीकडे येत असतां त्याचा बाप महमदशहा मरण पावल्याची बातमी त्याला समजली. त्यानें तावडतोब बादशाहीपद धारण केलें व सफदरजंग यास वजीरी व निजामउल्मुल्काचा मुलगा गाजीउद्दीन यास बक्षीगिरी ( सेनापति पद ) दिली. अहमदशहा शूर होता. पराक्रमी होता. पण तितकाच विलासी व हलक्या कानाचा होता. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, बादशाहाची आई उधम व जनानखान्यावरील मुख्य अधिकारी जावेद यांच्या तंत्रानें तो वागत होता. यामुळें साहजिकच तो दरबारी मंडळींत

अप्रिय झाला व ठिकठिकाणच्या सुभेदारांनीं आपआपल्या मुलखांत स्वतंत्र होण्याकरतां बंडें उभारलीं.

गंगायमुनांच्या दुआबांत राहणाऱ्या रोहिले पठाणांनीं या बाबतींत प्रथम पुढाकार घेतला. या भागांत रोहिले पठाणांचीं लहान लहान राज्यें असून त्यांचें मुख्य राजधानीचें शहर बरेली होतें. रोहिले सुनी पक्षाचे व सफदर-जंग वजीर शिया पंथाचा असल्यामुळें या भांडणांत आणखी अधिकच भर पडली. रोहिल्यांचा एक सरदार अली महंमद यानें १७४४ तच बादशाहीविरुद्ध बंड करून आपला स्वतंत्र सुभा निर्माण केला होता. अली महंमद १७४९ त मरण पावला. अली महमदाच्या तीन मुलांत गादीबद्दल तंटा सुरू झाला. या झगड्याचा फायदा घेऊन सफदरजंगानें रोहिलखंडांत स्वारी करून बहुतेक प्रांत जिंकला व त्या प्रांतावर नवलराय कायस्थ नांवाचा आपला कारभारी नेमला. सफदरजंगाचे पश्चात् रोहिल्यांनीं या कारभाऱ्याला ठार केलें. सफदरजंगानें रोहिल्यांचें हें बंड मोडण्याचा आणखी एकदां प्रयत्न केला; पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. पराभव पावून त्याला दिल्ली गांठावी लागली.

१७४८ च्या पहिल्या स्वारींत अबदालीला हार खावी लागली तरी हिंदुस्थानातील आपली गेलेली इज्जत भरून काढण्याकरतां पुन्हां या देशा-वर स्वारी करण्याची त्याची खटपट जोरानें चालू होती. दिल्ली दरबार-मध्यें चालू असलेलीं कारस्थानें इत्थंभूत समजून घेण्याची व्यवस्था त्यानें केली होती. पंजाबमधील अदीनाबेगसारख्या कारस्थानी पुरुषामार्फत पुढील स्वारीचे बेत तो करीत होता. संधी सांपडतांच तो पुन्हा हिंदुस्थानवर केव्हां चाल करून येईल, याचा नेम राहिला नव्हता.

दिल्लीच्या मोगल बादशाहीच्या गादीवर असलेला अहमदशहा विषय-विलासांत गुंग होता. त्याची आजी उधम व जनानखान्याचा कारभारी जावेद यांच्या हातीं दरबारच्या कारभाराचीं सूत्रें गेलीं होतीं. बादशहाच्या अंकित असलेले सर्व सुभेदार आपापल्या प्रांतांत स्वतंत्र बनत चालले व खुद्द दिल्लीजवळील रोहिल्यांनीं व पठाणांनीं बंडाचीं निशाणें उभारलीं होतीं. अशा परिस्थितींत गेलीं दोनशें वर्षें अस्तित्वांत असलेली मोगल सल्तनत आतां नष्ट होणार अशी भीति सफदरजंग व गाजीउद्दीन यांसारख्या मोगल

बादशाहीच्या एकनिष्ठ सरदारांना वाटूं लागली होती. सफदरजंग व गाजी-उद्दीन हे दिल्ली दरबारांतले त्या वेळचे कर्ते पुरुष होते. दोघांचाही ओढा मराठ्यांकडे होता, या संकटांतून पार पडायचें असल्यास मराठ्यांची मदतच घेतली पाहिजे, असें त्याचें ठाम मत झालें होतें. बादशाहीवर चोहोंकडून आलेल्या या संकटांना तोंड देण्यास मराठेच खबरदार आहेत, ही गोष्ट अहमदशहालाही पटली व शिंदे होळकरांमार्फत बादशहानें पेशव्याशीं एक महत्त्वाचा करार केला. पातशाहीच्या रक्षणाकरतां पेशव्यांनीं खडी फौज दिल्लींत ठेवावीच. पण त्याशिवाय मराठयांच्या सरदारांनीं रोहिले, पठाण वगैरे बादशाहीच्या शत्रूंचा ताबडतोब पाडाव करावा व बादशाही सुरक्षित राखावी हा या करारांतील मुख्य व अत्यंत महत्त्वाचा हेतु होता. ठठ्ठा, मुलतान, पंजाब, रोहिलखंड या उत्तरेकडल्या प्रदेशांतील चौथाईचा हक्क बादशाहानें मराठयांस बहाल केला होता. हेतु हा कीं, या चौथाई वसुलांत मराठयांनीं आपल्या फौजेचा खर्च चालवावा व बादशाहीवरील संकट तें आपलेंच संकट असें मानून मोगल बादशाहीचें संरक्षण करण्याच्या कामीं केव्हांही व कशाही प्रकारची कुचराई करूं नये. १७५० त हा करार झाला. या करारांत छत्रपतींचें नांव नसून पेशव्याच्या नांवानें हा करार करण्यांत आला हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यावेळीं पेशव्यांनीं मराठी राज्यांत कर्तुमकर्तुम् सामर्थ्य संपादन केलें होतें. सिंधपासून काशीपावेतों उत्तरेंतील सर्व बादशाही मुलुख मोगल बादशाहीच्या शत्रूपासून सुरक्षित राखण्याची जबाबदारी पेशव्यांनीं या करारानें पत्करली होती. या कराराचा मुख्य व ताबड-तोबीचा रोख बंडखोर रोहिल्यांचा बंदोबस्त करणें. व अबदालीनें हिंदुस्थाना-वर स्वारी करण्याचा उपद्व्याप केल्यास हिंदुस्थानांत तो पुन्हा कधीं पाऊल टाकूं शकणार नाहीं, अशी कडक व्यवस्था करणें हा होता.

या करारामुळें रोहिले व अबदालीचें पित्त खवळलें. पण पेशव्याला व त्याच्या सरदारांना या जळफळाटाची पर्वा करण्याचें कांहींच कारण नव्हतें. मराठ्यांचें सामर्थ्य या वेळीं इतकें पराकोटीला पोंचलें होतें कीं, एकजुटीनें पेशव्यांनीं व त्याच्या सरदारांनीं आपलें शक्तिसर्वस्व आपण पत्करलेली जबाबदारी पार पाडण्याच्या कामीं खर्च केलें असतें तर करारांतील सर्व उद्देश पूर्णांशानें साध्य झाले असते. रोहिल्यासारख्या हिंदुस्थानांतील

बंडखोरांचें पारिपत्य तर झालेंच असतें आणि अबदालीसारख्या भुरट्या परदेशीय लुटारूंना हिंदुस्थानकडे पाहाण्याची देखील ताकद राहिली नसती. या करारानें दिल्लीच्या बादशहानें आपली सत्ता मराठ्यांच्या जणूं काय हातांतच सोंपविली होती. दुर्दैवाची गोष्ट ही कीं, पेशव्यांना या संधीचा उपयोग करून घेतां आला नाहीं. १७४९ त शाहू छत्रपती मरण पावला. त्यानंतर दोन तीन वर्षे पेशवा पुणें सातारा सोडून बाहेरच पडला नाहीं. घरगुति भानगडी व कटकटी मिटविण्यांतच त्याच्या नाकीं नव आले. पण पेशव्याला किंवा पुण्यांतल्या खासा स्वारीला उत्तरेंत येणें शक्य झालें नाहीं तरी वरील कराराप्रमाणें शिंदे होळकरांनीं प्रथम रोहिल्याची खोड मोडण्याचें ठरवून त्यांच्यावर चोहोंकडून स्वारी केली.

शिंदे-होळकरांच्या एकजूट झालेल्या फौजेपुढें रोहिल्यांच्या टिकाव लागणें शक्य नव्हतें, हें जाणूनच रोहिल्यांनीं मराठ्यांना शह देण्याकरतां अबदालीला बोलावणें केलें. अबदालीनें या संधीचा फायदा घेऊन पंजाबवर दुसरी स्वारी केली. पंजाबचा सुभेदार मीरमन्नू यानें बादशहाची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. पण सफदरजंगानें या गोष्टीकडे दुर्लक्ष केलें. बादशहा तर विषयविलासांतच मग्न होता. अबदालीची ही स्वारी १७५१ च्या मार्च महिन्यांत झाली. अबदालीनें मीरमन्नूचा पूर्ण पराभव केला. मीरमन्नूचा कारभारी कोडमल अबदालीशीं केलेल्या लढ्यांत ठार झाला. सर्वतोपरी असहाय्य झालेल्या मीरमन्नूनें अखेर अबदालीशीं तह केला. ठठ्ठा, मुलतान, लाहोर, काबूल हे अबदालीला पाहिजे असलेले प्रांत मीर मन्नूनें त्याला दिले. अबदालीनें एवढ्यावरच तूर्त समाधान मानलें. वर उल्लेखिलेल्या प्रांतांचें संरक्षण करण्याची जबाबदारी पेशव्यांनीं १७५० च्या करारानें घेतली होती. मराठ्यांचा नक्षा उतरण्यास आपली ही कामगिरी पुरेशी आहे, असें त्यास वाटलें. अबदालीला पंजाबांत विजय मिळाला तरी शेफारून जाऊन तो खालीं दक्षिणेंत उतरला नाहीं. पंजाबांतील आपली सत्ता कायम राखण्याकरतां आपला सरदार नासिरजंग यास त्यानें या प्रांताच्या कारभारावर नेमलें.

शिंदे-होळकरांनीं १७५० चा करार झाल्यानंतर प्रथम रोहिल्यावर शस्त्र धरलें. मराठे सरदारांपासून आपलें संरक्षण करून घेण्याकरतां रोहिल्यांनीं

अबदालीला बोलावलें. पण आपल्याला पाहिजे ते प्रांत मिळाल्यावर त्यानें रोहिल्यांच्या विनंतीची कदर केली नाहीं. रोहिल्यांना आपल्या बळावरच शिंदे–होळकरांच्या हल्ल्याला तोंड द्यावें लागलें. शिंदे–होळकर आपल्यावर येतात, असें पाहून रोहिल्यांनीं प्रयाग–काशीपर्यंत हिंदूक्षेत्रांवर चालून जाऊन धुमाकूळ उडवून दिला. प्रयाग शहर लुटलें. स्त्रिया पाडाव करून नेल्या. काशीमध्यें रोहिल्यांच्या धुमाकुळानें लोक घाबरून गेले. आठ दिवस लुटालूट चालू होती. रोहिल्यांच्या भीतीनें लोकांनीं दोन तीन दिवस रात्रीं दिवासुद्धां लावला नाहीं. फरूखाबादच्या अहंमद बंगशानें ही दंगल उठविली होती. अहमदखानबंगशानें बहादूरखां रोहिल्याशीं संगनमत केलें. या दोन्ही सरदारांशीं फरूखाबाद येथें मराठ्यांची लढाई झाली. या लढाईत बहादुरखां मारला गेला. अहंमदखान पळून गेला. फरूखाबादच्या या लढाईत रोहिल्यांना पूर्ण पराजित करून होळकरानें त्याजकडून ५० लाख रुपये घेण्याचा करार केला.

रोहिल्याचा पराभव झाल्यावर मल्हारराव होळकरानें अंतर्वेदींत आपली छावणी केली. काशी व प्रयाग हीं दोन्हीं क्षेत्रें आपल्या ताब्यांत घ्यावीं, असें मल्हारजीच्या मनांत होतें. काशी विश्वेश्वराच्या ज्ञानवापीजवळील मशीद पाडून त्या ठिकाणीं देवालय उभें करावें; असेंही मल्हारजीला वाटलें होतें. पण तेथल्या ब्राह्मणांना ही गोष्ट पसंत नव्हती. ‘ब्राह्मण चिंता करतात कीं, हे मशीद प्रसिद्ध आहे. पातशहाचा हुकूम नसतां पाटील देऊळ करील म्हणजे ब्राह्मणास मरण येईल. जीवच घेईल. या प्रांतीं यवन विशेष प्रबळ आहेत. मशीद पाडूं लागतील तेव्हां सर्व ब्राह्मण मिळून श्रीमंतास विनंतिपत्र पाठवितील ऐसा विचार जाला आहे.’ या बाबतींत पेशव्याला आलेल्या वरील पत्रावरून ब्राह्मणांची स्वधर्मासंबंधाची कल्पना काय होती, यापेक्षां मराठे सरदारांच्या कुवतीसंबंधानें त्यांचा अविश्वास किती होता, हेंच व्यक्त होतें. मल्हारबा मशीद पाडतील. देऊळ बांधतील व निघून जातील व आपली पुन्हां यवनांशीं गांठ पडेल, अशीच ब्राह्मणांची भावना. मल्हारबा मशीद पाडून देऊळ बांधतील तर तें पूर्ण सुरक्षित राहण्याचीही खास तजवीज करतील असें त्यांना वाटलें नाहीं. मराठ्यांच्या मुलूखगिरीच्या पद्धतीची सर्वसाधारणपणें अशीच रीत होती. यामुळें मराठ्यांच्या

प्रबळ सत्तेला कोठेंच स्थिरता आली नाहीं व मध्यवर्ति सत्ता पोकळ झाल्यावरोबर ही ठिकठिकाणची सर्व सत्ताही पत्त्याच्या बंगल्याप्रमाणे कोसळून पडली. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, मल्हारबानें आपल्याला या स्वारींत यश आल्याबरोबर पठाण व वजीर यांच्याशीं संगनमत केलें. तसेंच सुरजमल जाट यालाही आपलासा करून आपला एक स्वतंत्र गटच निर्माण केला. इकडे बादशाहाशीं त्याच्या मुलुखाचें व सत्तेचें रक्षण करण्यासंबंधानें करार करावयाचा व त्याचबरोबर ज्यांच्यापासून त्याचें रक्षण करावयाचें त्या पठाण, जाट, रजपुतांशींही अंतस्थ करार करावयाचे. मल्हारबाचें हें दुटप्पी वर्तन दिल्लींतील पेशव्याच्या वकीलांना आवडत नव्हतें. पण मल्हारबाला हें धोरण सोडण्यास भाग पाडण्याचें सामर्थ्य कोणांतच नव्हतें. खुद्द पेशवाही असें कट्टर धोरण स्वीकारण्यास तयार नव्हता. पेशव्याचा वकील बापूजी महादेव हिंगणे यानें होळकराचे लष्करांत असलेला आपला भाऊ दामोदर महादेव यास दिल्लीकडील कारस्थानासंबंधानें व विशेषतः मल्हारबाच्या दुटप्पी धोरणासंबंधानें माहिती देणारें पत्र पाठविलें त्यांतील पुढील मारांशावरून मराठ्यांची सत्ता या भागांत किती पोखरलेली होती व मराठे सरदार कशीं अंतर्गत कारस्थानें करीत होते, तसेंच या प्रांतांत ते किती आप्रिय झाले होते, याची पूर्ण कल्पना आल्याशिवाय राहात नाहीं:—

'पठाण व मल्हारबा व सुरजमलजी व वजीर अवघे एकवट झाले तरी पठाण झुंज घेतल्याखेरीज राहात नाहीं. हे चांडाळचौकडी मल्हारबास मारल्याखेरीज राहत नाहीं. आधीं तर रजपूत पाठीस लागले आहेत. जे दक्षिणी होय ऐसा पाहिल्यास मारूनच टाकतात; बोलावून मारतात, कौल देऊन मारतात, मेजवानीस बोलावून मारतात. या प्रकारचा त्यांचा विचार. तिकडून पठाण प्राणच घेतील किंवा देतील...श्रीमंत स्वामीशीं अटकेपासून तो श्वेतबंध रामेश्वरपर्यंत ज्यांनीं शत्रुत्व केलें त्या सर्वांस अद्यापपर्यंत तरी मित्रत्व तरी ठेवलें आहे...पेशव्यांचे खात्रीस्तव हिंदुस्थानचें राज्य बादशहानें माधोसिंगास दिलें. कछवाहाचें घर पेशव्यांचे वडिलांही हिंदुस्थान संपादन दिघलें. त्या पेशव्याशीं बिघडून रजपुतांही दक्षिणी मात्राशीं दुष्मन केलें. रजपुतांही मराठ्यांशीं चहूंकडे मारलें...इकडे तर रांडा देखील मराठ्यांवर शेर जाहल्या आहेत. दिल्लीस काय फजिती

लिहितां पुरवत नाहीं. अहोरात्र हे चिंता लागली जे मल्हारबा फसल्यावरी काय करावे ? त्यास वाटते आमचे मनसबे शेवटास जाऊं नयेत...जर श्रीमंत स्वामीस हिंदुस्थान राखणें आहे तर नर्मदेजवळी यावें. आजी पांच हजार स्वार दिल्लींत आला तर श्रीमंत स्वामींची रक्षण आहे. येविशी श्रीमंत स्वामीस लिहून पाठवा." *

मराठयांच्या मदतीनें वजीर सफदरजंगानें रोहिल्यांची खोड मोडली व बादशाहीचें रक्षण केलें. अर्थात् वजीराचें वजन दिल्ली दरबारांत वाढलें. बादशहास तें मुळींच सहन झालें नाहीं. त्यानें वजीराचें वाढतें प्रस्थ कमी करण्याकरतां कारस्थानें चालविलीं. वजीराला या गोष्टीचा मागमूस लागतांच बादशहास पदच्युत करून त्याचे जागीं एकाद्या दुसऱ्याच मोगल घराण्यांतल्या पुरुषाला गादीवर बसविण्याचें वजीरानें कारस्थान चालविलें. गंमत अशी कीं, आपापले हेतू साध्य करण्याकरतां दोन्हीही पक्ष मराठयांची मदत मागूं लागले. याप्रमाणें वजीर बादशाहाचें वांकडें येऊन मराठे सरदारांस ते आपापल्या पक्षांत ओढीत होते. फरूखाबादच्या लढाईनंतर १७५१ सालीं शिंदे–होळकर दक्षिणेकडे गेले होते. ते परत आले नव्हते व त्यांच्यांतही उत्तरेंतील मल्हारबाच्या कारस्थानांमुळें वैमनस्य वाढत चाललें होतें. खुद्द पेशव्याचे दिल्लींतील सरदार अंताजी माणकेश्वर व बापूजी हिंगणे परस्परांत भांडत होते. बादशहाला मदत करावी कीं, वजीराला मदत करावी या बाबतींत ते पक्का निश्चय करूं शकत नव्हते. आणि दुसरीकडे रोहिले व अबदाली तर मराठयांचा सूड घेण्यास टपलेले होतेच.

दिल्लीकडील कारभार अशा रीतीनें सर्वच बाजूंनीं बिघडून गेला होता. १७४८ त हिंदुस्थानावर अबदालीनें स्वारी केल्यानंतर १७५० त दिल्लीच्या बादशहाशीं करार केल्यापासून व त्यापूर्वींही कांहीं वर्षें मराठे सरदारांनीं उत्तरेंतील मुलखांत जीं कारस्थानें लढविलीं व पैशाच्या लोभानें मराठी राज्याची इभ्रत घालवून आपल्यांतील जी फाटाफूट जगाच्या निदर्शनास आणून दिली त्यामुळें मराठी सत्तेला व तिच्या इभ्रतीला धक्के बसत चालले होते, ते सावरून धरण्याकरतां नानासाहेब पेशव्याचे दिल्ली राजधानींतील वकील व उत्तरेंतील इतर ठिकाणचे जबाबदार

* म. रि. म. वि. ३ पा. १७ (राजवाडे खंड ६, ५५६.)

चिटणीस व कारभारी पुण्याहून कोणीतरी खाश्याला उत्तरेकडे पाठवून द्यावें, अशी सारखी मागणी करीत होते. अशा भानगडीच्या परिस्थितींत खुद्द पेशव्यानेंच उत्तरेकडे जाऊन सर्वत्र जम बसवून उत्तरेकडील संपादन केलेली मराठी सत्ता दृढ करण्याकरतां कांहीं तरी संघटित कायमची व्यवस्था करावयास पाहिजे होती. पण दिवसेंदिवस पत्रव्यवहारानें कारभार चालविण्याची महत्त्वाकांक्षा पुरी करण्याकरितांच जणूं काय उत्तरेकडे तो स्वतः गेला नाहीं व दुसऱ्या कोणालाही त्यानें पाठविलें नाहीं. शिंदे–होळकर दक्षिणेकडे येऊन राहिले तेवढ्या अवधींत मराठ्यांच्या विरोधी असलेल्या सर्व शक्तींनीं अर्थातच डोकें वर काढलें. अंताजी माणकेश्वर व बापूजी हिंगणे यांच्यासारख्या दुय्यम दर्जाच्या सरदारांकडून मराठी सत्तेचें हें फुटून चाललेलें धरण आवरणें शक्य नाहीं, हें पाहून नानासाहेबानें अखेर आपला धाकटा भाऊ रघुनाथराव याला उत्तरेकडे पाठविण्याचें ठरविलें, शिंदे-होळकर या दोघांच्या सल्ल्यानें पेशव्यानें रघुनाथरावाची निवड केली असेल तर तें अगदीं साहजिक होतें. शिंदे-होळकरासारख्या सरदारांना यापेक्षां जास्त कर्तबगार व हुशार खासा हिंदुस्थानांत नकोच होता. रघुनाथराव शूर होता यांत शंकाच नाहीं. पण राजघराण्यांतील पुरुष केवळ शूर असून भागत नाहीं. त्याच्या जोडीला 'राज्यकारभाराचें अंगही त्याला असावें लागतें. या कारभाराला लागणारी हुशारी व कर्तृत्वशक्ति रघुनाथरावाच्या अंगीं मुळींच नव्हती. रघुनाथराव या वेळीं वीस एकवीस वर्षांचा झाला होता. तरी आतांपर्यंत राज्यकारभाराला लागणारी कोणतीच हुषारी त्यानें अद्याप दाखविलेली नव्हती. सर्व गोष्टींचा साकल्यानें विचार केला असतां सदाशिवराव भाऊ हा एकच असा समर्थ पुरुष पेशव्याच्या दरबारीं यावेळीं होता कीं, जो या सर्व भानगडी अक्कलहुंशारीनें व प्रसंगीं विरोधकांशीं दोन हात करून यशस्वीपणें मिटवूं शकेल. पण नानासाहेबानें ही निवड केली नाहीं. सदाशिवराव भाऊ जसा शूर होता त्याचप्रमाणें राज्यकारभाराच्या सर्व बाबतींत प्रवीण होता. नानासाहेबांच्या राजवटींत त्याला जी कांहीं संधि मिळाली त्या वेळीं त्याची कर्तबगारी व राज्यकारभारांतील हुशारी दरबारी मंडळींच्या प्रत्ययास आली होती. मत्सरामुळें, असूयेमुळें नानासाहेबानें भाऊला यावेळीं मागें टाकलें कां ? मागच्या अनुभवांवरून नानासाहेबानें असूयेनें प्रेरित होऊनच भाऊसाहेबाला मागे

टाकलें असलें पाहिजे. सांगोल्याचा करार, कोल्हापुरची पेशवाई, दमाजी गायकवाडाचें प्रकरण, कर्नाटकच्या स्वारींतिल त्याची कर्तबगारी हीं सर्व पाहून सुद्धां नानासाहेबाला आपल्याजवळच पुण्यास भाऊला डांबून ठेवणें योग्य वाटलें. भाऊला कोल्हापुरची पेशवाई मिळते हें पाहिल्यावर नानासाहेबाची तिरपीट उडाली. त्यानें घाईघाईनें भाऊला आपल्याच कारभारांत घेतलें व त्याच्या स्वतंत्र बुद्धीला वाव दिला नाहीं. बाजीरावाच्या कारकीर्दींत चिमाजी अप्पाच्या कर्तृत्वाला व हुशारीला जो अनिर्बंध वाव मिळाला तशीच अप्रतिहत संधि भाऊला पेशव्याच्या सर्व कारभारांत मिळत गेली असती तर उत्तरेंतील राजकारण इतकें बेताल कधींच झालें नसतें. बाजीराव जात्याच शूर, धाडसी व मुलुखगिरीची अव्याहत हौस असलेला पुरुष होता. प्रत्यक्ष राज्यकारभाराकडे लक्ष देण्यास त्यास सवड झाली नाहीं व तो चालविण्याकडे त्याच्या मनाचा कलही नव्हता, तेव्हां त्यानें आपल्या भावाला सर्व प्रकारें राज्यकारभारांतली मुखत्यारी देऊन टाकली होती. नानासाहेब पेशवा झाल्यावर पहिलीं पांच सात वर्षे त्यानें जी कांहीं हालचाल केली तेवढीच. पण त्यानंतर तोही शाहूप्रमाणें सुखासीन बनत चालला व पत्रव्यवहाराच्या जोरावर सर्व सरदारांकडून पुण्यास बसून कारभार चालवूं लागला. अशा परिस्थितींतही भाऊला त्यानें पुण्याच्या कारभारांतून मोकळा करून अव्याहतपणें सर्व हिंदुस्थानभर मुलुखगिरीवर पाठविण्यास कांहींच हरकत नव्हती. पण बाजीरावाचा चिमाजी अप्पावर जो विश्वास होता तसा विश्वास नानासाहेबाला भाऊबद्दल वाटेनासा झाला होता. स्वतः अर्धांगवायूनें सर्वतोपरी दुबळ्या झालेल्या महंमदशहानें आपला शहाजादा स्वतंत्र व वरचढ होईल या असूयेनें अबदालीच्या स्वारीस तोंड देण्यास पाठविलें नाहीं. शहाजादा अहमदशहानें बापाच्या या असूयेला दाद दिली नाहीं ही गोष्ट निराळी. तशीच असूया नानासाहेबाला भाऊबद्दल वाटली असली पाहिजे. नानासाहेबाची बायको गोपिकाबाई इच्या सल्ल्यानेंही या असूयेंत भर पडली असेल. कांहीं असो. रघुनाथरावाच्या ऐवजीं याच वेळीं म्हणजे १७५१ त भाऊला उत्तरेकडे पाठविलें असतें तर मराठी साम्राज्यावर पुढें कोसळलेले सर्व अनर्थ टळले असते. उत्तरेकडील पेशव्यांच्या वकीलांनीं व जबाबदार लोकांनीं सदाशिवरावभाऊंना हिंदुस्थानांत पाठविण्याबद्दल वारंवार लिहिलेंलेंही

होतें. रघुनाथरावास या स्वारीवर पाठविले ही गोष्ट कलह वाढविण्यास कारणीभूत झाली, ' पुढें विनाशकाले येणार भविष्य आलें ' असें भाऊसाहेबाची बखर लिहिणारानें जें म्हटलें आहे तें अगदीं सार्थ आहे.

बरें, रघुनाथरावाला पेशव्यानें उत्तरेंत पाठविलें त्यांत तरी त्याच्या मनाचें समाधान होतें का ? तेंही नाहीं. हा आपला सख्खा भाऊ असला तरी उत्तरे-कडे जाऊन तो स्वतंत्र व वरचढ होणार नाहीं कशावरून, अशीही त्याला भीति वाटत होती. राज्यसत्तेची व अधिकाराची लालसा अशी दुष्ट व भयं-कर असते. अशा परिस्थितींत खुद्द स्वतःच बाहेर पडावें तर तिकडूनही अडचण ! कारण पेशव्याचा सर्व कारभार भाऊवर सोंपवून कसें बाहेर पडणार ?

शेवटीं कांहींतरी निर्णय करावयास पाहिजेच होता. भाऊपेक्षां रघुनाथ-रावच बरा असें नानासाहेबानें या वेळीं ठरविलें. त्याप्रमाणें १७५३ च्या आगष्टच्या अखेरीस रघुनाथराव शुभ मुहूर्तावर पुण्याबाहेर पडले. चिंतो विठ्ठल रायरीकर, सखाराम बापू व महिपतराव चिटणीस ही मंडळी त्याच्या बरोबर देण्यांत आली. रघुनाथरावाची फौज खानदेशांतून पुढें गेल्यावर दत्ताजी शिंदे व मल्हाररावाचा मुलगा खंडेराव होळकर आपल्या सैन्य - निशीं त्याला येऊन मिळाले. उत्तरेंत गेल्यावर चौथाई सरदेशमुखी वसूल करण्याचें काम त्यानें प्रथम हातीं घेतलें व अजमीरापर्यंत जाऊन रजपुतांच्या मुलुखांत लुटालूट केली. मराठे हिंदुस्थानच्या मुलखांत आले म्हणजे त्या भागांतील खंडण्या वसूल करतात, हें तिकडील सर्व लहानमोठ्या राजे-रजवाडयांना माहीत झालें होतें. बादशाहाकडून सनद मिळाली असली तरी चौथाई सरदेशमुखीच्या आपापल्या खंडण्या सुरळितपणें मराठ्यांना कधींच मिळत नसत. मराठ्यांना दरसाल या मुलुखावर स्वाऱ्या करून फौजेच्या बळावर त्या वसूल कराव्या लागत. मराठी राज्यकारभाराचा हा एक मोठाच दोष होता. सनदेंत नमूद केलेल्या प्रांतांतून प्रत्यक्ष स्वारीचा प्रसंग न आणतां त्या त्या भागांतील खंडणी बिनबोभाटपणें कायमची वसूल कर-ण्याची व्यवस्था पेशव्याला करतां आली नाहीं. ठिकठिकाणीं कमाविस-दारांची नेमणूक करून व योग्य तें खडें सैन्य त्याच्या पाठीशीं ठेवून ही व्यवस्था पेशव्याला करतां आली असती. भाऊनें अशी व्यवस्था करण्याच्या कामाला नेटानें हात घातला होता. पण नानासाहेबानें या कामांत लक्ष

दिलें नाहीं व शिंदे–होळकरांना तर ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं. यामुळें आपले संपादन केलेले प्रवेश सुरक्षित राखण्याकरतां दरसाल या वसुलीच्या निमित्तानें लुटालुटीला सुरुवात व्हावयाची व खंडणी वसूलीशिवाय बाकीच्या मिळकतीवर सरदारांनीं ताव मारावयाचा, असा जणूं सर्वमान्य प्रघातच मराठेशाहींत पडला होता. हीं कामें शिंदे, होळकर, बुंदेले, पवार वगैरे सरदार आपापल्या परीनें करीत होते. पण १७५३ च्या सुमारास या खंडणी वसुलीशिवाय आणखी अनेक भानगडी उपस्थित झाल्यामुळें रघुनाथरावाची खासा स्वारी हिंदुस्थानांत चढाई करून आली होती.

मराठ्यांच्या स्वारीचा प्रत्यक्ष शद्ब लागल्याबरोबर रजपुतांनीं आपापल्या वाटणीची खंडणी रघुनाथरावाला देऊन टाकली. पण भरतपूरच्या सुरजमल जाटानें ही खंडणी देण्याचें नाकारल्यामुळें रघुनाथरावानें तिकडेच आपल्या फौजेचा मोर्चा वळविला. सुरजमल जाटानें खंडणी वेळेवर दिली नाहीं, हें भरतपुरच्या स्वारीच्या बाबतींतील एक निमित्त कारण होतें. सुरजमल दिवसेंदिवस प्रबल होत चालला होता. शिंदे–होळकरांनीं प्रथम ईश्वरसिंगाला गादीवर बसविण्याचे कामीं मदत केली होती. पण पैशाच्या लोभानें ईश्वरसिंगाचा पक्ष सोडला व त्याचा प्रतिस्पर्धी माधवसिंग याचा पक्ष धरून त्याला त्यांनीं जयपुरची गादी मिळवून दिली. पण सुरजमल्लानें मात्र ईश्वरसिंगाचा पक्ष सोडला नव्हता. याशिवाय १७५३ च्या मे महिन्यांत बादशहाचें व वजीर सफदरजंगाचें जें युद्ध झुंपलें त्यांत सुरजमल वजीराच्या बाजूनें लढला व दिल्लीस वेढा घालून त्यानें बादशहाची त्रेधा तिरपीट उडवून दिली. वजीराचा पक्ष अशा रीतीनें प्रबल होत चाललेला पाहून पेशव्यांच्या दिल्लीकडील दोन सरदारांपैकीं अंताजी माणकेश्वर, पेशव्यानें बादशहाशीं केलेल्या कराराविरुद्ध जाऊन सुरजमलाशीं संगनमत करावयास तयार झाला होता. पण बापूजी हिंगणे यानें त्याला आवरून धरलें व पेशव्याच्या इभ्रतीला डाग लागूं दिला नाहीं. सुरजमल्लाचें साहाय्य घेऊन दिल्लीचीं बादशाही सूत्रें आपल्या हातीं येत नाहींत. बादशहाशीं सहा महिने लढूनही आपला कांहींच फायदा झाला नाहीं, असें पाहून वजीर सफदरजंगानें दिल्लीस रामराम ठोकला व आपल्या लखनौच्या सुभ्यास जाऊन स्वतंत्रपणें तेथें त्यानें आपला अंमल

बसविला. दिल्लीच्या भानगडींत न पडतां लखनौचें आपलें स्वतंत्र राज्य समजून त्याप्रमाणें तो वागूं लागला.

बादशहाविरुद्ध बंड करून उठलेला सफदरजंग अनायासें बाजूला झाला खरा. पण त्याला मदत करणारा सुरजमल मराठ्यांशीं गोडीगुलाबीनें वागण्यास तयार झाला नाहीं.

भरतपूरचे हे जाट शहाजहान बादशहाच्या वेळेपासूनच प्रबळ झाले होते. शहाजहान व औरंगजेब यांच्या कारकीर्दींत त्यांना आपली सत्ता वाढविण्यास वाव मिळाला नव्हता. पण औरंगजेबाच्या मरणानंतर इतर लहान मोठया सरदारांप्रमाणें व स्वतंत्र संस्थानिकांप्रमाणें जाठाच्या राजघराण्याचा आद्य पुरुष चूडामणी यानें बादशहाविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें. बहादुरशहा त्या वेळीं दिल्लीच्या गादीवर बादशहा तख्तनशील होता. बादशहाच्या हुकुमावरूनच सवाई जयसिंगानें त्याच्यावर चाल केली. चूडामणीनें त्याला मुळींच दाद दिली नाहीं. थूनच्या किल्ल्यावर तो दबा धरून राहिला. जयसिंगानें थूनला वेढा घातला. पण वीस महिनेपर्यंत त्याचा कांहीं इलाज चालला नाहीं. १७२३ त चूडामणी मरण पावला. त्याच्या मरणानंतर त्याचा मुलगा हुकुमासिंग गादीवर बसला. बदनसिंग नांवाच्या त्याच घराण्यांतील एका पुरुषानें जयसिंगाशीं संगनमत करून व त्याला खंडणी देऊन दीग येथें त्यानें स्वतंत्र गादी स्थापली. दीग व कुंभेरी येथें त्यानें मजबूत तटबंदी केली. बदनसिंग १७५५ त मरण पावला. बदनसिंगाला सव्वीस मुलगे होते. सुरजमल हा त्याचा पांचवा मुलगा. बापाचा सर्व कारभार तो चोख रीतीनें व अक्कल हुशारीनें पाहात असे. संतति व संपत्ति एके ठिकाणीं नांदत नसतात. बदनसिंग त्या गोष्टीला अपवाद होता. औरस मुलगा होण्याकरतां बायकामागून बायका करावयाच्या अन् शेवटीं औरस संतति नसल्यामुळें गादीबद्दल भाऊबंदांत रक्तपाताचे झगडे सुरू व्हावयाचे. पण बदनसिंगाच्या बाबतींत या सर्वमान्य सरंजामी नियमाला हरताळ फासला गेला इतकेंच नव्हे तर त्याच्या सव्वीस पुत्रांनीं गादीबद्दल आपसांत तंटा न वाढवितां आपल्यांतील हुशार भाऊ सुरजमल यास अनियंत्रितपणें राज्यकारभार करूं दिला. बदनसिंगानंतर सुरजमल गादीवर बसला. दिल्लीदरबारच्या सर्व अंतर्गत भानगडी त्याला पूर्णपणें

अवगत होत्या. जयपूरच्या गादीसंबंधानें झगडा सुरू झाला त्यावेळीं सुरजमलानें ईश्वरसिंगाचा पक्ष धरला. पेशव्यांनीं प्रथम ईश्वरसिंगाचाच पक्ष धरला होता. पण पैशाच्या लोभानें करारभंग करून त्यांनीं ईश्वर-सिंगाचा प्रतिस्पर्धी माधवसिंग याचा पक्ष धरला. मराठयांनीं सुरजमल जाटाच्या मुलखावर स्वारी केली. त्याला ही गोष्टसुद्धां कारणीभूत झाली होती.

वजीर सफदरजंग यानें बादशाहाशीं लढण्याचें सोडून देऊन लखनौ येथें स्वतंत्र संस्थान स्थापन केलें व तिकडेच तो राहूं लागला. दिल्ली दर-बारला त्रास देणाऱ्या लोकांपैकीं सुरजमल जाट तेवढाच शिल्लक राहिला. दिल्ली दरबारास निर्वेध बनवायचें असल्यास त्याचा कांटा काढणें जरूरच होतें. सुरजमल खंडणी देत नाहीं, ही तर उघड उघड सबब त्याच्यावर स्वारी करून जाण्याकरता पुरेशी होती. शिवाय तो बादशाही मुलखाला त्रासही देत होता. मराठे आपल्यावर चालून आले, हें पाहून त्यानें कुंभे-रीच्या किल्ल्याचा आश्रय घेतला. रघुनाथरावानें अर्थात् कुंभेरीवर चालून जाऊन तिला चोहोंकडून वेढा घातला व जोराचें युद्ध सुरू केलें. कुंभेरीचा किल्ला अत्यंत मजबूत. त्याच्या चोहों बाजूंस रेतीचें मैदान असल्यामुळें सुरुंग लावून किल्ला उडवून देणें अशक्य होतें. किल्ल्याच्या पायथ्याशीं जोराचें रणकंदन चालू होतें. सुमारें दीड महिनाभर जोराचें रणकंदन करूनही किल्ला आपल्या हातीं येत नाहीं, असें पाहून मल्हारबाचा मुलगा खंडेराव होळकर जातीनिशीं मोठया त्वेषानें आपल्या बरोबरीच्या तुकडीसह मोर्चाच्या निशाणापाशीं येऊन दाखल झाला व शत्रूवर त्यानें जोराचा हल्ला चढविला तों एकाएकीं जेजालेची गोळी लागून ठार झाला. आपला एकुलता एक तरुण मुलगा अशा रीतीनें लढाईत कामास आलेला पाहून मल्हारबाचें देहभान सुटलें. 'सुरजमल्लाचा शिरच्छेद करीन व कुंभे-रीची माती यमुनेंत नेऊन टाकीन तरच जन्मास आल्याचें सार्थक' अशी मल्हारबानें संतापाच्या भरांत प्रतिज्ञा केली. सुरजमल्लाला ही हकीकत सम-जली. तेव्हां त्याच्या तोंडचें पाणी पळालें. वेढा चालूच होता. तीन महिने होऊन गेले. मराठे जागचे हालत नाहींत. अशा वेळीं कोणतें धोरण स्वीकारावयाचें याबद्दल त्यानें आपली ज्येष्ठ स्त्री अनसूया हिचें मत विचारलें. या कारस्थानी स्त्रीनें अगदीं अचूक उपाय सुचविला. मल्हारबा

व जयाप्पा यांच्यांतील वैमनस्य वाढत चाललें आहे तेव्हां मल्हारबाला शह द्यावयाचा असल्यास जयाप्पाला आपलासा करून घेणें हाच एक या वेळीं उपाय आहे असें तिनें सांगितलें.

सुरजमलचें व बादशहाचें मुळींच सख्य नव्हतें. बादशाही मुलखांत त्यानें लुटालूटही केली होती. पण मराठयांच्या चढाईनें सुरजमल नामोहरम झाल्यास वजीर मीर शहाबुद्दीन याचें प्रस्थ वाढतें, हें पाहून खुद्द बादशाहा आपल्या फौजेनिशी जाटाला मदत करण्याकरतां निघाला. बादशाहीच्या संरक्षणाकरतांच तर मराठयांनीं सुरजमलावर हत्यार धरलें होतें. पण अंतस्थ वैमनस्याचें शमन करण्याकरतां बादशहाच मराठयावर चालून आला ही एक विचित्रच गोष्ट होती. पण या वेळीं शिंदे–होळकरांनीं बादशहाची गय केली नाहीं. त्याच्या फौजेवर मल्हारबानें छापा घालून तिचा फडशा उडविला. या हल्लयांत मराठे सैनिकांनीं स्त्रियांची अब्रू घेतली, ही गोष्ट जयाप्पाला आवडली नाहीं व त्यानें या वेळीं झालेल्या लुटालुटींत भागही घेतला नाहीं. मराठे सरदार आपल्या फौजेनिशीं हिंदुस्थानांत सर्वत्र मुलूखगिरी करीत संचार करीत होते व प्रसंगीं ते लुटालूटही करीत होते. पण स्त्रीजातीच्या बाबतींत त्यांचें वर्तन शुद्ध होतें, अशीच त्यांची ख्याति होती. परंतु मराठयांच्या नांवाला काळिमा आणणारी अशी गोष्ट मल्हारबानें होऊं दिली, ही गोष्ट जयाप्पाला आवडली नाहीं व मल्हारबा–जयाप्पा यांच्यांतील तेढ वाढण्यास या गोष्टीची भरच पडली. आपल्या पतीचें रक्षण करावयाचें असल्यास शिंदे–होळकरांमधील वाढत चाललेल्या वैमनस्याचा फायदा घेतां येईल, हें जाणूनच सुरजमलच्या पट्टराणीनें जयाप्पाशीं बोलणें करण्याचा योग्य सल्ला नवऱ्याला दिला होता. रुपराम वकील या मसलतींत होताच. त्यानें आपला मुलगा तेजराम यास जयापाकडे पाठवून कसेंही करून सुरजमलचें रक्षण करण्याबद्दल त्याला गळ घातली. कुंभेरीच्या वेढ्यांत मल्हारबाचा एकुलता एक मुलगा खंडेराव कामास आला व मल्हारबानें सुरजमलचा पुरता सूड उगविण्याचें ठरविलें हें माहित असतां जयाप्पानें त्याच्या उलट सुरजमलचें रक्षण करण्याचें अभिवचन त्याच्या वकीलास दिलें! एकाच रणांगणावर दोन प्रख्यात मराठे सरदार असे एकमेकांविरुद्ध वागून परस्परांना हाणून पाडतात, ही खरोखरी शोचनीय

गोष्ट होती. जयाप्पाच्या या कृतीमुळें मल्हारबाला साहजिकच अतिशय वैषम्य वाटलें.

पण या सर्व प्रसंगीं रघुनाथराव काय करीत होता? मल्हारबानें सुरज-मलचा शिरच्छेद करण्याची प्रतिज्ञा करावी व जयाप्पानें त्याच्या रक्षणाची हमी घ्यावी. या आपल्या दोघां सरदारांतील परस्पर तेढीच्या वर्तनाला आळा घालण्याचें सामर्थ्य रघुनाथरावांत नव्हतें. त्यानें आपल्या बरोबर असलेले सखारामपंत बोकील यांना या बाबतींत सल्ला विचारला. बोकिलानें जयाप्पाच्या धोरणाला अनुकूल होईल असाच सल्ला दिला. जाटापासून खंडणी घेऊन आजचा हा झगडा मिटवावा. एकेच ठिकाणीं मराठयांचें सर्व सैन्य कुचंबत ठेवूं नये असा त्यानें या बाबतींतील तडजोडीचा मार्ग सुचविला. रघुनाथरावानें तो मान्य केला व जयापाच्या मार्फत साठ लक्ष रुपये खंडणी भरून जाटानें पेशव्यांशीं तह केला. या तहांत जाटापासून कांहीं लाखांची खंडणी मिळाली खरी. पण शिंदे–होळकरांत या तहानें कायमचें वैमनस्य पडल्यामुळें एका दृष्टीनें हा तह पेशव्यास अत्यंत महागच पडला.

नानासाहेबानें रघुनाथरावास पुढील दोन कामांकरितां हिंदुस्थानांत पाठ-विलें होतें. पहिलें काम काशी, प्रयाग वगैरे तीर्थस्थानें मुसलमानांपासून सोडवावीं व दुसरें काम अंतर्वेदींतील रोहिल्यांपासून जिंकलेल्या प्रदेशांत आपला अंमल बसवावा. पण हीं दोन्हीं कामें रघुनाथरावास करतां आलीं नाहींत. कुंभेरीच्या वेढयाची भानगड मिटली, तह झाला. मराठी फौजा चार महिने एकाच ठिकाणीं कुचंबून पडल्या होत्या त्या आतां मोकळ्या झाल्या. तेव्हां पूर्वीं नियोजलेलीं कामें रघुनाथरावानें हातीं घ्यावयास पाहिजे होतीं. पण त्याला तें साधलें नाहीं. कुंभेरीच्या पायथ्याशीं तहाचीं बोलणीं सुरू अस-तांनाच इकडे मारवाडच्या गादीसंबंधीं सुरू झालेल्या तंटयाकडे मराठयांना लक्ष द्यावें लागलें.

नागोरचा राजा अभयसिंग मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा रामसिंग गादीवर बसला. पण अभयसिंगचा भाऊ बख्तसिंग यानें रामसिंगास गादी-वरून पदच्युत करून सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. तेव्हां रामसिंगानें आपल्याला गादी मिळवून देण्याबद्दल जयाप्पाची मदत मागितली. रामसिंग जयपुरच्या ईश्वरसिंगाचा जांवई. बख्तसिंगाचा एक भाऊ ईडर

येथें होता. त्याची मुलगी ईश्वरसिंगास दिली होती. १७५३ त रामसिंग व बख्तसिंग अजमीर येथें असतांना ईश्वरसिंगाच्या बायकोनें चुलता बख्तसिंग यास भेटीस बोलावून त्याला विषप्रयोग करून ठार मारलें. बख्तसिंग ठार झाल्यावर साहाजिकच आपल्याला गादी मिळेल, अशी रामसिंगला आशा होती. किंबहुना याकरतांच त्याच्या सासूनें बख्तसिंगाला ठार मारून त्याच्या मार्गांतला अडथळा दूर केला होता, पण या संधीचा फायदा घेण्याइतकी ताकद रामसिंगाच्या अंगीं नव्हती. बख्तसिंगाचा मुलगा विजयसिंग यानें रामसिंगाचा गादीवरचा हक्क धुडकावून लावून नागोर, बिकानेर, मेडते वगैरे भारी संस्थानें त्यानें आपल्या ताब्यांत घेतलीं. रामसिंगाकडे फक्त अजमीर राहिलें. तेव्हां आपली हक्काची गादी पुन्हा आपल्याला मिळवून देण्याबद्दल रामसिंगानें जयापाची मदत मागितली. सर्वांनीं एकाच जागेंत राहण्यांत फायदा नाहीं. सर्वांची फौज एकत्र आल्यानें खर्चही भरमसाट वाढतो आपण मारवाडास जातों असें रघुनाथरावास सांगून जयाप्पा तिकडे निघून गेला.

शिंदे, होळकर व रघुनाथराव एकत्र राहून पेशव्यानें आपल्यावर सोपविलेलीं कामें केव्हांच पार पाडूं शकले असते. त्याऐवजीं शिंदे–होळकरांत वैरभाव वाढत चाललें व शिंदे तर रघुनाथरावास सोडून मारवाडाकडे निघून गेले. अशा परिस्थितींत रघुनाथरावाला हीं कामें पूर्णपणें करतां आलीं नाहींत. अंतर्वेदीच्या बंदोबस्ताचें काम गोपाळराव व कृष्णराव गणेश बर्वे या दोघां भावांकडे होतें. पण या भागांत सफदरजंगानें मराठ्यांचा कधींच जम बसूं दिला नाहीं. बादशहाशीं झगडण्यांत मराठ्यांनीं आपल्याला भरपूर मदत दिली नाहीं, अशी त्याची तक्रार होती. त्याचप्रमाणें आपली वजीरी जाण्यास मराठेच कारणीभूत झाले अशीही त्याची समजूत होऊन चुकली होती. रघुनाथरावाच्या स्वारींत असतां क्षेत्रें सोडविण्याचें काम जयापानें आपल्या अंगावर घेतलें होतें. तेव्हां साहजिकच बर्वे बंधूंनीं या कामीं जयापाची मदत मागितली. जयापानें ही जबाबदारी अंगाबाहेर टाकली नाहीं. पण मारवाडांतलें काम आधीं तडीस लावून लवकरच अंतर्वेदींत येतों व तिकडील मुसलमानांचा बंदोबस्त करतों, असें जयापानें त्यांना लिहून कळविलें.

बादशाहीच्या संरक्षणाकरतां खुद्द मीर शहाबुद्दिनाच्या आमंत्रणावरून रघुनाथरावाच्या सेनापतित्वाखालीं मराठी फौजा हिंदुस्थानांत दाखल झाल्या व त्यांनीं पहिल्या झटक्यासरशी सुरजमल जाटाचा बंदोबस्त केला. बादशाहीचें व त्याच्या मुलखाचें रक्षण करण्याचें काम मराठ्यांनीं आपल्या अंगावर घेतलेंच होतें तेव्हां करारापमाणें पेशव्यांपैकीं एक खासा आपल्या फौजेसह दिल्लीकडे येऊं लागला पण हें पाहून बादशहाला बरें वाटण्याऐवजीं त्याला मराठ्यांची भीति वाटू लागली. मीर शहाबुद्दीन मराठयांच्या मदतीनें बादशाही बुडविणार, अशी दरबारी लोकांची भावना झाली व जयपूर-जोधपूरचे रजपूत व जाटही या बादशाही पक्षांत सामील झाले मीर शहाबुद्दीनचा नक्षा उतरविण्याकरितां बादशहा त्याच्यावर सिकंदऱ्यापर्यंत चालून गेला. आजूबाजूचे मुसलमान सरदार बादशाही फौजेंत सामील होऊं लागले. मीर शहाबुद्दीन व मल्हारबा यांच्या जवळ ५० हजार फौज असून ते दिल्लीच्या रोखें झपाट्यानें चालून येत आहेत, अशी बातमी बादशहास पोंचतांच तो घाबरून गेला व या सैन्यावर चालून जाण्याऐवजीं घाईघाईनें दिल्लीकडे परतला. मीरनें व होळकरानें बादशहाचा पाठलाग करून ते दिल्लींत घुसले. बादशहाचा तोफखाना व इतर युद्धोपयोगी सामान मराठयांच्या हातीं लागलें. बादशाहाच्या मागें राहिलेल्या फौजेला संरक्षणाचें आश्वासन देऊन मीर शहाबुद्दिननें तिला आपल्याकडे वळविलें. बादशहाची सावत्र आई मलिका अज्जमानी व इतर राजघराण्याच्या स्त्रिया मराठयांच्या हातीं लागल्या होत्या; त्यांच्या भेटी घेऊन मीरनें त्यांचेंही सांत्वन केलें. बादशहा आपली सख्खी आई उधम इच्या तंत्रानें सर्वस्वी चालत होता. उधम अत्यंत दुर्वर्तनी होती. मलिका अज्जमानीचें व तिचें मुळींच पटत नव्हतें. तेव्हां या बाईचें दरबारांतील वर्चस्व कमी करण्याकरतां खुद्द बादशहालाच गादीवरून दूर करण्याचें मलिका अज्जमानीनें मीर शहाबुद्दिनशीं खलबत करून ठरविलें. मराठी फौजेनें बादशहाला कोंडलें हें पाहून वजीर खानखानाननें बादशहाला एकाकी सोडून तो दिल्लींतून पळून गेला. बादशाहास राज्य करण्याचें चातुर्य नाहीं. तो आपल्यावरच उलटतो व विश्वासघात करतो तर त्याला पदच्युत करून दुसरा लायक बादशाहा गादीवर बसविणें जरूर आहे, असें मीरनें दरबारी लोकांस पटविलें व

आपला बेत लगेच त्यानें अमलांतही आणला. बादशाहा व उधमबाई यांचे डोळे काढून त्यानें त्यांना कैदेंत टाकलें व बहादुरशहाच्या पहिल्या मुलाचा मुलगा अजीजुद्दिन यास गादीवर बसविलें व अलमगीर असें नांव त्यास देऊन त्याच्या नांवानें दिल्लींत द्वाही फिरविली. मीर शहाबुद्दिनास होळकराची या वेळीं अर्थातच मदत होती. या नवीन बादशाहाचें वय या वेळीं ५५ वर्षांचें होतें. एका बादशाहाला काढून त्याच्या जागीं दुसऱ्याच इसमाला बादशाही तक्तावर बसविण्याइतकें मराठयांचें सामर्थ्य वाढलेलें पाहून दिल्ली दरबारच्या मुसलमान सरदारांना वैषम्य वाटूं लागलें. होळकरानें मलिका अज्जमानीला पकडलें. त्या वेळीं तिचे सर्व जड जवाहीर होळकरानें हस्तगत केलें. शिवाय ही बादशाहीची अफरातफर करण्याच्या कामीं होळकराची मदत झाली म्हणून त्यास ४० लाख रुपयांची रक्कम देण्याचें ठरून मीर शहाबुद्दीन या रकमेबद्दल जामीन राहिला.

जाटाचा बंदोबस्त झाल्यावर रघुनाथरावानें रोहिल्यावर आपला मोर्चा फिरविला. त्यांना जेरीस आणून फौजमहमदखान रोहिल्याच्या मुलखाची वाटणी केली. दिल्लींत झालेल्या घडामोडी रघुनाथरावास समजत होत्या. मीरनें मल्हारबाच्या साह्यानें दुसराच एक बादशाहा निर्माण केला. या गोष्टीला रघुनाथावाचीही संमति होती. मल्हारबाच्या विरुद्ध वागण्याची खुद्द पेशव्याचीसुद्धां छाती नव्हती. रोहिल्यांचा बंदोबस्त झाल्यावर पावसाळयाचे दिवस आले त्यावेळीं हिंगण्यांच्या संमतीनें रघुनाथरावानें दिल्लीमध्ये आपल्या फौजेची छावणी करण्याचें ठरविलें. जून पासून डिसेंबरपावेतों मराठयांच्या फौजा दिल्लीस तळ देऊन राहिल्या होत्या. दिल्लीचें कार्य आटोपल्यावर रघुनाथरावानें पंजाबांत जाऊन तिकडील मुलुखाचा कायमचा बंदोबस्त करावा असें मीरशहाबुद्दिनचें मत होतें. पण रघुनाथरावानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. मराठे दिल्लींत तळ देऊन राहिल्यामुळें मोठा खर्च चालू राहिला, हें पाहून मीर शहाबुद्दीनच्या पोटांत दुखत होतें तें निराळेंच.

काशी व प्रयाग हीं क्षेत्रस्थानें मराठयांच्या ताब्यांत घेण्याचें शिल्लक राहिलेलें काम रघुनाथराव दिल्लींत राहूनच करीत होता. सफदरजंगाशीं या बाबतींत त्याचा पत्रव्यवहारही चालू होता. पण १७५५ च्या आक्टोबरांत सफदरजंग मरण पावला व त्याचा मुलगा सुजाउद्दौला गादीवर

बसला. त्यासही स्नेहभावाचीं पत्रें लिहून रघुनाथरावानें त्याचा गौरव केला. पण क्षेत्रस्थानांच्या बाबतींत सुजाउद्दौल्याशीं सलगीनें वागून भागत नाहीं, असें पाहून १७५५ च्या जानेवारींत हीं स्थळें हस्तगत करण्याकरतां तो स्वतः बाहेर पडला. फेब्रुवारींत गया व कुरुक्षेत्र हीं दोन्ही त्यानें पातशहापासून आपल्या सरकारांत घेतलीं. पुढें मथुरा, वृंदावन, गढ-मुक्तेश्वर, पुष्कर वगैरे क्षेत्रेंही रघुनाथरावानें आपल्या ताब्यांत घेऊन त्यावर आपला अंमल बसविला. रघुनाथराव यानंतर जूनपावेतों चार महिने या क्षेत्रांतून फिरत होता. इतक्यांत पेशव्याकडून रघुनाथरावास पुण्याकडे निघून येण्याबद्दल निकडीचें बोलावणें आलें. पुन्हा दुसरा पावसाळा दिल्लीस काढण्याचा त्याला कंटाळा आला होता. तेव्हां या बोलावण्याचें निमित्त पुढें करून व विठ्ठल शिवदेवाकडे दिल्लीकडील कारभार सोंपवून १७५५ च्या आगष्ट महिन्यांत तो पुण्यास दाखल झाला.

रघुनाथरावानें या स्वारींत जाटाचा बंदोबस्त केला. अंतर्वेदींतील रोहिल्यांचा समाचार घेतला व हिंदूंच्या तीर्थक्षेत्रांवरही मराठ्यांचा ताबा बसवला. पण हीं त्याचीं सर्व कामें केवळ तात्पुरतीं ठरलीं. कारण रघुनाथरावाची पाठ फिरतांच त्यानें बजावलेल्या या सर्व कामगिरीवर पाणी फिरलें. मुलूख हस्तगत केला तरी तो आपल्या ताब्यांत कायम राखण्याकरतां जबरदस्त लष्करी बंदोबस्त करावा लागतो. रघुनाथराव परत फिरल्यावर असा कोणीच समर्थ सरदार मागें न राहिल्यामुळें त्या त्या ठिकाणच्या लोकांनीं पुन्हा आपलीं डोकीं वर काढलीं. या मुलखाचा बंदोबस्त राखण्यास शिंदे-होळकर हेच काय ते त्यांतल्या त्यांत प्रबल सरदार होते. पण त्यांच्यांतील वैमनस्य शमण्याऐवजीं रघुनाथरावाच्या या मोहिमेंत वाढतच गेलें. यामुळें रघुनाथरावानें केलेल्या कमाईकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. मल्हारबा जसजसे वृद्ध होत चालले होते तसतसा त्यांचा स्वार्थ व लोभ वाढतच चालला होता. तेव्हां ज्या मुलुखगिरींत आपला स्वार्थ साधेल तेवढ्या गोष्टीकडे ते लक्ष देत होते. जयापानें या बाबीकडे लक्ष दिलें असतें; पण मारवाडच्या प्रकरणांत तो गुंतून पडला होता.

जोधपूरच्या गादीबाबत सुरू झालेल्या तंट्यांत जयाप्पानें रामसिंगाचा पक्ष घेतला. त्याला गादीवर बसविण्याचें आपलें वचन पुरें करण्याकरत

तो नागोरकडे १७५४ च्या मार्चमध्यें निघून गेला, हें मागें सांगितलेंच आहे. पेशव्याकडून आलेल्या पेशाच्या तगाद्यामुळेंही जयापानें ही कामगिरी अंगावर घेतली होती. जयापा मारवाडावर चालून आला, हें पाहून विजयसिंगानेंही त्याला जोराचा सामना देण्याचें ठरविलें. विजयसिंगाची जंगी तयारी पाहून जयाप्पाला प्रथम थोडी काळजीच वाटली. शिंदे–होळकर ही आजपर्यंतची जोडी या वेळीं फुटली होती. जयापाला आपण एकाकी आहों, असें वाटूं लागलें होतें. तरीसुद्धां आपला भाऊ दत्ताजी व इतर लहानथोर सरदार यांच्या हिंमतीच्या व साह्याच्या जोरावर विजयसिंगाला त्यानें तोंड दिलें. आपल्या सर्व फौजेसह जयाप्पा १७५४ च्या आगष्टांत मेडत्यावर आला. जयाप्पाची फौज अवघी १५ हजार होती आणि विजयसिंगानें आपले सर्व साथीदार एकत्र जमवून ५० हजार फौज व भारी सामान एकत्र जमा केलें होतें. मेडत्याची ही लढाई प्रातःकाळपासून तिसऱ्या प्रहरपर्यंत मोठी निकराची झाली. पण लढाईचा कांहीं निर्णयात्मक शेवट होईना, असें पाहतांच जनकोजीनें दोन हजार निवडक फौजेनिशीं विजयसिंगावर जोराची चाल करून त्याची फौज दुभंगून टाकली. या चढाईत जनकोजीस तीन जखमा झाल्या. तथापि मागें न हटतां त्यानें आपली चढाई चालूच ठेवली. शिंद्यांच्या चढाईपुढें विजयसिंगाला दम धरतां आला नाहीं. तो एक दिवसांत चाळीस कोस मजल मारून नागोरास पळून गेला. जयापानें विजयसिंगाचा सर्व मुलूख हस्तगत केला व त्याचा पाठलाग करून नागोरच्या किल्ल्यास वेढा दिला. विजयसिंग याप्रमाणें किल्ल्यांत कोंडला गेला खरा. पण त्यामुळें ही लढाई संपली नाहीं. त्यानें किल्ल्यांत राहून मोठ्या हिंमतीनें सात आठ महिने किल्ला लढविला. नागोरचा किल्ला लवकर हस्तगत होत नाहीं असें पाहून जयापानें रामसिंग व जनकोजी यांजबरोबर दहा हजार फौज देऊन पुन्हा मेडत्यावर मोर्चेबंदी करण्यास पाठविलें. नागोराप्रमाणें येथेंही उभय सैन्यांत निकराच्या चकमकी चालू राहिल्या. याप्रमाणें जवळ जवळ एक वर्षभर हें नागोरचें प्रकरण रेंगाळत राहिलें. विजयसिंगाला मात्र यापुढें आपल्याला टिकाव धरतां येईल, असें वाटेनासें झालें. विजयसिंगानें आपल्याला या प्रसंगीं मल्हारराव होळकर मदत करील या बळावरच जयाप्पाशीं दोन हात करण्याचें

ठरविलें होतें. त्यानें मल्हारबाकडे आपले वकील पाठवून मदतीची निकड लावली. आपण दोघे, शिंदे होळकर एकाच धन्याचे नोकर. तेव्हां जयापाविरुद्ध आपल्याला उघड उघड मदत करतां येत नाहीं. तथापि इतर राजेरजवाड्यांना पत्रें पाठवून कुमक करतों, असें त्यानें विजयसिंगाला कळविलें आणि त्याच वेळीं त्याला असेंही सांगून पाठविलें कीं, तुम्हास कोणी मदत करीत नसल्यास ' कांहीं मोगलाई मसलत ' करून यश संपादावें. मोगलाई मसलत म्हणजे दुसरें कांहीं नसून मारेकरी घालून जयाप्पाला ठार करावें हाच या मसलतीचा अर्थ होता. चवदा महिने होऊन गेले तरी मराठे जागचे हालेनात. जयाप्पानें आपल्या फौजेला भरपूर रोजमुरा देऊन व लागेल तें सामान पुरवून संतुष्ट ठेवलें होतें व कितीही दिवस लागोत विजयसिंगाचें पुरें पारिपत्य केल्याशिवाय येथून हालायचेंच नाहीं, असेंच त्यानें ठरविलें होतें. इकडे विजयसिंगाला मात्र दिवसेंदिवस धीर निधेनासा झाला तेव्हां असें कोंडून घेऊन नष्ट होण्यापेक्षां मल्हारबाच्या सल्ल्याप्रमाणें मोगलाई काव्याचा अवलंब करण्याचें त्यानें ठरविलें व जयाप्पाला मारण्याकरतां तीन मारेकरी सिद्ध केले. हे मारेकरी भिकाऱ्यांचा वेष घेऊन जयाप्पाच्या लष्करांत पोंचले. सकाळची वेळ होती. देवाच्या डेऱ्यापुढें जयाप्पा स्नान आटपून चौरंगावर उभे राहून तोंडावर धोतर घेऊन डोळे चोळीत असतां मारेकऱ्यांनीं एकाएकी त्याजवर दोहींकडून हल्ला करून सुऱ्याचा मार केला. जयाप्पा ताबडतोब जमीनिवर कोसळला. जवळच्या अबदागिऱ्यानें एका मारेकऱ्यास कव घालून पकडलें. एकावर आजूबाजूच्या लोकांचा हात पडल्यामुळें तो ठार झाला व तिसरा मोठ्या शिताफीनें प्राण वांचवून नागोरांत पळून गेला. जयापा ठार झाला व मराठी लष्करांत गडबड उडाली, ही संधी साधून विजयसिंगानें मराठी फौजेवर जोराचा हल्ला चढविला. पण दत्ताजीनें शोक आवरला. आपले लहान सरदार एकत्र केले व तितक्याच जोराचा प्रतिहल्ला करून विजयसिंगाच्या सैन्याचा धुव्वा उडविला व त्यास पुन्हा गांवांत नेऊन घातलें. जनकोजीनें याच दिवशीं मेडतें सर केलें होतें. जयापाचा असा आकस्मिक अमानुष खून झाला तरी न डगमगतां या चुलत्या पुतण्यांनीं मराठ्यांची बाजू चांगल्या प्रकारें राखली.

नागोरच्या वेढा चालू होता. शिंदे आपल्याकडून होईल तेवढी शिकस्त करून हा किल्ला लढवीत होते. अशा वेळीं शिंद्याला होळकरांकडून किंवा पेशव्याकडून योग्य मदत मिळाली असती तर हें प्रकरण तावडतोब मिटलें असतें. होळकरानें तर शिंद्यांना या लढाईत मदत केली नाहींच. उलट विजयसिंगाला भलताच सल्ला देऊन आपल्या मनाचा हलकेपणा व्यक्त केला. हा लढा चालू असतां रघुनाथराव दक्षिणेकडे जाण्यास निघाला होता. याच वेळीं पेशव्यांनीं अंताजी माणकेश्वरास उत्तरेकडे रघुनाथराव सांगतील ती कामगिरी करावयास परत पाठविलें. अंताजीची व रघुनाथरावाची भेट माळवा प्रांतांत झाली. शिंदे नागोरला वेढा देऊन बसले आहेत हें माहीत असतां रघुनाथरावानें अंताजीला तिकडे अंतर्वेदींत गोपाळ गणेशाच्या मदतीस पाठविलें. जयाप्पानें नागोरचें प्रकरण अंगावर घेतलें ही गोष्ट रघुनाथरावालाही पसंत नव्हती. पण जयाप्पा ठार झाल्यावर दत्ताजी व जनकोजी यांनीं पेशव्यास विनंति केल्याप्रमाणें पेशव्याचा निकडीचा हुकूम अंताजीस आल्यावर तो शिंद्याच्या मदतीस धांवून आला. वाटेंत फौजेची जमवाजमव करीत व अरवली, बुंदी, कोटा व जयपूर येथील रजपुतांनीं केलेले अडथळे शिताफीनें बाजूला सारीत अंताजी नागोरास दाखल झाला. वाटेंत जयपूरच्या माधवसिंगानें घाबरून जाऊन आपला एक सरदार अनिरुद्धसिंग अंताजीकडे तहाकरतां पाठविला. अंताजी नागोरास आला त्या वेळीं हा अनिरुद्धसिंगही त्याच्या बरोबर होता. शिंद्याला याप्रमाणें नवीन कुमक येऊन पोंचली तरी धीर न सोडतां विजयसिंगानें मोठया हिंमतीनें पुन्हा शिंद्यावर हल्ला केला. पण या वेळीं मात्र त्याचा पूर्ण पराभव झाला. रामसिंगास संपूर्ण राज्य दिल्याशिवाय दत्ताजी तह करण्यास तयार नव्हता पण अंताजीनें फार ओढून धरूं नये, असें सुचविल्यावरून त्याच्यामार्फत तहाच्या अटी ठरून राज्याच्या तीन वाटण्या करण्यांत आल्या. पेशवे सरकार, विजयसिंग व रामसिंग या तिघांत जोधपूरचें राज्य वांटण्यात आलें. पेशवे सरकारची नजर दोन कोटी, दरबारखर्च व अंताजीची बक्षिसी मिळून पांच कोट ऐवजाची निशा घेतली. नागोर येथें रामसिंग व झालार येथें विजयसिंग यांनीं राज्य करावें व जोधपुरचा किल्ला पेशवे सरकारांत ठेवावा, असें ठरविण्यांत आलें.

याप्रमाणें पुष्कळ दिवस चाललेला हा लढा संपवून उभयतां शिंदे

दक्षिणेंत चांभार गोंद्यास आले. सदाशिवराव भाऊ व नानासाहेब यांनीं मुद्दाम जाऊन शिंदे चुलत्या पुतण्यांची भेट घेतली. मारवाडकडे मिळविलेला मुलूख शिंद्याकडेच ठेवण्यांत आला. मल्हारबा चांभार गोंद्यास येऊन शिंद्याना भेटणार होता. पण ' आतां त्यांची भेट स्वर्गी ' असा शिंद्यांकडून निरोप मिळाल्यावर मल्हारबानें आपला भेटीचा बेत रहित केला.

१७५३ च्या पावसाळ्यांत रघुनाथराव उत्तरेकडे गेला व १७५५ च्या पावसाळ्यांत परत पुण्यास आला. रोहिल्यांचा बंदोबस्त व तीर्थक्षेत्रें सोडविणें हीं त्याला नेमून दिलेलीं कामें त्यानें कशीं बशीं केलीं. मीर शहाबुद्दीनला मराठी सैन्याची मदत झाल्यामुळें दिल्लींतील राजघराण्यांत राज्यक्रांति झाली. एक पावसाळा रघुनाथरावानें दिल्लींत काढला. त्यामुळें मराठयांचा दरारा त्या भागात कांहीं काल बसला. सुरजमल जाटाचाही त्यानें बंदोबस्त केला. इतकें झालें तरी रघुनाथरावाच्या या स्वारीच्या मुळाशीं आणखी जे मुख्य उद्देश होते ते मुळींच साध्य झाले नाहींत. हिंदुस्थानातील दोन मुख्य सरदार शिंदे-होळकर याच्यांत एकोपा घडवून आणण्याचें कार्य त्याला साधलें नाहीं. त्याप्रमाणेंच रजपुतांना व इतर लहानथोर हिंदू सरदारांची एकजूट करून हिंदूपदपातशाहीच्या वाढीला बळकटी आणण्याचें कार्यही त्याच्या हातून पार पडलें नाहीं. याशिवाय दौलतीवर झालेलें कर्ज फेडण्याकरतांही नानासाहेबानें रघुनाथरावाला हिंदुस्थानांत पाठाविलें. पण हें काम तो मुळींच करूं शकला नाहीं. त्याच्या या स्वारींत शिंदे—होळकरांमधील वैमनस्य अधिकच वाढलें. अंतर्वेदीचा बंदोबस्त करण्यांत आला व तीर्थक्षेत्रेंही मिळाविलीं. पण त्या बाबतींतही कायमची व्यवस्था करतां न आल्यामुळें रघुनाथरावाची पाठ फिरतांच त्या ठिकाणच्या बंडवाल्यांनीं आपापलीं डोकीं पुन्हा वर काढलीं. रघुनाथरावानंतर शिंदेही पुण्याकडे आले. होळकर यापूर्वीच दक्षिणेस आले होते. यामुळें दिल्लीकडील कारस्थानी लोकांना मराठयांविरुद्ध हालचाली करायला चागलाच वाव मिळाला.

मीर शहाबुद्दीननें मराठयांच्या साह्यानें दिल्ली दरबारचीं सर्व कारभाराचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं व उत्तरेंत मराठयांचें प्रस्थ वाढविलें ही गोष्ट खुद्द बादशहास व मलिका अज्जमानीसारख्या कारस्थानी राजघराण्यांतील स्त्रियांना अत्यंत दुःसह झाली होती. दिल्लीच्या आसपास मराठे मुलुखगिरी

करीत होते व मराठयांच्या फौजा खुद्द दिल्लींतच होत्या तोंपर्यंत या विरुद्ध पक्षाला हातपाय हालविणें, मुळींच शक्य नव्हतें. पण मराठयांची पाठ फिरतांच या लोकांनीं अबदालीला हिंदुस्थानांत येण्याबद्दल पुन्हा आमंत्रण पाठविलें. अबदालीला या वेळीं हिंदुस्थानांत बोलावण्याच्या कामीं दुआबांतील एक मुसलमान जहागीरदार नजीबखान रोहिला यानें पुढारीपणा घेतला होता. पंजाब हातचा गेला. मीर शहाबुद्दीननें आपल्या गैरहजेरीचा फायदा घेऊन तेथें आपला अंमल बसविला, या सर्व बातम्या अबदालीला समजल्या होत्या. व पंजाबांतील आपलें वर्चस्व पुन्हा प्रस्थापित करण्याकरतां तो हिंदुस्थानांत येणारच होता. इतक्यांत त्याला खुद्द दिल्लीच्या राज घराण्यांतील स्त्रियांनीं व नजीबखानासारख्या सरदारानें इकडे येण्यास पाचारण केलें. अबदालीनें ही संधि दवडली नाहीं. तो तावडतोब १७५६ नोव्हेंबरांत काबुलाहून निघून जय्यत तयारीनें पंजाबांत शिरला. २० डिसेंबरच्या सुमारास तो लाहोरास दाखल झाला. लाहोर व त्याच्या आसपासचा मुलुख हस्तगत करून त्या ठिकाणीं आपले विश्वासाचे सुभेदार त्यानें नेमले व मजल दरमजल करीत तो दिल्लीच्या रोखानें चालून आला. अबदाली दिल्लीकडे झपाटयानें चालून येत आहे असें पाहून मीर शहाबुद्दीनची दाणादाळ उडाली. अबदालीला यशस्वी रीतीनें तोंड देईल अशी फौज त्याजवळ नव्हती. अंताजी माणकेश्वर व नजीबखान हे दोघेच थोडी फौज बाळगून त्याजपाशीं होते. यापैकीं अबदालीवर चालून जाण्याच्या मिषानें नजीबखान बाहेर पडला तो अबदालीस जाऊन मिळाला. अबदालीला इकडे बोलावण्यांत नजीबखानाचें अंग होतें, याची दखलसुद्धां वजीरास नव्हती. अंताजीपंतामार्फत दिल्लीचा थोडाबहुत बंदोबस्त त्यानें करविला. पण अबदालीच्या झपाट्यापुढें अंताजीचा निभाव लागला नाहीं. तो पराभव पावून पळून गेला. आपल्या येण्यामुळें शहरांतील लोकांनीं कांहीं गडबड केली, असें पाहतांच अबदालीनें कत्तल करण्याचा हुकूम आपल्या सैनिकांना दिला. दोन चार तास सरीस हजारों लोकांची कत्तल करून दिल्लीच्या नागरिकांवर त्यानें जरब बसविली. दिल्लीचा किल्ला हस्तगत केला. मलिका अज्जमानी अबदालीस अनुकूलच होती. बादशहा अलमगीर यास त्यानें कैद केलें. त्याच्या भावाच्या मुलीशीं आपला मुलगा

तयमूरशहा याचें लग्न लावलें. वजीर मीर शहाबुद्दीन यास कैद केलें व दिल्लींत एक महिनाभर त्यानें स्वस्थपणें मुक्काम केला. मीर शहाबुद्दीनाला ठार मारावें, अशी नजीबखानानें अबदालीला मसलत सांगितली. पण त्यानें ती मान्य केली नाहीं. दिल्लीहून बाहेर पडल्यावर तो दक्षिणेंत जाटांच्या मुलखांत शिरला. जाटांचा बालमगड किल्ला हस्तगत करून तेथल्या फौजेची त्यानें कत्तल उडविली व तेथून मथुरेवर कूच केलें. मराठयांनीं हें शहर नुकतेंच हस्तगत केलें होतें. तें परत आपल्या अमलांत आणून मराठयांचा पाणउतारा करण्याचा अबदालीचा या स्वारींतील मुख्य उद्देश होता. दीड-प्रहरपर्यंत त्यानें मथुरेंत लुटालूट केली. पंचवीस लक्षांवर ऐवज त्यानें या ठिकाणीं मिळविला. मथुरेवरून तो गोकुळ वृंदावनास गेला. दोन चार हजार बैराग्यांनीं अबदालीच्या फौजेस तोंड दिलें. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. तेथून आग्रयाजवळ येऊन किल्ल्यास मोर्चे लावून तो हस्त-गत करण्याचा त्यानें प्रयत्न केला. परंतु किल्लेदारानें तोफांचा व बंदुकांचा भयंकर मारा करून त्याला परत फिरविलें.

याच ठिकाणीं अबदालीला रघुनाथराव व होळकर आपणावर चालून येत आहेत, अशी बातमी कळली तेव्हां तो तेथून परत फिरला. जातां जातां कुंभेरी हस्तगत करण्याच्या बेतानें तो तिकडे वळला पण सुरजमलानें दहा लाख खंडणी देण्याचें कबूल करून त्यास परत फिरविलें. उन्हानें व महा-मारीनें त्याच्या लोकांचे हाल होऊं लागले हें पाहून इकडे तिकडे न जातां थेट स्वदेशाकडेच त्यानें आपल्या फौजेचे मोर्चे वळविले. परत जातांना आणखी एक महिनाभर त्यानें दिल्लींत मुक्काम केला. मलिका अज्जमानीनें मोठ्या आग्रहानें आपली मुलगी चंदा जमानी त्याच्या पदरांत बांधली. या शरीरसंबंधामुळें हा आपला अफगाणिस्तानचा जांवई बादशाहीचें मराठयांपासून पूर्ण रक्षण करील, अशी या बाईनें समजूत करून घेतली होती. आग्रयास असतांना गाजीउद्दीन त्याच्या कैदेंतून पळून गेला होता पण अबदालीनें संरक्षणाचें आश्वासन देऊन त्याला परत दिल्लीस बोलावून घेतलें. नजीबखानाच्या बोलावण्यावरून अबदाली हिंदु-स्थानास आला होता. पण नजीबखानाचा विश्वासघातकी स्वभाव त्याला कळून चुकला होता. नजीबखानावर पूर्ण भरंवसा ठेवण्यास तो तयार नव्हता.

दिल्लीहून जातांना त्यानें तात्पुरता बंदोबस्त केला. गाजीउद्दीनास त्यानें वजीरी दिली. नजीबखानाजवळ पांच हजार फौज ठेवून बादशाहाच्या संरक्षणाच्या कामीं त्याची योजना केली. २७ मार्च १७५७ त त्यानें दिल्ली सोडली जातांना लाहोरास त्यानें आपला मुलगा तयमूरशहा व जहानखान यांस व सरहिंद येथें अबदुल सम्मद खानास बंदोबस्ताकरितां नेमलें. दहा हजार फौज त्यानें त्याच्या तैनातीस दिली व नंतर तो आपल्या देशास निघून गेला. मोगलबादशाही बुडवून त्या ठिकाणीं पठाण बादशाही स्थापावी, असें नजीबखानाच्या मनांत होतें. सुजाउद्दौल्यास वजीरी द्यावी व आपला मुलगा तयमूरशहा यास दिल्लीच्या गादीवर बसवावें, असें त्यालाही एकदां वाटलें होतें. पण दिल्लीच्या बादशाहीच्या बाबतींत एवढी क्रांति करावी कीं नाहीं यासंबंधानें या वेळीं त्याच्या मनाचा पक्का निश्चय झाला नाहीं. नजीबखानासारख्या अस्थिर व प्रसंगीं वाटेल तसें वागण्यास न कचरणाऱ्या माणसांवर विश्वास ठेवण्यास तो मुळींच तयार नव्हता.

हिंदुस्थानांत मराठे सरदार कोणी नाहींत व पेशव्यांपैकीं खासा स्वारी पुण्याकडे निघून गेली असें पाहून दिल्ली दरबारच्या कारस्थानी मंडळींनीं अबदालीला हिंदुस्थानांत येण्याबद्दल निमंत्रण दिलें, याची बित्तंबातमी पेशव्याला आगाऊच कळल्यामुळें उत्तरेकडच्या बंदोबस्ताकरतां व प्रसंगीं अबदालीलाही तोंड देण्यास नानासाहेबानें पुन्हा रघुनाथरावाला पाठविलें. दक्षिणेकडे गेलेले होळकर रघुनाथरावाबरोबर या स्वारींत होते. चिंतो विठ्ठल रायरीकर, महिपतराव चिटणीस, सखाराम बोकील वगैरे मंडळीही रघुनाथरावाबरोबर दिली. पण ज्या उद्देशानें पेशव्यानें रघुनाथरावाला उत्तरेस पाठविलें त्याच्या सिद्धयर्थ लागणारी जय्यत तयारी मात्र नानासाहेबानें त्याच्या बरोबर करून दिली नाहीं. अबदालीची ही हिंदुस्थानावरील तिसरी स्वारी होती. उत्तरेंत मराठ्यांनीं जाऊन बादशाहीविरुद्ध असलेलीं भांडणें मोडावीं व मराठी राजकारणाच्या दृष्टीनें कांहीं जोडाव व अबदालीनें बाहेरून येऊन हें सर्व कार्य मोडून टाकावें, असा प्रकार चालला असतांना अबदालीची गुर्मी कायमची जिरवायची असल्यास तशाच तयारीचा कर्तृत्ववान पुरुष नानासाहेबानें तिकडे पाठविला नाहीं. रघुनाथरावाच्या स्वभावांत

तडफ होती. तो शूर होता. धाडशी होता. पण उत्तरेंतील भानगडी समजून घेऊन त्या कुशलतेनें मिटाविण्याचें शहाणपण व चातुर्य त्याच्यांत नव्हतें. तसेंच आपण जें जोडलें तें कायम राखण्यासाठीं योग्य बंदोबस्त करण्याकरतां लागणारी हुशारी व दूरदर्शिता त्याच्या अंगीं नव्हती. रघुनाथराव पाहिल्या स्वारींतून हात हलवीत परत आला व मराठेशाहीच्या दृढतेच्या दृष्टीनें त्याला कांही भरीव कामगिरी करतां आली नाहीं, असे दिसत असतांही नानासाहेबानें पुन्हा त्यालाच पाठविलें यावरून सदाशिवराव भाऊला ही संधी द्यावयाचीच नाहीं असेंच नानासाहेबानें ठरविलें होतें, हें स्पष्ट दिसतें. नानासाहेबाच्या या दुश्वासामुळें मराठेशाहीचें कल्याण होण्याऐवजीं तिच्या नाशाचीं बीजेंच खोलपर्यंत पेरलीं गेलीं.

अबदाली हिंदुस्थानावरील या तिसऱ्या स्वारीच्या प्रसंगीं १७५६ च्या नोव्हेंबरांत काबुलाहून हिंदुस्थानाकडे येण्यास निघाला होता. तर बरोबर त्याच सुमारास रघुनाथराव व होळकर पुण्याहून दिल्लीकडे निघाले होतें. आणि आश्चर्य हें कीं, अबदाली पंजाबांत उतरला. त्यानें लाहोर काबीज केलें. तो दिल्लीवर आला, अलमगीर बादशहास त्यानें कैद केलें, दिल्लींत कत्तल करून हाहाकार उडवून दिला. तेथून पुढें सरकून रघुनाथरावानें पूर्वी ताब्यांत घेतलेलीं तीर्थक्षेत्रें पुन्हा आपल्या ताब्यांत घेऊन तेथेंही मनमुराद लुटालूट केली. आग्रा कबजांत घेऊन पुन्हा तो परत दिल्लीस गेला. तेथें एक महिनाभर राहिला. तेथील सारवासारव करून १७५७ एप्रिलांत तो परत स्वदेशीं गेला; तरी याच वर्षाच्या मेअखेरपावेतों रघुनाथराव दिल्लीपर्यंतही पोंचला नाहीं.

याचा अर्थ सरळ आहे. मल्हाररावास अबदालीपुढें जावयाचें धैर्य नव्हतें व इच्छाही नव्हती. तशीच रघुनाथरावाच्या मनाची स्थिति झाली होती. अबदाली ज्या झपाट्यानें हिंदुस्थानांत आला त्याच झपाट्यानें रघुनाथराव व होळकर उत्तरेकडे चालून गेले असते तर अबदालीला हवा तसा धिंगाणा घालण्यास मोकळ रान खात्रीनें मिळालें नसतें. पण आश्चर्य हें कीं, दिल्लीकडे अबदालीच्या रोखें जावयाचें सोडून हे दोन्ही पेशव्यांचे सरदार पश्चिमेकड राजपुतान्याकडे वळले व तेथें आपला नेहमीचा लुटालुटीचा धंदा त्यांनीं आरंभला. अबदालीसारखा परका शत्रू हिंदुस्थानांत शिरतो अशा वेळीं हिंदुस्थानांतील रजपूत, बुंदेले, जाट व मुसलमानही एकत्र आणून

एकेजुटीनें अबदालीवर चालून जावयाचें सोडून या एकजुटीला घातक अशींच कामें करण्यास त्यांनीं हात घातला. अबदाली हिंदुस्थानांत येऊन भराभर मुलुख काबीज करीत आहे, अशा बातम्या येत असतांही मल्हाररावानें तर नसतीं लचांडें उपस्थित करून दिल्लीकडे जाण्याची दिरंगाई चालविली, हें उघड दिसत होतें. पण होळकराला बाजूला ठेवून व स्वतःच्या कर्तृत्वाच्या बळावर पैशाची व फौजेची जमवाजमव करून अबदालीवर चालून जावयाची तडफ या वेळीं रघुनाथरावानें दाखविली नाहीं. रघुनाथराव १७५७च्या फेब्रुवारींत इंदुरास पोचला. त्यावेळीं त्यानें भाऊसाहेबास पुढील पत्र पाठवून या स्वारींत आपली कशी दैना उडाली आहे, हें कळविलें. ‘ आजि इंदूरास आलो. होळकरांची भेट झाली. पुढें दरमजल दिल्लीस जात आहों. अबदाली दिल्लीला आला यास्तव चहूंकडून राजे व जमीनदार व रांगडे लोकांच्या नजरा फिरल्या. सांप्रत एकादा मनसबा करून मुलूख अथवा रुपये मिळवावयाची सोय दिसत नाहीं. अबदालीचें पारिपत्य होईल तेव्हांच वरकड सर्व दबतील. त्याचें पारिपत्य करावें तरी फौज अद्याप जमा झाली नाहीं. आम्ही, विठ्ठल शिवदेव, मल्हारबा, समशेर बहाद्दर, अंताजी माणकेश्वर, नारो शंकर मिळोन पंधरा हजार फौज आहे. जास्त फौज न आल्या जाता येत नाहीं. रुपये पावावयास दिवस लागले. महिन्या दीड महिन्यांत पोहोंचतील. जर अबदाली दिल्लीस राहिला अथवा अलीकडे आला तर गांठ पडेल. तमाम राजे व सुजाउद्दौला वगैरे सर्वांचीं राजकारणें त्याजपाशीं आहेत. जाठ तर झुंजू लागला. सांप्रत मनसुबा भारी आहे. फौजही त्याची भारी आहे. कजाख शिपाई आहे. यास त्यास भारी सामान असावें. यास्तव दत्तबाची रवानगी इकडे लवकर जाहली तर जमाव लवकर पडेल. ’ याच महिन्यांत आणखी एक पत्र भाऊस पाठवून रघनाथरावानें हेंच रडगाणें गायिलें आहे. ‘ फौज आमची फार करून आली नाहीं. मल्हारबाची मूदलीच थोडी आहे. दत्ताजी शिंदे, जानोजी व मुधोजी भोसले व गोविंद बल्लाळ वगैरे लहान थोरांची रवानगी सत्वर करावी. लटकींच लचांडें फार काढावी. तपशील फारच आहेत. मल्हारबाचा स्वभाव आपल्याला माहीत आहेच. मल्हारबा ज्या त्या कारभारांत आम्हास ओढतात. ’ अशा प्रकारच्या एक ना दोन किती तरी तक्रारी रघुनाथरावानें

मल्हारबाविरुद्ध या पत्रांत केल्या आहेत. अशा रीतीनें तक्रारी करीत व रडगाणीं गात जूनच्या सुमारास रघुनाथराव दिल्लीस पोंचला. एक दीड महिन्यापूर्वीच अबदाली परत स्वदेशास गेला होता. अबदालीचें धोरण स्पष्ट होतें. त्याला हिंदुस्थानांत पठाणी बादशाही स्थापन करावयाची नव्हती. लुटालूट मनमुराद करतां आली व हिंदुस्थानांतील कांहीं मुलुख बिनबोभाट ताब्यांत ठेवतां आला तर त्याला तो पाहिजे होता. दिल्ली दरबारच्या दुहीमुळें त्याला ही संधि मिळत होती. यावरच तो खूष होता.

रघुनाथराव दिल्लीस पोंचल्याबरोबर जोधपुरच्या विजयसिंगाचें प्रकरण पुन्हा उपस्थित झालें. रामसिंगास राज्य देऊं नये; शिंद्यांची व आपली गोडी करून द्यावी, अशी विजयसिंगाच्या वकीलांनीं रघुनाथरावास गळ घातली आणि मल्हारबाच्या मध्यस्थीनें रघुनाथरावानें या प्रकरणांत लक्ष घातलें. ज्या प्रकरणांत जयाप्पाचा बळी पडला व दोन वर्षेपर्यंत शिंद्यांनीं भयंकर खटाटोप केला त्यांत शिंद्यांनीं मिळविलेलें सर्व यश बरबाद करून टाकण्याचाच मल्हारबाचा हा उद्योग होता. विजयसिंगाचें हें प्रकरण निकालांत निघालें नाहीं. उलट रघुनाथरावाच्या पायांत पाय घालून त्याला अडथळा आणण्याचें काम मात्र मल्हाररावानें केलें. अबदाली दिल्लींतून परत गेला त्या वेळीं मीर शहाबुद्दीन वजीरीचें काम पहात होता. पण दिल्लींतील फौज नजीबखानाच्या हातीं होती. मीर शहाबुद्दीनला तर नजीबखानाचें हें वर्चस्व असह्य झालें होतें. तेव्हां दिल्लीपर्यंत आलेल्या रघुनाथरावाचें व मल्हारबाचें साह्य घेऊन नजीबखानाचा पाडाव करण्याचा उद्योग त्यानें हातांत घेतला व त्यांत त्याला यशही आलें. रघुनाथरावानें मीर शहाबुद्दीनच्या संमतीनें विठ्ठल शिवदेवास दिल्ली काबीज करण्याकरतां पाठविलें. पंधरा दिवसपर्यंत नजीबखानानें मराठ्यांना दाद दिली नाहीं. शेवटीं विठ्ठल शिवदेवानें नजीबखानास पकडून दिल्लीचा कबजा घेतला. नजीबखान या वेळीं रघुनाथरावाच्या कबजांत सांपडला. त्या वेळीं या उपद्व्यापी माणसाला जीवंत ठेवूं नये, अशी रघुनाथरावाला पुष्कळांनीं सल्ला दिली. पण पाताळयंत्री नजीबखानानें आपला वकील मल्हारबाकडे पाठविला व 'मी तुझा धर्मपुत्र आहे कसेंही करून माझा बचाव करावा' अशी विनंति केली. आश्चर्य हें कीं, मल्हारबानें ही विनंति मान्य केली व रघुनाथ-

रावापुढें पदर पसरून त्याची सोडवणूक करून घेतली व त्याला आपल्या जवळ केलें.

दिल्लीच्या या मुक्कामांत रघुनाथरावानें अलमगीरला बादशाही तक्तावर बसविलें. मीर शहाबुद्दीन वजीरीचें काम पहात होताच. तेव्हां त्याला त्या जागेवर कायम केलें. रघुनाथराव या वेळीं जो दिल्लींत आला तो आठ महिनेपर्यंत म्हणजे १७५८ मार्चपर्यंत दिल्ली सोडून गेला नाहीं. या दीर्घ मुक्कामांत हिंगणे, नारो शंकर, अंताजी माणकेश्वर वगैरे सरदारांच्या तैनातीं-तील हिशेबाच्या भानगडी मिटविण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण त्यांतही त्याला फारसें यश आलें नाहीं. शिंदे—होळकरांकडील हिशेबाची चौकशी रघुनाथराव कसा करूं शकणार? जयाप्पाच्या मरणामुळें दत्तबा दुःखी कष्टी म्हणून त्यांच्याकडे हिशेब मागण्याची व पैशाचा तगादा लावण्याची सोयच नव्हती. अन् मल्हारबा तर शिरजोरच झाले होते. मल्हारबाच्या व्यवहारांत ढवळाढवळ करण्याची खुद्द पेशव्याचीदेखील ताकद नव्हती.

याप्रमाणें अनेक व्यक्तिविषयक भानगडींचा तपास लावीत रघुनाथराव दिल्लीस छावणी देऊन राहिला होता. फौजेचा अवाढव्य खर्च चालू होता. त्याचा बोजा दिल्लीच्या व आसपासच्या लोकांवर पडल्यामुळें ते अगदीं त्रस्त होऊन गेले होते. शत्रूंपासून बादशहाचें रक्षण करण्याची जबाबदारी मराठ्यांनीं स्वीकारली होती. तेव्हां बादशाहीवर वारंवार घाला घालणाऱ्या अबदालीचा बंदोबस्त करणें हें मराठ्यांचें या वेळचें पहिलें कर्तव्य होतें. अबदाली तर मराठे दिल्लीकडे येण्यापूर्वींच परदेशांत निघून गेला होता. तेव्हां अबदालीनें कबजांत घेतलेला मुलुख पुन्हा आपल्या ताब्यांत घेऊन हिंदुस्थानांत येण्याचा त्याचा मार्गच बंद करणें जरूर होतें व तशी संधि या दिल्लीच्या मुक्कामांत रघुनाथरावाला मिळाली. अब-दाली लाहोर हस्तगत करून परत गेला त्या वेळीं त्यानें आपला मुलगा तैमुरशहा व जहानखान यांना पंजाबांत बंदोबस्ताकरता ठेविलें व पूर्वी तेथें कारभारावर असलेल्या अदींना बेगला त्यानें पंजाबांतून घालवून दिलें. अबदालीची पाठ फिरतांच तो पुन्हा पंजाबांत परत आला व तिकडील आपली सत्ता कबजांत घेण्याच्या उद्योगास लागला. यासाठीं त्यानें प्रथम शीख लोकांना तैमूरशहाविरुद्ध उठविलें, लाहोरास वेढा घातला

व दिल्ली येथें छावणी देऊन राहिलेल्या रघुनाथरावाशीं संधान बांधून त्याला आपल्या साह्याकरतां बोलावलें. अदीनाबेगला स्वार्थ साधायचा होता. त्यानेंच प्रथम अबदालीला हिंदुस्थानांत आणलें होतें. पण त्याच्याकडून आपला स्वार्थ साधत नाहीं, असें पाहून त्यानें रघुनाथरावाला आतां मदतीला बोलावलें. अबदाली काय किंवा मराठे काय त्याला दोन्ही सारखेच होते.

दिल्लींत माशा मारीत बसलेल्या रघुनाथरावाला ही कामगिरी मिळाल्याबरोबर तो तावडतोब लाहोरावर चालून गेला. सरहिंद येथें अबदालीतर्फे अबदुल सम्मदखान कारभार पाहात होता. त्याच्यावर प्रथम त्यानें हत्यार धरलें. मराठ्यांपुढें अबदुल सम्मदखानाचा टिकाव लागला नाहीं. रघुनाथरावानें त्याला कैद केलें. लाहोरवर चालून आलेल्या मराठ्यांबरोबर लढण्याची आपली ताकद नाहीं, हें ओळखून अबदालीचा सरदार जहानखान तैमूरशहास घेऊन स्वदेशीं पळून गेला. रघुनाथरावानें अटकेपर्यंत त्याचा पाठलाग केला व सिंधू नदीपर्यंतचा सर्व मुलुख पादाक्रांत केला. संधी मिळाल्याबरोबर रघुनाथरावानें अत्यंत तडफेनें अटकेपर्यंत स्वारी करून अटकेवर झेंडे लावले. पाऊण कोट रुपये नजर घेण्याचा करार करून त्यानें पंजाब अदिनाबेगच्या स्वाधीन केला व पेशव्यानें परत बोलावल्यामुळें व पावसाळाही सुरू झाल्यामुळें तो तावडतोब स्वदेशी परत आला. ‘ तूर्त अदीना बेगवरच सारा यखतियार दिल्हा आहे. त्यासच कमाविसीनें लाहोर मुलतान दिलें आहे. यंदा तर सारे शिबंदी खालीच जाईल. शिबंदी वारतांच कठिण पडेल, दोन तीन वर्षांनीं कांहीं सोईस लागेल. ’ याप्रमाणें रघुनाथरावानें पंजाबचा बंदोबस्त केला असल्याचें पेशव्यास कळविलें. रघुनाथरावानें ही जी व्यवस्था केली होती ती अर्थात्‌च अपुरी होती. अटकेपर्यंतचा मुलूख ताब्यांत आल्यावर पंजाबांत व सरहिंदमध्यें मराठ्यांनीं आपला कडक बंदोबस्त राखावयास पाहिजे होता. अबदालीसारखा कोणताही परका लुटारू हिंदुस्थानकडे पुन्हां ढुंकून पाहण्यासही धजणार नाहीं, अशी लष्करी व्यवस्था मराठ्यांनीं कां केली नाहीं, हें समजत नाहीं. दिल्लीची बादशाही सुरक्षित राखण्याच्या दृष्टीनेंही असा बंदोबस्त करणें इष्ट ठरलें असतें. या वेळीं रघुनाथरावानें घाईघाईनें परत दक्षिणेंत न येतां तेथेंच छावणी करून राहणें जरूरीचें होतें. कारणें कहींही असोत, रघुनाथरावाच्या हातून ही गोष्ट झाली

नाहीं. मराठ्यांचा भगवा झेंडा अटकेवर रोंवला व दक्षिणच्या घोड्यास अटकेचें पाणी पाजलें या आनंदांतच मराठे गुंग झाले आणि दुःखाची गोष्ट ही कीं, हा आपला अम्मल सरहद्दीच्या प्रांतांत किती काल टिकेल याचा विचार कोणीच केला नाहीं.

पावसाळा सुरू झाल्यावर रघुनाथराव लाहोरकडून दक्षिणेकडे यावयास निघाला. त्याच सुमारास दत्ताजी व जनकोजी उत्तरेकडे परत फिरले. वाटेंत रघुनाथरावाची व जनकोजीची एके ठिकाणीं भेट झाली. त्याच वेळीं कसेंही करून नजीबखानाचें पारिपत्य करा, असें रघुनाथरावानें जनकोजीस सांगितलें. जी गोष्ट प्रत्यक्ष पेशव्याच्या भावाला साधली नाहीं ती जनकोजी किंवा दत्ताजी कशी सिद्धीस नेणार ? रघुनाथरावाच्या सांगण्यावरून मल्हारबाचें व रघुनाथरावाचें किती बिनसलें होतें, एवढें मात्र लक्षांत येतें. 'क्रोड रुपये शिबंदी वाढली तरी पुरवेल. एवढी जोड आम्हास द्यावी. आम्हीच पारिपत्य केलें असतें परंतु मल्हाररावांनीं धर्मपुत्र म्हणून अगत्य धरून आपले तर्फेनें अंतर्वेद प्रांत कुरुक्षेत्रापासून कुंजपुरा देखील चोवीस लक्षांची मामलत त्याचे स्वाधीन केली. माधवसिंग जयनगरकर, विजेसिंग मारवाडी वगैरे बहुत धर्मपुत्र मल्हाररावास आहेत. या धर्मपुत्रांचा फलदेशही भोगीत आहेत.' रघुनाथरावांच्या या वरील उद्गारावरून तो मल्हारबावर किती चिडून गेला होता, हें व्यक्त होतें. पण हा पोंकळ संताप काय कामाचा? मल्हाररावानें रघुनाथरावाच्या या संतापाला दाद दिली नाहीं इतकेंच नव्हे तर ज्या शिंदे बंधूंवर पेशव्याचा विश्वास होता त्यांचींही मनें पेशव्याविरुद्ध कलुषित केलीं व त्यांना आपल्या धोरणाप्रमाणें वागावयास लावलें. रघुनाथराव दक्षिणेंत परत गेल्यावर होळकराच्या व शिंद्यांच्या पुढें गाठीभेटी झाल्या त्या वेळीं नजीबखानाला आपल्यातर्फें राखून ठेवणें अगत्याचें आहे, त्याचें पारिपत्य केल्यास सर्व उत्तर मराठ्यांना मोकळी होईल व अटकेपासून रामेश्वरापर्यंत जासुदाहातीं पैसा आणवून पेशवे एकछत्री राज्य करतील, असा कानमंत्र मल्हाररावानें या दोघा बंधूंना दिला. जनकोजीला मल्हारबाची शिकवण पटली नाहीं. पण दत्ताजीला मात्र ती पूर्णपणें पटली. मागाहून विठ्ठल शिवदेवानेंही दत्ताजीस हाच कानमंत्र सांगितला. यावरून पेशवे व त्यांचे

उत्तरेतील सरदार यांच्यांतील वैषम्य किती विकोपास जात चाललें होतें, हें लक्षांत आल्याशिवाय राहात नाहीं.

दत्ताजी व जनकोजी उत्तरेकडे आले त्या वेळीं पेशव्यानें त्याच्याकडे मुख्यतः चार कामें सांगितलीं. नजीबखानाचें पारिपत्य, लाहोरचा बंदोबस्त, बंगाल प्रांतांत पूर्ववत् अंमल बसविणें व तीर्थक्षेत्रें कबजांत घेणें. यापैकीं लाहोरच्या बंदोबस्ताचें काम शिंद्यांनीं थोडेंबहुत केलें. अदीनाबेग मरण पावल्यामुळें पंजाबांत थोडी गडबड उडाली, हें ऐकून शिंदे एप्रिल ( १७५९ ) लाहोरकडे गेले व तिकडे योग्य तो बंदोबस्त करून परत यमुनातीरावर रामश्याचे घाटीं आले. रघूजीच्या पश्चात् बंगाल प्रांत जवळ जवळ मराठ्यांच्या हातचा गेलाच होता. इंग्रज तिकडे आपला अंमल बसवूं पाहत होते. अशा वेळीं तिकडे जाऊन मराठ्यांचा अंमल पुन्हा बसाविणें, ही गोष्ट शिंद्याच्या ताकदीबाहेरची गोष्ट होती. होळकर व विठ्ठल शिवदेव तर या गोष्टीला प्रातिकूलच होतें. नजीबखानाचें पारिपत्य तर करावयाचें नव्हतेंच तेव्हा तीर्थक्षेत्रें मोकळीं करण्याचें तेवढेंच काम शिल्लक राहिलें. सुजाउद्दौलावर स्वारी करून त्याला नरम केल्याशिवाय हें काम साधावयाजोगें नव्हतें. दत्ताजी लाहोरचा बंदोबस्त करून परत कुंजपुऱ्यावर आला असतां नजीबाची व त्याची त्या ठिकाणीं भेट झाली. सुजाउद्दौलावर स्वारी करण्याच्या प्रश्नाची वाटाघाट उभयता शिंदे बंधू व नजीबखान यांच्यांत झाली. त्या वेळीं शुक्रतालावर गंगेस पूल बांधून उभयतांनीं मिळून सुजावर स्वारी करण्याचें नजीबानें सुचविलें. जनकोजीला ही सूचना पसंत पडली नाहीं पण दत्ताजीनें ती अमलांत आणण्याचें ठरविलें. उभयतां शिंदे बंधूंना कांहीं तरी निमित्तानें या भागांत अडकवून ठेवण्याकरतां नजीबखानानें या डावाचा अवलंब केला होता.

पंजाबचा बंदोबस्त दत्ताजीनें केला. तिकडून आतां मराठ्यांना कोणाचें भय राहिलें नाहीं. तेव्हां मराठे आतां दिल्लीवर कायमचा कबजा करणार व दिल्लीची बादशाही मराठ्यांच्या हातीं सांपडणार, अशी भीति बादशहाला वाटूं लागली. बादशाहाचें व नजीबाचें या बाबतींत खलबत होऊन त्यांनीं अबदालीला पुन्हा हिंदुस्थानांत बोलावण्याचें व तो येईपर्यंत गंगेवर पूल बांधण्याच्या थापा देऊन दत्ताजीला स्वस्थ बसविण्याचें

कारस्थानही नजीबखानानें रचलें. एक महिन्यांत पूल बांधावयाचा व शुक्रतालावर दाखल व्हावयाचें, असें दत्ताजी व नजीबखान यांच्यांत ठरलें होतें. पण पावसाळा आला, आतां पूल बांधणें शक्य नाहीं, असा जबाब नजीबखानाकडून आल्याबरोबर दत्ताजीला त्याचें कपट ध्यानांत आलें. नजीबखानाचा वकील चेतराम यानेंही दत्ताजीस असेंच बेफामपणाचें उत्तर दिलें. तेव्हां दत्ताजीनें यापुढें कालहरण न करतां नजीबावर चालून जाण्याचें ठरविलें. तीन चार महिने शुक्रतालच्या पुलावर मराठे व रोहिले यांच्यामध्यें मोठ्या झटापटीच्या चकमकी उडाल्या. एका चकमकींत तर दत्ताजी व जनकोजी यांना जखमाही झाल्या. तथापि इतके दिवस मेहनत करून नजीबखान जेरीस येईना असें पाहून गंगेवर उतार पाहून व आपली फौज पलीकडे नेऊन नजीबखानास चेपण्याचा दत्ताजीनें विचार केला. हरद्वारास उतार मिळाला त्या वेळीं गोविंदपंत, अंताजीपंत, तुकोजी होळकर, नाइकजी भोइटे वगैरे सरदारांना वीस हजार फौजेसह दत्ताजीनें गंगापार केलें. जलालाबादेजवळ नजीबखानाचा पुत्र जाबेतखान, बूंदेखान व हाफीजरहमत यांच्या जमा झालेल्या फौजेबरोबर त्यांच्या एक दोन लढाया झाल्या. मराठयांनीं पन्नास तोफा निकामी केल्या व पुलाजवळचे गांव जाळून टाकले. दत्ताजी व नजीबखान यांच्यांत चकमक झडून राहिली असतां सुजाउद्दौला मध्यें पडणार नाहीं, अशी दत्ताजींची कल्पना होती. पण ती चुकीची ठरली. सुजानें रामगंगेस पूल बांधून लखनौहून उमरावगीर गोसावी याच्या हाताखालीं दहा हजार फौज देऊन त्यास मराठ्यांवर पाठविलें. उमरावगीरानें मराठयांशीं लढाईचा प्रसंग न आणतां एक नवीनच डाव रचला. गोविंदपंत व अंताजीपंत यांस भेटून त्यानें सलोख्याच्या वाटाघाटीला सुरुवात केली. तहाच्या वाटाघाटीमुळें मराठयांचा रोहिल्यांबरोबर लढण्याचा जोर अर्थात् कमी पडला. दत्ताजीला याप्रमाणें अडवून ठेवून नजीबखानानें रजपूत, अबदाली व इतर मुसलमान सरदार यांच्याबरोबर मराठयांविरुद्ध कारस्थानें चालविलीं. तहाच्या वाटाघाटीकरतां दत्ताजी व नजीबखान यांच्या भेटी शुक्रतालच्या पुलावर व्हाव्या व त्यांत दत्ताजीला ठार करावें, असाही कट रोहिल्यांनीं रचला होता. पण जनकोजी, दत्ताजीच्या बायका भागीरथीबाई व काशीबाई व नारो शंकर यांनीं दत्ताजीस

भेटीस जाऊं दिलें नाहीं. या वाटाघाटीच्या निमित्तानें नजीबखानानें कालहरण मात्र चालविलें होतें.

याप्रमाणें दत्ताजी आपल्या फौजेसह अंतर्वेदींत गुंतून राहिला असतां अहमदशहा अबदाली १७५९ च्या सप्टेंबरांत प्रचंड सैन्यासह पंजाबावर चालून आला. तो शिकारपूरच्या वाटेनें हिंदुस्थानांत शिरला. तेथें नदीस उतार न मिळाल्यामुळें सिंधूच्या पश्चिमतीरानें अटक पावेतों वर जाऊन आक्टोबरांत अलीकडे आला. लाहोरांतून रघुनाथरावाच्या स्वारीच्या वेळीं अफगाणिस्थानांत पळून गेलेला अबदालीचा सेनापती जहानखान त्याच्याबरोबर आला होता. साबाजी शिंदे यानें अबदालीस पुढें येऊं न देण्याचा प्रयत्न करून पाहिला पण त्याचा पराभव झाला. हरिद्वारावरून खालीं पुन्हा शुक्रतालावर दत्ताजी येत असतां पराभूत होऊन परत आलेला साबाजी त्यास भेटला. उमरावगीर गोसाव्यामार्फत चाललेल्या तहाच्या वाटाघाटी केवळ वेळ मारून नेण्यापुरत्या कपटपूर्ण होत्या. अबदाली येतांच लढाईचें सर्वच मान एकदम बदललें. तथापि सुजास आपल्याकडे वळविण्याच्या बाबतींत दत्ताजीनें शिकस्तीचे प्रयत्न केले. सुजानें या बाबतींत एकदम नकार दिला नाहीं. उलट त्यास आशेस गुंतवून आणखी एक महिना शुक्रतालापुढेंच त्यास अडकवून ठेवलें. यामुळें पुढें रोहिले व पाठीमागून अबदाली यांच्या कैचींत दत्ताजी सांपडला. अबदाली, नजीबखान, सुजाउद्दौला व अहमदखान बंगश या सर्वांच्या एकत्र झालेल्या फौजांबरोबर दत्ताजीला तोंड देण्याचा प्रसंग आला.

याप्रमाणें अबदाली या सर्व फौजेसह चालून आलेला पाहून दत्ताजी मागें फिरला व दिल्लीकडे वळला. अबदालीच्या मुकाबल्याकरतां पाठविलेल्या आपल्या सेनेची दैना उडालेली पाहून दत्ताजीचें मन विषण्ण झालें. दत्ताजीनें आणखी मागें हटावें व चमेलीपार व्हावें असा त्याच्या जवळच्या सव मंडळींनीं आग्रह केला. त्यानें तें ऐकलें नाहीं. रूपराम कट्यारीबरोबर बायामाणसें देऊन दत्ताजी व जनकोजी अबदालीला तोंड देण्याकरितां मोठ्या नेटानें कटून राहिले. अबदाली आपल्या सैन्यासह यमुना उतरून अलीकडे आला. जानराव बावळे व साबाजी शिंद्याचा मुलगा बयाजी शिंदे यांनीं त्याला अडविण्याचा प्रयत्न केला. या झटापटींत बयाजी गोळी लागून ठार

झाला. गोविंदपंत बुंदेले यांसही गिलच्यांनीं पुढें येऊं दिलें नाहीं. मल्हारराव येईपर्यंत आपली फौज बाहेर काढून माघार घ्यावी, या उद्देशानें दत्ताजी व जनकोजी बाहेर पडले. पण शत्रुसैन्यानें मराठ्यांवर जोराचा मारा सुरू केला. नदीतीरावरील अडचणीच्या जागेंत सांपडल्यामुळें दत्ताजीला मागें सरकून पळून जाणेंही शक्य झालें नाहीं. निशाणावर गिलचे चालून गेले. मालोजी शिंदे कामास आला. निशाणाचें संरक्षण करण्याकरतां उभयतां शिंद्यांनीं शिकस्तीचे प्रयत्न केले. निशाणाच्या संरक्षणाच्या भरीस न पडतां आणखी मागें सरून पळून जाण्याचा प्रयत्न केला असता तर शत्रूची फळी फोडून ते बाहेर पडूं शकले असते. पण शिंद्यांनीं तो मार्ग पतकरला नाहीं. या झटापटींत जनकोजीच्या दंडास गोळी लागली. तो बेशुद्ध झाला. त्याच वेळीं यशवंतराव जगदाळे गोळी लागून पडला. हें पाहून त्याचें प्रेत काढावयास दत्ताजी पुढें झाला तों त्याचे उजव्या बरगडींत गोळी लागली. तत्काळ तो गतप्राण झाला. (१० जानेवारी १७६०) जनकोजीस येसाजी भोइटे व जानराव बावळे यांनीं घोड्यावर घालून मोठ्या शिताफीनें रणमैदानाबाहेर नेलें. गिलच्यांनीं सरसहा कत्तल चालविली. या लढाईत आठ हजार मनुष्य जाया झालें. या लढाईस बदाऊची लढाई म्हणतात. जनकोजीचा पाठलाग शत्रूंनीं केला पण तो त्याच्या हातीं लागला नाहीं. दत्ताजीचा नोकर राजाराम चोपदार यानें आपल्या धन्याच्या शवाचें दहन केलें.

शुक्रतालच्या भागांत दत्ताजी सैन्यासह अडकून पडला असतां होळकराला मदतीला येण्याबद्दल त्यानें वारंवार कळविलें. पण तो आला नाहीं. पेशव्याविरुद्ध दत्ताजीचें मन कलुषित करणाऱ्या मल्हारबानें असा आयत्या वेळीं शिंद्यासही दगा दिला. पेशव्याला बाजूला ठेवून शिंदे—होळकरांनीं उत्तरेचा सर्व कारभार एकजुटीनें आपल्या हातीं घेतला असता तरी कांहीं बिघडलें नसतें. पण होळकराला तेंही साधलें नाहीं. शिंद्यांशीं पूर्ण सहकार्य करायचें नाहीं व पेशव्याशींही एकनिष्ठ राहायचें नाहीं, हें होळकराचें धोरण मराठी राज्याला पदोपदीं विघातकच होत गेलें.

कोटपुतळी येथें दिल्लीपासून नैऋत्येस ८० मैलांवर जनकोजी व इतर पराभूत झालेली मंडळी व मल्हारबा यांच्या भेटी झाल्या. गिलच्यांनीं या

लोकांची पाठ सोडली नव्हतीच. गिलचे आपल्यावर चालून येत आहेत असें पाहिल्यावर शिंदे–होळकर मारवाडकडे निघून गेले. उघड मैदानावर गिलच्यांशीं दोन हात करून कांहीं साधलें नाहीं, असें पाहिल्यावर गनीमी काव्याच्या जोरावर त्याला जेरीस आणायचें असें होळकरानें ठरविलें. पण हा गनीमी कावा नव्हता, केवळ पळपुटेपणा होता. मराठे मारवाडांत असतांना गिलच्यांनीं तिकडे त्यांचा पाठलाग केला तेव्हां ते पानिपत कर्नूलकडे गेले. तिकडे गिलचे येतांच दिल्लीकडे गेले. दिल्लीकडे गिलचे आल्याबरोबर मराठे आग्र्याकडे गेले. गिलचे आग्र्यावर आल्यावर ते जयनगरकडे गेले. या पळपुटेपणामुळें गिलचे अधिकच हिरीरीनें मराठयांचा पाठलाग करूं लागले. गिलच्यांची हिंमत वाढत गेली व गनीमी कावा लढविणारे मराठेच थकून बेजार झाले. एके प्रसंगीं सर्वांनीं मिळून गिलच्यांना तोंड द्यावें, असें मल्हारबांनीं सुचविलें. त्यावेळीं ‘ आमच्या फौजेनें दहशत खाल्ली आहे. तुम्हीच झुंज करा, आम्ही निघून जातों. ’ असें जनकोजीनें सांगितलें. सटवाजी खराडे, संताजी दिवाण, महिपतराव दिवाण हे सरदार होळकराचा दिवाण गंगाधर यशवंत याच्या सल्ल्याप्रमाणें गिलच्यास मुकाबला देण्यास तयार झाले. गिलच्यांची व त्यांच्या फौजेची चकमक उडाली. चकमकींत मराठयांचे कांहीं सैनिक कामास आले. त्याबरोबर मराठे पळत सुटले. असें काहीं झालें कीं, मराठे एकाएकीं धीर सुटून पळत सुटतात हे अबदालीनें पाहून ठेवलें होतें. त्यामुळें मराठे ज्या बाजूनें पळून जातात त्या बाजूला त्यानें गिलचे शिपाई अगोदर ठेवून दिले होते. त्यांनीं पळून जाणाऱ्या मराठयांची मर्रास कत्तल उडविली. अफगाणिस्थानांतून येणारा अबदालीचा खजीना मारण्याचा होळकरानें प्रयत्न केला. पण गिलच्यांनीं त्याजवरच उलट हल्ला चढविल्यामुळें होळकर आपल्या बरोबरच्या दोनचारशें लोकांसह पळून गेला. याप्रमाणें मराठयांची धांवपळ पावसाळा सुरू होईपयत चालू होती. पावसाळ्यांत अबदालीनें अनूप शहरीं आपल्या फौजेची छावणी दिली व शिंदे होळकरांनीं केरोलीच्या बाजूस तळ दिला. अबदालीच्या तडाक्यानें मराठे नामोहरम झाले होते. त्यांच्यांतील धमक नाहींशी झाली होती. मराठयांची ही त्रेधा झालेली पाहून रजपुतांना मनांतून हर्ष झाला होता. जाटाला मराठयांनीं दुखविलेलें नव्हतें. कुंभेरीच्या

वेढ्याच्या वेळीं होळकराच्या मनाविरुद्ध जयापानें सुरजमल जाटाचा पक्ष घेतला होता हे उपकार स्मरून जाट मात्र मराठ्यांना साह्य करण्यास तयार होता. दत्ताजी बदाऊच्या लढाईत कामास आला. त्यानंतर अबदालीनें मराठ्यांची सर्वेहोलपट सुरू केली. या बातम्या उत्तरे कडील सर्व सरदारांकडून नानासाहेबांस मिळाल्या. या हकीकती कळताच नानासाहेब किंवा दुसरी कोणी पेशव्यांपैकीं खासा स्वारी आपल्या मदतीस खात्रीनें येणार या आशेनें इकडून तिकडे पळापळ करून वेळ काढण्याचा उद्योग शिंदे-होळकर करीत होते. आपल्याला दक्षिणेंतून भरभक्कम मदत आल्याशिवाय अबदालीचें आपण कांहीं वांकडें करूं शकत नाहीं अशी या सरदारांची बालंबाल खात्री झाली होती. तेव्हां हा सर्व गनिमी कावा शत्रूला जेरीस आणण्याकरतां नव्हता. तर दक्षिणेंतून मदत येईपर्यंत कसा तरी बचाव करून कालहरण करण्याकरतांच मराठ्यांनीं ही पळापळ चालविली होती.

पानपतच्या प्रचंड संग्रामाची भूमिका याप्रमाणें पूर्णपणें तयार झाली होती. पण हें पानपतच्या पूर्वार्धाचें प्रकरण संपविण्यापूर्वी आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. मराठ्यांच्या ताब्यांतील मुलखाची वसूल पद्धति रामचंद्रबाबानें लावून दिली होती व त्याच पद्धतीप्रमाणें त्याच्या तालमींत तयार झालेला त्याचा शिष्य सदाशिवराव भाऊ ह या वेळीं पेशव्याच्या वसूली दप्तराचें काम पाहत असे. पेशवाईतलि भाऊसाहेबाच्या कारभारांतील हें एक विशेष अंग होतें. या बाबतींतलि ठिकाठिकाणच्या चिटणिसांकडून, कमाविसदारांकडून व कांहीं प्रसंगीं खुद्द सरदारांकडून जीं पत्रें येत तीं बाळाजी बाजीराव प्रधान यांच्या नांवाचीं असत व पत्राचे जबाबही बाळाजी बाजीराव यांच्या नांवेंच जात असत. तरी हा सर्व व्यवहार सदाशिवरावभाऊच करीत असे. या बाबतींत कोणी मुद्दाम भाऊसाहेबाचेंच उत्तर मागितलें तरी ‘लिहिला मजकुर सविस्तर कळला. ऐशास येविसीचें उत्तर तीर्थरूपांनीं लिहिलें आहे त्याजवरून कळेल’ असें लिहून भाऊसाहेब मोकळा होत असे. पेशव्याच्या हुकुमाप्रमाणें व स्वतःच्या मर्जीप्रमाणें ठिकठिकाणचे सरदार मुलुखगिरी करीत. पण हा मुलुखगिरीवरचा पैसा पेशव्याला व मुख्य सरकारला त्याच्या वाटणीप्रमाणें पोंचता करण्याच्या ताकिदी असून हा पैसा कधींच वेळेवर येत नसे.

वेळेवर तरी कसला कधीं कधीं आपल्या वाट्याची खंडणी देण्याचेंच हे सरदार टाळीत असत. रघूजी भोसले कधींच खंडणी देत नसे, पेशव्याकडून तगादे आले तरी त्याची पर्वा तो करीत नसे. शिंदे-होळकर अद्याप इतके बेमुर्वत झाले नव्हते. यांच्याही पेक्षां खालच्या दर्जाचे सरदार अंताजी माणकेश्वर, नारो शंकर, गोविंदपंत बुंदेले वगैरे, वसुलीचा कारभार पाहणारे सदाशिवराव-भाऊ यांना वचकून असत. शिंदे होळकर काय किंवा इतर सरदार काय यांचे हिशेब कधींच वेळेवर चुकते होत नसत. रामचंद्र बाबांनीं व भाऊनीं जी पद्धति लावून दिली होती, त्याप्रमाणें हिशेब लिहिण्याचे व ताळेबंद पाठवून ते नीट ठेवण्याचें काम बहुधा कोणाकडून पुरें होत नसे. रघुनाथराव १७५५ त उत्तरेंत आले त्यावेळीं हिशेबदुरुस्तीच्या कामाकडे लक्ष देण्याबद्दल त्यांना सांगण्यांत आलें होतें. यावेळीं दिल्लींत त्यांचा पांच सहा महिन्यांवर मुक्काम होता. या अवकाशांत त्यांच्या हातूनही हें काम होऊं शकलें नाहीं. पैशाची ओढाताण सारखी चालू असलेली व सरदारांकडून वेळेवर पैसा यावयाचा नाहीं. या बाबतींत कडकपणानें वागावें तरी पंचाईत. होळकरांच्या बाबतींत रघुनाथराव कांहींच करूं शकले नाहींत आणि या सुमारास जयापाच्या खुनामुळें शिंदे अस्वस्थ चित्त म्हणून त्यांना कांहीं बोलणें शक्य नव्हतें. आपल्या जवळ शिल्लक किती, लोकांचें कर्ज काय झालें, त्याचा खर्च कसा केला याचा ताळेबंद त्यांनीं मागितल्यावरून पाठवावा, असें दत्ताजीनें आपला चिटणीस रामाजी अनंत यास लिहून कळविलें. त्याप्रमाणें हा ताळेबंद पेशव्याकडे पाठविण्यांत आला. पण तो त्याला मुळींच पसंत पडला नाहीं. 'हिशेबाची याद पाठाविली ते पावली. सात साला वेगळी झडति असावी, कारकुन तैनात खाऊन हिशेब नीट करीत नाहींत यास्तव परिच्छिन्न कारकुनास ताकीद करून वेगळ्या झडत्या तयार करविणें. सन १७५१ पासून तीन साला झडत्या तयार होत्याच. पुढील तीन सालाच्या झडत्या नाहींत. निमित्य कीं आमची छावणी तीन सालें मारवाडप्रांतीं झाली. तेथें महालचे हिशेब आले नव्हते. शिलेदार वगैरे लोकांची तीन साली समजाविशी होणें होती. सबब झडत्या तयार करावयास आणखी सहा सात महिने पाहिजेत. श्रीगोंद्यास आल्यावर जे शिल्लक होती व कर्जें लोकांचीं घेतलीं होतीं ते जमा धरून खर्च जाला तो अखेर सालपावेतो लिहून पाठ-

विला तो कांहीं हिशेब नव्हे हें यथार्थच आहे. आम्ही चाकर लोक आहों बावगी वर्तणूक करूं अगर न करूं हें सर्व स्वामी जाणतच आहेत. झडत्या तयार झाल्यावर सेवेशीं पाठवूं. कारकुनास बेमुलाहिजा आज्ञा केली आहे.' पेशव्यानें विचारलेले प्रश्न व त्याला दत्ताजींनीं दिलेलीं उत्तरें हीं पडताळून पाहिलीं म्हणजे हिशेबाच्या कामांत सरदारांच्या दप्तरांतून किती घोंटाळे होते हें चांगलेंच लक्षांत येतें. ' शेषं कोपेन पूरयेत ' शेवटीं आम्ही चाकर लोक आहों, आमची वर्तणूक स्वामीस माहीत आहे, आमच्या घरांत काय हेंही स्वामीस माहीत आहे. पैसा नाहीं. कर्ज वाढत आहे. फेडण्यास सरकारच समर्थ आहेत अशा सबबी व टाळाटाळी पेशव्यांना नेहमींच ऐकून ध्याव्या लागत. वसूली खातें मुख्यतः भाऊंकडे असल्यामुळें तो या लोकांना धारेवर धरीत असे आणि भाऊचें हेंच धोरण या सरदारांना पटत नसे. या सरदारांच्या चिटणीसांना पुण्यास बोलावून व प्रसंगीं हिंगणे–बुंदेल्या-सारख्यांना पुण्यास बोलावून तो त्यांच्या झडत्या घेत असे. व त्याच बरोबर हिशेबही चुकता करून घेत असे. भाऊचा म्हणजे पेशव्याचा हा कार-भार सरदारांना अर्थातच पसंत नसे. पेशव्याचा दरारा हिंदुस्थानांत बसल्या-वर ते जासुदाकडून हिंदुस्थानचा वसूल पुण्यास नेतील, असें होळकरानें जनकोजीला व दत्ताजीला जें पढाविलें त्याचें कारण भाऊचा हिशेबांतील कडक-पणा हेंच होतें. जनकोजीला ही गोष्ट पटली नाहीं. पण दत्ताजीला पटली याचें कारण दत्ताजीलाच जबाबदार म्हणून भाऊसाहेबाच्या पत्रांना उत्तरें द्यावीं लागत व अनेक सबबी पुढें करून हिशेबांची ब्याद टाळावी लागे. हिंगण्याच्या बाबतींतही हिशेबाचा असाच गोंधळ आढळून आला. कर्जफेडीकरतां दिल्लीकडील कांहीं परगण्यांचा वसूल करून तो कर्जदारास भरावा अशी व्यवस्था केली असतां दिल्लीच्या वजीरानें त्यांत कांहीं लबाडी केली व वसूली-पैकीं कांहीं रक्कम गडप केली. हिंगणे या बखेडयांत होते. तेव्हां त्यांच्या वाडयाची जप्ती करावी किंवा त्यास पकडावें असें रघुनाथराव पेशव्यास विचारतो या प्रकरणांत झालेला दंड हिंगण्यानें भरला व तो मोकळा झाला. अंताजी माणकेश्वर याच्या बाबतींतही तोच प्रकार. ' सांप्रत तुमच्या लिहिल्यावरून दिसोन आलें कीं, लबाडी करून राहतात. हर प्रकारें ऐवज हाताखाली घालून हात उबवणार. अबरूचा, प्रामाणिकतेचा

दरकार त्यांनीं टाकलासें दिसतें. यास्तव पत्रदर्शनीं तिळमात्र मुलाहिजा न धरतां हुजुर यावयाविशी सक्त ताकीद करावी. न येत तर परिछिन्न बोलावून आणून कैद करून त्यास हुजूर पाठवावे. तिळमात्र मुलाहिजा करूं नये, मागे हवाले घेतलेला सर्व ऐवज ताकीद करून उगवावा. या सालचा वजीराकडील किंवा कोणताही ऐवज अंताजीचे हातीं न जाय तें करावे. तो ऐवज जमा भरून हुजूर पाठवून द्यावा. पत्र दर्शनी न येत तर अंताजीस कैद करून पाठवावे.' पेशव्यानें वरील पत्र जनकोजीस लिहून अंताजी माणकेश्वरास पकडून पुण्यास पाठविण्याबद्दल कळविलें आहे. अंताजी मेरठ वगैरे परगण्याचे पैसे मध्येंच खातो. वजीराजवळ बारा हजार फौजेची हजेरी लटकीच भरतो. अशा प्रकारच्या हिंगणे, अंताजी माणकेश्वर वगैरे लोकांनीं केलेला गोंधळ भाऊनें मिटविला. हिशेबाच्या भानगडीसंबंधानें चौकशी सुरू झाली त्यावेळीं अंताजी माणकेश्वरानें रघुनाथरावाला पाठविलेलें पुढील पत्र अत्यंत बोधप्रद आहे. ता. २४ एप्रिल १७५९ चें हें पत्र आहे.

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] दादासाहेब स्वामिचे शेवेसी.

विनंती सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक सां। नमस्कार [विज्ञा]पना सेवकाचे वर्तमान तागाईत चैत्र वद्य १२ द्वादशी [मु] काम करनाल यथास्थित असे विशेष स्वामीचे आज्ञापत्र चिरंजीव दाजीबा याणी फालगुण वद्य ९ नवमीचे पुण्याचे मुक्कामीचे पाठविले कापु (!) फालगु [न*] वद्ये ११ येकादसी श्रीकुरुक्षेत्रीचे [मुका]मी पावले तेथे अज्ञा बहूत इतराजी करून विस्तारपूर्वक लिहिली की अद्याप येणे होत नाही येसियासि सेवकाचा अपराध काडीइत्का नाही सेवकास तीन आज्ञापत्रे सादर जाली कीं राजश्री दताजी सिंदे व रा जनकोजी सिंदे ज्या प्रकारची गणती घेतली [तै]सी द्यावी व दिलीची वाजपूस व माहालाची वाजपूस वजिराकडील जमा वसूल बाकि हे फडशा करून येणे याचप्रकारे सिंदे आम्हास तागादा करून सांगू लागले आम्ही मान्य केले की आजीच आमचा फडशा करून अज्ञा देणे त्याणी आपल्या कामाकाजामुले आम्हांस दिलीस निरोप न देता लाहोर प्रांते नेले नित्य दोन प्रहर रात्रपर्येंत निरोपास बसून पाहिले परंतु निरोप न देत च्यार कामे [त्यांचे] जिमेस त्याचा फडशा तरी जालियावाचून उगेच उठोन येता नये मग सरहदेस गेलो तेथे सदीपबेगाकडील इजाफियाचे काम विल्हेस

लाविले मग शेतद्रु नदीपार गेलो तेथे [आदिना]बेगाची स्त्री व धर्मपुत्र आणून त्याजकडील मृत्य पावलियाचे मामलतीचे विल्हेस लाविले आला जाट याजकडील विल्हेस लाऊन जंबूच्या राजियाचे विल्हेस लाऊन साबाजी सिंदे लाहोरापलीकडे पाचा हजारा फौजनशी रवाणे करून सारी कामें उलगडून घेऊन माघारे नदी सतळूंज उतरले ते दिवसी आम्हांस बोलाऊन आणून गणती घेतली गणतीच्या निक्षी नानाप्रकारच्या...जैशा त्याच्या चितास आल्या तैष्या घेतल्या वजिराकडील कारभारी समागमे होते व पुरुषोत्तमपंत वकील होते त्यांस दिलीच्या मिलकतीची खलबते येक मास-पर्येत केली मग त्यास निरोप दिल्हे त्यांजपासून सरकारच्या थैवजाची जमा वसूल बाकि सर्व करून घेतली तेव्हा चैत्र वद्य ७ आम्हास स्वामीकडे रा केले चिरंजीव तात्या दीड मास दिलीला आला त्याची भेट नाही येथून निरोप घेऊन आजी दर रोज पधरा कोसाच्या मजली करून नित्य आज करनालेस आलो येथून चौथे रोजी दिलीस जाऊन वजिराची भेट उभा-उभी घेऊन चिरजीवांस भेटून त्याच्या हाती त्यास देऊन आम्ही तीन च्यार मुकाम मात्र दिलीत करून मागती कुच दरकूच बारा कोसाच्या मजली येक मुकाम न करिता करून सेव( वे )सी येतो सिंद्यानीं कामाचा फडच्या न केला उगेच उठोन कैसे यावें याजकारिता इत्के अपराध सेवका-पासून घडले आता कोठे गुंता येका दिवसाचा राहिला नाही दरकूच शेवेसी आलो शेवकापाशी फौज भारी होती सिंद्याचे फौजचेच कमकसर होती त्याची कामकाज होणे होते म्हणोन वोढीत नेले गणतीची व दिलीच्या कारभाराचा फडच्या माहालाचा फडच्याच न करीत असों ते थोर अपराध सर्व आमचेच खरे क्षेमा करणार स्वामी समर्थ आहेत गणतीचा फडशा त्यानी स्वार बहूत टाकून केला दिलीचे मिलकतीची वजिराकडील हिंसेबाची सर्व माहाल अदीकरून केला त्याला विस्तार राजश्री दत्ताजी सिंदे याणी शेवेसी लिहिला असेल अथवा मागून लिहितील त्याजवरून सर्व शृत होईल दुसरे स्वामिची अज्ञा कीं वजिरापासून काही मेलविता ते सरकारी न लाविता आम्हांवर फौजेची सिबंदी वाढविता वगैरे इतराजी करून बहूत लिहिलें येसियासी गणमुक्तेश्वरी स्वामीच्या पायावर हात ठेविला आहे त्या-उपर अतां स्वामीची भेट होईल आणि मग कूचा हिसेब वजिरापासून

पाचा रुपयाचा जागा अथवा पाच रुपये रोख अथवा येक वस्त्र जे असले ते शेवेसी निवेदन करीन. त्यापैकीं येका रुपयाचे तफावत केला तरी स्वामिनींच आमचे मस्तकीं हात ठेविला आहे आणि आम्हीं खोटे जालियांउपर स्वामीनीच आमचे पारपत्य करावे, मग मुलाहिजा सर्वथा न करावा. शेवेसी शृत होय. मी दरकूच शेवेसी येतो. या वेलेस स्वामीनी मजला अस्वासन दिल्हे आहे यात ग्वालेर आमची जागीर आहे तेथील येका रुपयाची कसर स्वामीस समजावयासि अंतर करू अथवा गंजबसोदे येथील अथवा वजिराकडील जे असेल तेथे येका रुपयाची प्रतरणा केली तरी मग स्वामीनीच आपले हाते आमचें पारपत्य जरूर करावे. मग आमची विनंति सर्वथा मान्य न करावी. वजिराकडील माहाल साहा मेरठसुद्धा आम्हांकडे आहेत. वरकड झाडून नजीबखान याजकडे आहेत. त्याच्या इजारा वजिरापासून करून आपल्या सरकारच्या यैवजास लाउन नेहमी घेतला आहे. त्याजवर वराताची नेमणूक करून दिल्ही. पहिले आठ महाल होते त्यापैकीं बुढाणा स्वामी असता नजीबखानानी घेतला होता. मागून वजिरानी शामली सोडून घेतली. बाकी मेरठसुधा माहाल साहा आहेत. मेरठ व जलालाबाद व सरावा सिरधना बर्णावा व कांधला येणेप्रमाणें साहा माहाल त्यावर बेरीज कोणही सांगत असतील माहाल ते त्यांस द्यावे. वजिराचा इजारा सालदरसाल कर्जात लाऊन घेतला. हात भारी गुंतला म्हणोन केले व इजारीयासिवायें गांवाचे गांव फिरोन जमाबंदी बांधली त्याजमुळें इजारियासिवायें कसर आकारली तेही सरकारची जमा केली आहे. वजिरापासून येक रुपयाची जागा अथवा येक रुपया व महालची कसर व जाहागिरीची कसर मामलतीची कसर कुल मी सेवेशीं येउन समजावून स्वामीस व श्रीमंत महाराज पंतप्रधान साहेब यांसि प्रसन्न करीन तरी स्वामीचा चाकर त्याखेरीज माझी अबरू खावंद वाढवतील. आणिक जे स्वामीची मर्जी असेल तेच करूं. येका

वस्त्रानशी घराबाहेर निघोन सरदारीचे कर्जही आणिक च्यार वर्षे बुडी मारुन फेडीन.

परंतु माझे मुदई माझ्या मागे गोष्टी वाईट बोलतील, त्या ध्यानास न अणाव्या. मी येतो. सर्व आपले कचे वर्तमान समजावितो. त्यात श्रीमत माहाराज साहेब व स्वामी राजी जाले तरी उतम. काही इलकी कसर माझ्या समजाविल्यात सांगितली तरी मग तेच क्षेणी खावंदानीं आमच्या मुदयासि सरफराज करून सेवकाचे पारपत्य करावे, म्हणजे खावदानी इन्साफ केलासा जाला. आता सेवकाच्या यावयाविसीं संवश जाला तरी दरकूच दो महिन्याची वाट आहे. आठ दिवस दिलीचा मुकाम. सवादो महिन्यात पुण्यास न पावलो तरी स्वामीचे मर्जीस येईल ते करावे. मधे मी पायाजवल येतोवर माझी गोष्ट माझ्या मुदयाची सर्वथा यैकोन इतराजी न करावी. माझा चाकरीस व हिशेब आपण राजीच होतील. परंतु आलो नाही तोवर भरोसा पुरत नाहीं. जे जे आमच्या कामाचे कामावर उभे असतील तेही असो द्यावे. स्वामिची सर्वाप्रकारे चहूकडून किफायेतच आहे. येंदा हिंदोस्थानची कामे सारी अटोपली आहेत. कांहीं वर्षांत होणे नाहीत आग्वर आषाढ मासपर्यंत कोण्हासही निरोप न द्यावा श्रावण मासी जें करणें ते सर्व करणार स्वामी समर्थ आहेत शाहाजाद्याचा पक्षे शुजाउदौला यानी केला. आपली फौज पैका देउन पठणियासि दाखल केला. वजिराची लिहिली पठणियासि गेली तेथे शाहाजादा खिपत खाउन लढाईत सरला, पटणेवाले वजिरास राजी आहेत. सरदारानी तूर्त मसलत केली की, हे लबाडी शुजाउदौला यानी केली क्रोडीचा सुभा खाउन येक पैसा कोणास न देता दुसरी लबाडी हे शाहाजादियासि केली याजकरितां अयोध्या सोडवावी वजीरही समागमे न्यावा यैसे नवे अरंभिले वजिराचे मर्जीस आले तरी चिरंजीव रा तात्या फौज घेऊन वजिराबरोबरी जाईल नाही तरी चिरंजीव फौजसुधा विश्वास शामील होतील चाकरी करतील स्वामीनी मस्तिकी हात ठेविला ते

वचन सवा दोन महिने पर्यंत पाहून तोवर सांभालावें मग खरा निघालो तरी वाजवी खोटा निघालो तरी गुंता नाही हे विनंती तुम्हांस न करावी लोकात हासे भंड न करावे सविस्तर विनंती श्रीमंत माहाराज साहेबास काही लिहिली नाही स्वामीच्या पत्रावरी घालून विनंतीपत्र लिहिले आहे स्वामीस कचे वर्तमान माहाराज साहेबास श्रुवण करणार साहेब समर्थ आहेत चिरंजीव दाजी येकले मूल पायांजवल आहे कृपेत अंतर न दिसे ते साहेब करणार धणी आहेत शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.''

१७५९ त अंताजी माणकेश्वर पुण्यास आला होता. त्यावेळीं भाऊनें त्याजकडून सर्व हिशेब चुकता करून घेतला. हिशेबाच्या व वसूलीच्या बाबतींत जी अव्यवस्था या सरदारांनीं केली ती सर्व तपासून या कामाला भाऊनें सुरळित स्वरूप आणून दिलें. फौजेची हजेरी लटकी लावावयाचा प्रघात मराठी दरबारांत बराचसा सामान्य दिसतो. वृद्ध मल्हारबा होळकरही या प्रघातापासून अलिप्त नव्हते. पण होळकरासारख्या मोठ्या धेंडाना ताळ्यावर कसें आणणार ? या दृष्टीनें रघूजी फारच शहाणा दिसतो. त्यानें मुळीं पेशव्यास खंडणी देण्याचेंच नाकारलें होतें. साताऱ्याच्या गादीचे जसे आपण एक सरदार तसेच पेशवे हे सुद्धा एक सरदारच आहेत, असेंच तो मानीत होता. यामुळें वसूलीच्या व हिशेबतपासणीच्या लचांडांतून त्यानें आपल्याला मोकळे करून घेतलें होतें. या सरदारापैकीं अंतर्वेदीच्या ऐन मोक्यावर असलेल्या गोविंदपंत बुंदेल्याची हीच तऱ्हा होती. पुण्यास येऊन हिशेबाच्या भानगडी मिटवून जाण्याबद्दल अनेक वेळां ताकीदी गेल्यानंतर १७५७ त तो पुण्यास आला. भाऊजवळ त्यानें हिशेबाचा झाडा दिला व जे हिशेब लागत नव्हते त्याबद्दल पेशव्याची समजूत घातली. गोविंदपंत बुंदेले एक कर्तृत्ववान् सरदार होता. तेव्हां त्याला न दुखवतां भाऊनें त्याला पुन्हां आपल्या कामावर जातांना अंतर्वेदीवरील मुलखांवर कशी देखरेख ठेवावयाची, हेंही त्याला नीट समजून दिलें होतें.

याप्रमाणें हिशेबाच्या भानगडी मिटाविण्याचें, तपासण्याचें, पुन्हा त्याची व्यवस्था लावून देण्याचें काम भाऊंकडे होतें तरी कोणत्याही सरदाराल भाऊनें नाराज केलें नाहीं. हिशेब तपासणीचें काम त्यांनें कडकपणें केलें पण त्याचें निरसन करण्याचे कामी कोणाही सरदाराला कायमचें काढून टाकावयाचें किंवा त्याचा अपमान होईल किंवा त्याच्या अब्रूला धक्का लागेल, असें कृत्य त्यानें केलें नाहीं. म्हणूनच पानिपतच्या संग्रामाची जी मोठी जबाबदारी त्याच्या अंगावर पडली ती त्यानें अत्यंत कर्तबदारीनें पार पाडली.

---

# पानिपत

## ( उत्तरार्ध )

अबदाली १७५९ च्या आगष्टमध्यें हिंदुस्थानांत आला. हिंदुस्थानावरील त्याची ही चौथी स्वारी. दत्ताजी शिंदे दक्षिणेंतून परत आल्यावर त्यानें प्रथम लाहोरपर्यंत दौड मारली व तेथला पक्का बंदोबस्त केला. रघुनाथरावानें आपल्या भरारींत पंजाब, सरहिंद व अटकपावेतों मुलूख कबजांत घेतला. पेशव्यानें त्याला लवकर परत बोलावलें, त्यामुळें तेथला व्हावा तसा बंदोबस्त झाला नाहीं. दत्ताजीनें या बंदोबस्ताला थोडें तरी पक्कें स्वरूप दिलें. अबदालीचा अंमल नाहीं तर मराठ्यांचा अंमल दिल्लीच्या बादशाहीवर कायमच बसणार या भीतीनें बादशहानें व नजीबखान रोहिल्यानें स्वदस्तुरचीं पत्रें लिहून अबदालीला हिंदुस्थानांत बोलावलें. नजीबखानाचें हें सर्व कारस्थान होतें. पाचपेंच नसलेला दत्ताजी त्याला बळी पडला. राजकारण यशस्वी होण्याला शौर्याबरोबर युक्ति लागते व दुसऱ्यानें आपल्याविरुद्ध चालविलेलीं कारस्थानें समजण्याचें ज्ञानही लागतें. दत्ताजी केवळ शूर होता मुत्सद्दी नव्हता. यामुळेंच नजीबानें दिलेल्या भुलथापास वश होऊन अंतर्वेदींत त्यानें आपल्याला कोंडून घेतलें व तेथेंच अखेर तो कामास आला. अबदालीनें बादशहाचें निमंत्रण स्वीकारलें. त्याच्या संरक्षणाकरतां तो चालून आला; पण तो खुद्द बादशाहाचें संरक्षण करूं शकला नाहीं. शुक्रतालचा लढा ऐन भरांत असतां वजीर गाजीउद्दीनानें बादशहाला एका अवलियाच्या दर्शनाकरतां शहराबाहेर बोलावून नेलें व तेथें त्याचा शिरच्छेद केला. व कामबक्षचा पुत्र मूहिउल मिलात यास शहाजहान सानी असें नांव देऊन त्यास तख्तावर बसावेलें. अबदालीनें दिल्ली हस्तगत केली, त्या वेळीं त्यास गादीवरून काढून टाकलें. अलीगोहरला बापाच्या मृत्यूचें वर्तमान समजतांच त्यानें अलाहाबाद येथें शहा आलम या नांवानें बादशाही पद धारण केलें. इतक्या सर्व उलाढाली होईपर्यंत अबदाली हिंदुस्थानांत राहिला, इतकेंच नव्हे तर त्यानें

अनूप शहरीं आपली छावणी दिली व जणूं काय मराठ्यांच्या दक्षिणेंतून येणाऱ्या सैन्याची वाटच तो पाहात राहिला.

अबदालीच्या या चौथ्या स्वारींतील हें धोरण कांहीं और होतें. मागच्या तीन स्वाऱ्यांत त्यानें मराठ्यांचें बलाबल ओळखलें होतें. मराठी सैन्याची मनाची ठेवणही त्याच्या पूर्ण लक्षांत आली होती. पण त्याचा एक अंदाज मात्र खास चुकला. शिंदे-होळकरांना मदत करण्याकरतां जी सेना दक्षिणेंतून यावयाची तिचें सेनापतित्व रघुनाथरावाकडे देण्यांत येईल व तोच पुन्हां हिंदुस्थानांत येईल, अशी त्याची अटकळ होती व ती अगदींच खोटी नव्हती. कारण १७५९ च्या नोवेंबरपर्यंत उत्तरेकडे बंदोबस्ताकरतां पुन्हां रघुनाथरावालाच पाठविण्यांत येणार असा पत्रव्यवहार चालू होता. मराठे सरदारांत चालू असलेल्या या हालचाली अबदालीला पूर्ण माहीत होत्या. शिंदे होळकरांची मध्यवर्ती सत्तेबाबत विरोधी वृत्ति, खुद्द त्यांची आपसांतील फूट. उत्तरेंतील पेशव्याच्या सरदारांतील बेदिली व मध्यवर्ती सत्तेसंबंधाची बेपर्वाई, रजपूत व मराठे यांचा बेबनाव, खुद्द नजीबखान व होळकर यांचें सूत. इतक्या सर्व गोष्टींचा फायदा घेऊन अबदालीनें आपलें पुढील धोरण ठरविलें, पेशवे व त्याचे सरदार यांच्या हालचालींवर पूर्णपणें नजर ठेवून, त्यांच्यांतील चालू असलेल्या वाटाघाटी समजून घेण्याची त्यानें व्यवस्था केली असल्यास त्यांत कांहीं नवल नव्हतें. या उत्तरेंतील स्वारींत रघुनाथरावाचीच खासा स्वारी येणार ही मराठे सरदारांचीही समजूत होती. तेव्हां या बाबतींत केवळ अबदालीचाच तेवढा अंदाज चुकला, असें म्हणता यावयाचें नाहीं.

दक्षिणेंतील उदगीरची निजामावरील मोहीम ऐन रंगांत असतांना दत्ताजीच्या वधाच्या हकीकतीचीं पत्रांवर पत्रें नानासाहेबाला पोंचलीं. दत्ताजीच्या साह्यार्थ मल्हारबा गेले नाहींत हेंहि पेशव्याला समजलें. दत्ताजी शुक्रतालावर दोन तीन महिने अडकून राहिला असतां मल्हारबा त्याच्या मदतीस कां धावून गेला नाहीं? त्यावेळच्या सरदारांच्या पत्रांतून या बाबतींत आश्चर्य प्रकट केलेलें दिसतें. पण मल्हारबाच्या बेपर्वाईचें कारण उघड नव्हतें काय? नजीबखान रोहिला मल्हारबाचा धर्मपुत्र. तेव्हां या आपल्या मुलाविरुद्ध मल्हारबा हत्यार कसें उचलील? दत्ताजीच्या मदतीला जाणें म्हणजे दुसरें

काय होतें ! खंडेरावाचा सूड उगविण्याची मल्हारबानीं प्रतिज्ञा केली. तेव्हां जयापानें सुरजमल जाटाला आश्रय दिल्यामुळें आपली प्रतिज्ञा पार पडूं शकली नाहीं, ही गोष्ट मल्हारबा विसरणें कसें शक्य होतें ? तेव्हांपासूनच काय तर त्याच्या पूर्वीपासूनच शिंद्यांनीं जयपूरच्या ईश्वरसिंगाचा पक्ष धरला कीं, मल्हारबानें माधवसिंगाच पक्ष धरावा. जोधपूरच्या रामसिंगचा पक्ष शिंदे यांनीं उचलला कीं, मल्हारबानें नेमके त्याचा प्रतिस्पर्धी विजयसिंग याला बगलेंत मारावें ! हा हेवादावा चालू असतांना शिंद्यांच्या घराण्यांतील दोन कर्ते पुरुष कांहीं थोड्या वर्षांत मरण पावल्यानंतर उत्तरेकडील स्वारीच्या बाबतींत रघुनाथरावाला पाठविण्याचा पूर्वीचा बेत बदलून अधिक गंभीरपणें या प्रश्नाचा विचार पेशव्याला करावा लागला, हें साहजिकच होतें.

उदगीरच्या लढाईत निजामअल्लीला पूर्णपणें नामोहरम करण्यांत आलें. आपल्याला हवा तो मुलुख पेशव्यांनीं या मोहिमेनंतरच्या तहाच्या वाटाघाटींत मिळविला. उदगीरच्या मोहिमेनंतरचा हा तह कसला ? दक्षिणेंतील निजामशाहीचा हा जवळजवळ दफनविधीच होता. उत्तरेंतील गडबडीचीं या वेळीं पत्रें आलीं म्हणून निजामशाहीवर माती लोटण्याचा हा विधी पूर्ण झाला नाहीं. या विधीपूर्वीं उत्तरेकडील आपल्या मुलुखगिरीकडे व ओहटीस लागलेल्या इभ्रतीकडे पेशव्याला लक्ष द्यावें लागलें. उदगीरची मोहीम संपवून मराठ्यांची स्वारी पुण्याकडे वळली नाहीं तर उत्तरेकडे निर्माण झालेल्या पेंचाचा विचार करण्याकरतां नानासाहेबसुद्धां सर्व मंडळी आंबेपडदूर येथें एकत्र जमा झाली. नानासाहेब पेशवा या वेळीं अहमदनगरास होता व भाऊसाहेब, विश्वासराव वगैरे मंडळी उदगीरास होती. तेव्हां या दोन्ही मंडळींना एकत्र येण्यास पूर्णा नदीच्या कांठचें व नगर व उदगीर यावरून उत्तरेकडे त्रिकोण साधणारें आंबेपडदूर हें गांव सोयीचें होतें. या ठिकाणीं बहुतेक सर्व पेशवे दरबारची जाणती मंडळी जमा झाली व उत्तरेकडील या पेंचप्रसंगाचा साद्यंत विचार या ठिकाणीं एक आठवडाभर करण्यांत आला. उत्तरेकडचा प्रश्न असाच गंभीर स्वरूपाचा होता. या प्रसंगाचा योग्य तो विचार केला नाहीं तर उत्तरेकडील सत्ता जवळ जवळ गमावून बसण्याचाच हा प्रसंग होता. दत्ताजीच्या वधानंतर अबदालीनें विशेषतः शिंदे-होळकरांची जी त्रेधा-तिरपीट उडवून दिली होती त्यावरून तर या प्रसंगाला अत्यंत

गंभीर स्वरूप प्राप्त झालें होतें. अबदाली हिंदुस्थानांत यापूर्वी तीनदां आला व तीनदांही आपल्याला पाहिजे त्या मुलखाचा कबजा घेऊन व आपल्याला वाटेल तितकी लूट घेऊन तो परत आपल्या देशांत गेला होता. या चौथ्या खेपेस तो अंतर्वेदींत ठाणें देऊन बसला होता व सर्व हिंदुस्थानभर आपल्या युद्धकौशल्यानें व तडफेनें जनतेच्या मनांत त्यानें दहशत उत्पन्न केली होती. खुद्द मराठी सैन्यानेंही या प्रसंगीं दहशत खाल्ली होती. अशा वेळीं या प्रश्नासंबंधानें आंबेपडदूर मुक्कामीं आठ दहा दिवस साधक बाधक जोराच्या वाटाघाटी झाल्या असल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं. या वाटाघाटींत अर्थात् सर्वच गोष्टींचा विचार करण्यांत येऊन कांहीं भक्कम निर्णयही घेण्यांत आले. उत्तरेच्या या स्वारीवर या वेळीं सदाशिवरावभाऊला पाठवावें हा या निर्णयांपैकीं एक महत्त्वाचा निर्णय होता.

उत्तरेंतल्या स्वाऱ्या काय किंवा दक्षिणेंतल्या स्वाऱ्या काय या स्वारीवरचा खर्च स्वारीवरच भागवावा, मूळ दरबारास या खर्चाची तोशीस लावूं नये, हा नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दींतील दंडक होता. आतांपर्यंतच्या मराठ्यांच्या मुलखगिरींत मिळालेल्या अनुभवाचाच हा परिपाक होता. तथापि तो नेहमींच यशस्वी होत होता, असें मात्र नाहीं. पेशव्याखेरीज इतर जे सरदार मुलुखगिरी करीत त्यांची दृष्टीच वेगळी होती. या मुलुखगिरींतून ते होतां होईल तों आपला स्वार्थ जितक्या मोठ्या प्रमाणांत साधतां येईल तेवढा ते साधीत असत. पेशव्याचा तगादा पाठीमागें जोरानें लागला तर ते मुख्य सरकारला कांहीं थोडे पैसे पाठवीत. पण खुद्द पेशव्यापैकींच एकादी खासा स्वारी मुलुखगिरीवर जाई त्यावेळीं वरील दंडक पाळणें अतिशय जड जाई. अंबेपडदूरला ज्या विषयाची चर्चा झाली त्यांत या स्वारीच्या खर्चासंबंधानें अवश्य चर्चा झाली. पण या बैठकीपुढें जे अनेक महत्त्वाचे प्रश्न होते त्या मानानें हा खर्चाचा प्रश्न गौण होता. स्वारीचा खर्च भागविण्याच्या खर्चापेक्षां मराठ्यांची उत्तरेंतील सत्ता व इभ्रत कशी जिवंत ठेवावयाची, हा या बैठकींतील सर्वांत गंभीर व महत्त्वाचा प्रश्न होता. १७५० त बादशाहाशीं करार झाल्यापासून बहुतेक सालोसाल उत्तरेंतील हिंगणे, बुंदेले, नारो शंकर वगैरे सरदार दिल्लीकडील बंदोबस्त कायमचा करण्याकरतां सदाशिवरावभाऊंना तिकडे पाठवावें अशी विनंति करीत होते. विशेषतः

अबदालीच्या स्वाऱ्या उत्तरेंत झाल्या त्या वेळीं तर भाऊचीच मागणी या सरदारांनीं केली होती.

नानासाहेबानें या मागण्यांकडे सारखें दुर्लक्ष केलें. पण आजच्या प्रसंगीं मात्र नानासाहेबाला तसें करणें शक्यच नव्हतें. मराठ्यांच्या सत्तेचे प्राण या वेळीं पणाला लागले होते. यामुळें इतर दुश्वास, हेवेदावे बाजूला ठेवून हा प्रसंग नीट निभावून नेईल असा पुरुषच या वेळीं हिंदुस्थानांत पाठविणें जरूरीचें होतें. उत्तरेकडच्या या पेंचप्रसंगाचें निरसन करण्याकरतां खुद्द नानासाहेबानेंच बाहेर पडावयास पाहिजे होतें. अबदाली हिंदुस्थानांत येऊन छावणी देऊन राहिला आहे, खालून पेशव्याची फौज येत आहे असें दिसत असतांही परत स्वदेशीं जाण्याची त्याची इच्छा दिसत नाहीं, अशा वेळीं या परक्या शत्रूला चांगला हात दाखविण्याची ही पर्वणी बाजीरावानें आपल्या हातची घालविली नसती. 'सरदारी करावी पण खुद्द जातीनें वाया जाऊं नये' ही नीति नानासाहेबाला आवडूं लागली होती. सरदारी करण्यास तो आतां तयार नव्हता पण पुढील 'जातीनें वाया जाऊं नये' हें धोरण मात्र नानासाहेबाला पटलें होतें. नानासाहेब या सुमारास अधिक चैनी, विषयलोलुप व विलासी बनत चालला होता. शिंदे-होळकरांसारखे सरदार, भाऊ व रघुनाथरावासारखे शूर कर्तृत्ववान् भाऊ सेवेस हजर असतां खासा मोहरा इरेस कां घालावयाचा, हें धोरण नानासाहेबाच्या वरील वृत्तीला अनुकूल असेंच होतें. कांहींही असलें तरी सर्व साधकबाधक गोष्टींचा विचार होऊन भाऊलाच मोहिमेवर पाठवावें व त्याच्याबरोबर नानासाहेबांचा वडिल मुलगा विश्वास-राव यालाही पाठवायचें ठरविण्यांत आलें. उदगीरच्या लढाईत सर्वच पेशवे मोठ्या हिरीरीनें एकदिलानें लढले. या वेळींसुद्धां भाऊबरोबर नानासाहेबानें रघुनाथरावासही पाठवावयास पाहिजे होतें.

पण तसें झालें नाहीं. पडदूरमध्यें झालेल्या वाटाघाटींत रघुनाथराव हाच एक चर्चेचा विषय झाल्यामुळें म्हणा किंवा रघुनाथराव व सखारामपंत वगैरे मंडळीचा या स्वारींतील धोरणासंबंधानें मतभेद झाला म्हणून म्हणा रघुनाथ-रावानेंच या स्वारींत सामील होण्याचें नाकारलें. अबदालीला तोंडास तोंड देण्यांत अर्थ नाहीं. तो निघून गेल्यावर गनीमी काव्याच्या जोरावर आपला अंमल पुन्हा पंजाब सरहिंदमध्यें बसवायचा व त्याचें सर्व काम निष्फळ करून

टाकायचें असें म्हणणारा एक पक्ष आंबेपडदूरमध्यें होता. पण या खेपेला अबदालीची गय करणें शक्यच नव्हतें. अबदालीनें पंजाब सोडल्यावर मराठयांनीं तो काबीज करायचा. खुद्द दिल्लीच्या राजधानींत मराठ्यांनीं व गिलच्यांनीं एकमेकांच्या पश्चात् हवा तसा धुमाकूळ घालायचा. दिल्लीच्या नागरिकांना व आसपासच्या रयतेला छळावयाचें. हा प्रकार पुन्हा या वेळींही करतां येईल, असा भरंवसा अबदालीच्या या खेपेच्या धोरणावरून धरतां येणेंही शक्य नव्हतें. मुख्य गोष्ट म्हणजे खुद्द भाऊला हें धोरण नामर्दपणाचें वाटत होतें. अशा धोरणामुळें कालहरण होतें. मनुष्यहानि व द्रव्यहानि होते, प्रत्यक्ष पदरांतही कांहीं पडत नाहीं. आणि साम्राज्यवाढीच्या दृष्टीनें निश्चितपणा तर मुळींच प्राप्त होत नाहीं. या खेपेला अबदाली पळूनच गेला तर गोष्ट वेगळी पण शक्य तितक्या झपाटयानें चढाई करून अबदालीला गांठायचें व या परचक्राच्या प्रकरणांचा कायमचा निकाल लावायचा असा आपला निश्चय भाऊनें पडदूरच्या बैठकींत मांडला व तोच सर्वांनीं शेवटीं मान्य केला. गोपिकाबाईच्या सल्ल्यानें नानासाहेबानें भाऊला तिकडे पाठविण्याचें ठरविलें. उत्तरेंत जाऊन घरांतला हा कांटा परस्पर निघाला तर बरेंच, अशी भावना या घटनेच्या मुळाशीं होती, या केवळ पूर्वग्रहदूषित कविकल्पना आहेत. भाऊला तिकडे पाठवून त्याचा निकाल लावावयाचा होता तर विश्वासरावाला—आपल्या पोटच्या पोरांला-गोपिकाबाईनें त्याच्याबरोबर कशाला पाठविलें असतें? पोटच्या गोळयापेक्षां भाऊचा शिरजोरपणा गोपिकाबाईला कां असह्य झाला होता? उत्तरेंतील ही मोहीम सर्वस्वीं यशस्वी झाली पाहिजे, मराठी राज्याचा हिंदुस्थानांतील जम पूर्वींसारखा बसला पाहिजे व उत्तरेंत आपल्या सरदारांच्या परस्पर चुरशीमुळें माजलेला गोंधळ नाहींसा झाला पाहिजे. याच केवळ सरळ व योग्य धोरणानेंच भाऊची या कामीं योजना झाली होती. आणि असें हें योग्य धोरण होतें म्हणूनच निवडक व नामांकित सरदार, निवडक हत्ती, घोडे, जय्यत तोफखाना व अस्सल भरपूर युद्धसामग्री भाऊबरोबर देण्यांत आली होती. या मोहिमेवर जाण्याच्या बाबतींत सदाशिवरावभाऊच सर्वतोपरि लायक असा पुरुष होता. गोष्ट खरी आहे कीं, भाऊनें अद्याप हिंदुस्थानांत पाऊल टाकलें नव्हतें. पण पुण्यास नानासाहेबांच्या जागीं राहून गेलीं कित्येक

वर्षें तो कारभार करीत होता. उत्तरेंतील व दक्षिणेंतील मराठ्यांच्या मुलखांतील वसूली खात्याची व्यवस्था तोच पाहात होता. दिल्लीचे व रजपुतांचे वकील पुण्यास होते त्याचप्रमाणें शिंदे होळकर वगैरे सरदारांचे वकीलही पुण्यासच होते. हरएक भानगडीच्या प्रसंगीं राजकारणी वाटाघाटी करण्याचें काम नानासाहेब अर्थात् त्याच्या सल्ल्यानेंच करीत होता. कमाविसदार व चिटणीस या जागेवरच्या नेमणुका पुण्याहूनच होत असत. या लोकांशीं नेहमीं पत्रव्यवहार ठेवून उत्तरेकडील सर्व इत्थंभूत माहिती या लोकांकडून तो मिळवीत होता. यामुळें भाऊ प्रत्यक्ष हिंदुस्थानांत कधीं गेला नव्हता तरी तेथल्या राजकारणी डावांचीं व कारस्थानांचीं सर्व मर्मस्थानें त्यानें समजून घेतलेलीं होतीं. तेव्हां तो आजपर्यंत हिंदुस्थानांत गेला नाहीं म्हणूनच केवळ तिकडे जाण्यास तो लायक नव्हता, असें म्हणतां यावयाचें नाहीं. उलट त्याच्या आजवरच्या कारभाराचा जो अनुभव पेशव्यास आला होता त्यावरून सर्व लोकांना धाकांत ठेवून अनंतविध भानगडी मिटविण्याचें चातुर्य भाऊंत आहे, ही गोष्ट नानासाहेबाला कळून चुकली होती. युद्धकला, हिशेबलेखन, चातुर्य व दुसऱ्यावर वजन पाडण्याची कला या सर्व बाबतींत तो निष्णात असल्यामुळें उत्तरेंतील या वेळच्या मोहिमेचें काम अंगावर घेण्यास लायक असा दुसरा इसम महाराष्ट्रांत या वेळीं नव्हता. पैशाच्या दृष्टीनें पेशव्याची स्थिति या वेळीं हलाखीची होती असेंही नाहीं. या वेळीं पेशव्याच्या खजीन्यांत भरपूर पैसा होता. त्याचें श्रेयही भाऊच्या दक्ष व व्यवहारचतुर कारभारालाच होतें. भाऊसाहेब स्वारीस निघाला त्यावेळीं नानासाहेबानें मुळींच कांचकूच केली नाहीं. त्यानें भाऊबरोबर खर्चाकरतां एक कोट रुपये दिले व त्याखेरीज हवी तेवढी मुबलक युद्धसामुग्रीही दिली. अंबेपडदूर येथें असतांना रंगपंचमीचा सण आला. हिंदुस्थानांत एका महत्त्वाच्या स्वारीवर जावयाचें, अशी भावना तेथें चालू असलेल्या वाटाघाटीच्या मुळाशीं असल्यामुळें हा रंगपंचमीचा सण अंबेपडदूर येथें मोठ्या थाटानें करण्यांत आला. सर्व लहान मोठया सरदारांनीं या सणांत मोठया उत्साहानें भाग घेतला होता. सर्व सरदार मोठया आनंदानें रंग खेळले. या समारंभानंतर सात आठ दिवसांत भाऊसाहेब डेरेदाखल झाले. भाऊसाहेबाजवळ 'पाऊण लाखपर्यंत फौज जमा झाली आहे......भाऊसाहेबाची सलाबत पुण्यप्रताप भारी आहे.

अबदालीचें पारिपत्य होतें; कांहीं चिंता नाहीं.' असें बाबूराव खेर यानें गोविंदपंत बुंदेल्याला जें कळविलें तें अगदीं यथार्थ होतें. भाऊसाहेब स्वारीस निघाले त्यावेळीं त्याच्याबरोबर बळवंतराव मेहेंदळे, नाना पुरंदरे, महिपतराव चिटणीस, लक्ष्मणराव बल्लाळ, भवानी शंकर, यशवंतराव पवार, अपाजीराव आटोळे, अंताजी माणकेश्वर, समशेर बहादर, नारो शंकर, विठ्ठल शिवदेव हे सरदार आपापल्या पथकांसह मोहिमेवर निघाले. स्वारींत ब्राह्मण, मराठे, प्रभू, वगैरे सर्व जातींचे सरदार होते. भाऊसाहेब स्वारीवर निघाले ते मोठ्या उत्साहानें निघाले. सरदार कुचराई करतात, हूल उठल्याबरोबर आपल्या हाताखालच्या सैन्यास धीर देऊन टिकून व कटून न राहतां पळत सुटतात. मराठी फौजेंतील सैनिकांना लागलेल्या या संवयीचा त्याला अत्यंत तिटकारा होता. या पळून जाण्यामध्यें कांहीं पुढचें धोरण नसतें. शत्रूच्या तडाक्यापासून स्वतःचा बचाव करण्याचा नामर्दपणा असतो. आपमतलबीपणानें आपले सरदार असे वागूं लागले होते, या गोष्टीबद्दल त्यानें मागें अनेक वेळां सरदारांची कानउघाडणी केली होती. अब्दालीनें शुक्रतालवर दत्ताजीचा निकाल लावला व त्यानंतर शिंदे होळकरांच्या फौजेला सळो का पळो करून सोडलें. यामुळें मराठे सैनिकांनीं हिंमत सोडली होती. म्हणूनच मराठ्यांत पुन्हा हिंमत उत्पन्न होईल इतक्या रुआबानें व थाटानें भाऊसाहेबानें या मोहिमेची रचना केली होती. शाहू छत्रपतींनीं मिरजेवर मोठ्या थाटानें व बादशाही रुआबानें स्वारी केली. त्या स्वारीचा थाट भाऊसाहेबानें लहानपणीं स्वतः डोळ्यानें पाहिला होता. त्याच बादशाही धर्तीवर भाऊनें मोठ्या समारंभानें सैन्यांतील निरनिराळ्या सरदारांच्या पथकांची व्यवस्था ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें केली. प्रचंड सैन्य, जोरदार तोफखाना, निवडक हत्ती, घोडे आणि मुबलक युद्धसामुग्री अशा तयारीनें भाऊ उत्तरेच्या मोहिमेवर निघाला. शाहूच्या मिरजेवरील स्वारीपेक्षांही अधिक थाटाची व रुआबदार अशी ही स्वारी सामान्य जनतेचे डोळे दिपविणारी व सैनिकांच्या मनांत उत्साह उत्पन्न करणारी होती. पेशव्याचें वैभव या वेळीं किती कळसाला पोंचलें होतें, त्याचें निदर्शक अशी ही मोहीम होती. पेशव्याजवळ जें जें उत्कृष्ट व भव्य होतें तें सर्व बरोबर घेऊन हिंदुस्थानाला वेळोवेळीं जाचणाऱ्या परचक्राला कायमचें नेस्तनाबूत करण्याच्या पक्क्या इराद्यानें

भाऊसाहेब बाहेर पडला होता. भाऊसाहेबाच्या या इराद्याला व उत्साहाला मदत होईल अशीच तयारी नानासाहेबानेंही मोठ्या हौसेनें करून दिली होती. अशी ही प्रचंड तयारी करून निघालेली भव्य स्वारी पाहून ‘ अबदालीचा फडशा पडणार, कांहीं चिंता नाहीं. ’ अशी भावना त्यानें सामान्य माणसाच्या मनांत उत्पन्न केली होती. अशा सर्व तयारीनिशीं बाहेर पडल्याबरोबर भाऊनें उत्तरेकडील शिंदे-होळकरांच्या खालोखाल असलेला मातबर सरदार गोविंदपंत बुंदेले यास पुढील पत्रें पाठविलीं. त्यावरून भाऊच्या या सर्व मोहिमेंतील धोरणाची कल्पना आल्याखेरीज राहात नाहीं.

“ अबदालीची गडबड झाली, यास्तव लौकर फौजा याव्या, त्यास मोगलावर जरब बसून कारभार निर्गमांत आला. जाहागिरींत अंमल बसला. कोठें कोठें बसणें त्याचा गुंता नाहीं. बऱ्हाणपुरांत अमल जाहाला. शहर हवाली जहालें. एक दोन स्थळें हवालीं होणें तीं होतील. इकडील मोगलांची गरमी राहिली नाहींच. भागानगराकडे जातील. त्यास चिरंजीव रा. दादांनीं यावें, परंतु तीर्थरूपांची आज्ञा आम्हीच जावे ही जाहली. त्यावरून फाल्गुन वद्य ११ (ता. १५ रजब) हिंदुस्थानास यावयास निराळे जाहलों. चिरंजीव विश्वासराव बरोबर आहेत. त्यास अब्दालीकडील खबर वरचेवर कळली पाहिजे. तुमच्या तालुक्याचा बंदोबस्त कसा आहे, तें सर्व लिहिणें. मल्हारबा, जनकोजी शिंदे याजकडील बातमी जलदीनें येत नाहीं. तरी तेथें कोणी ठेवून पाठवीत जाणें. सुजाउद्दौला सर्व प्रकारें स्नेह राखतात. सरदारानीं व चिरंजीवांनीं त्यांचे ठायीं ममतेंत अंतर केलें नाहीं. या दिवसांत त्यांनीं सरदाराचे विचारे अब्दालीचें पारिपत्य करावें, हेंच त्यास उचित आहे. त्यांणी आब्दालीस सामील होणें, अब्दालीची नड हिंदुस्थानचे पातशाहीत रुतो देणें हें अयोग्य. याचा विचार काय केला असे ! पुढें मातबर फौजेनिसी खासा स्वारी जलदीनें पोंचेल, तरी याचा विचार लिहिणें. त्याजकडील कोणी इतबारी मातबर वकील हुजूर यावा हें जरूर व्हावें. लिहिल्या अन्वयें तर्तूदीह व्हावी. तुम्हांकडील दोन तीन सालांचे हिशेबाचे झाडे तयार असावे; व यंदा अब्दालीचे गडबडीमुळें रुपया प्रथम मिळणें लांब आहे, त्यास खर्चास रुपयाची तर्तूद झाली पाहिजे. बाकी किंवा साल-

मजकुरचा ऐवज कांहीं पुढील ऐवजापैकीं, याप्रमाणें वीस लाख रुपयापर्यंत तर्तूद माळव्यांत पोंचतांच ऐवज कांहीं येई, कांहीं पुढें येऊन पोहोंचे, हें जरूर करणें. रजवाडे व रजपूत उपयोगी असे फौजेनिशी सामील व्हावें असें करावें. मुख्य गोष्ट बातमी फार जलद चांगली पोचविणें. तिकडील राजकारणें चार असतील तींहि राखून ठेवणें. फार फार कामें करून दाखवावीं हे तुमची उमेद. याप्रमाणें करणें व कराल हा भरंवसा आहे." "स्वारी एक दोन रोजीं बऱ्हाणपुरांत दाखल होईल तुम्हाकडे बाकीचा ऐवज येणें त्यास पंचवीस लाखाची तरतूद करून सत्वर ठेवणें व पांच सहा लाख पुढें आम्हांकडे पाठविणें. वरकड आपल्या ठाण्यांचा बंदोबस्त कसा आहे, तिकडील मंडळी इकडील लक्षानें कोण आहेत. कोणाचें राजकारण कसें आहे किंवा सारेच तिकडे आहेत, ते तपशीलवार लिहिणें. तुम्हीहि युक्तिप्रयुक्तीनें राजकारण राखून जे इकडे नसतील ते हाताखालीं घालणें. हिंदूपंत वगैरे बुंदेले यांनीं दारूगोळा सरंजाम घेऊन फौजेसुदा हुजुर चाकरीस यावेच असें करणें. जरूर ढाक बसवून बातमी पाठवीत जाणें. आम्ही मजल दरमजल मधील वाटेनें येतो. आठ रोजीं नर्मदेपार होऊं."

स्वारीस निघाल्याबरोबर भाऊनें पहिलें काम कोणतें केलें असेल तर तें सरदारांचे रुसवे काढून त्यांचें समाधान केलें हें होय. अर्धा गुजराथ घेतल्यामुळें दमाजी गायकवाड पेशव्यावर नाराज झालेला होता. ही मोहीम संपल्यानंतर सगळी गुजराथ त्याच्या स्वाधीन करण्याचें आश्वासन भाऊनें त्याला दिलें. दमाजीची पेशव्यावर निष्ठा होती. पण त्यांतल्या त्यांत त्याच्या मनांत असलेलें किल्मिष नाहींसें करून भाऊनें दमाजीला आपला करून सोडलें. शिंदे-होळकरांच्या आजच्या मनःस्थितीचा विचार करून त्यांचींही मनें शुद्ध होतील, असा त्यानें प्रयत्न केला. स्वारीवर निघाल्याबरोबर सर्वांकडे भाऊनें पैशाचा तगादा लावला तरी त्यांत कडवटपणा उत्पन्न न होईल अशी खबरदारी त्यानें घेतली. तोफखाना बरोबर असल्यावर गनिमी काव्याची पळापळी उपयोगाची नसते. गनिमी काव्याची पळापळी केल्यास तोफखाना निकामी होतो, ही गोष्ट इब्राहीमखानानें भाऊच्या लक्षांत आणून दिली. तेव्हां निदानीचा प्रसंग आला तरी सैन्यांतील पथकें आपापल्या जागीं कटून उभीं राहतील, अशी हमी त्यानें इब्राहिमखानाला दिली तेव्हां त्याचें समाधान

झालें. 'फार फार कामें करून दाखवावीं हे तुमची उमेद. त्याप्रमाणें करणें व कराल हा भरवसा आहे' अशीं उत्तेजन पत्रें भाऊनें गोविंदपंत बुंदेल्या-प्रमाणें अनेकांना पाठवून सर्व दृष्टीनीं मोहिमेची जय्यत तयारी केली होती यांत शंका नाहीं. भाऊ लिहिण्याच्या कामांत बाका होता. एकट्या बुंदेल्याला त्यानें या मोहिमेच्या दिवसांत तीनशेंबर पत्रें लिहिलीं यावरून इतर सरदारांशीं त्याचा कसा जोराचा पत्रव्यवहार चालू असला पाहिजे याची कल्पना करतां येते. भाऊ थोडासा रागीट व आग्रही स्वभावाचा होता हें खरें आहे. पण सत्याची चाड असणारीं कर्तृत्ववान् माणसें स्वभावानें अशीं असतात हा नेहमीचा अनुभव आहे. खोटें त्यांना मुळींच खपत नाहीं. ढोंगाचा त्यांना तिटकारा असतो. यामुळें असल्या प्रकरणांत हीं माणसें साहजिकच कडक वागतात. एकादी गोष्ट रास्त व न्याय्य आहे, असें समजल्यावर ती आग्रहानें अमलांत आणणें जरूरच असतें. सत्याचा पाठपुरावा करण्याचा हट्ट हा केव्हांही प्रशंसनीय असतो.

भाऊ १७६० च्या मार्चच्या तिसऱ्या तारखेस आंबे पडदूरहून उत्तरेंतील मोहिमेकरतां बाहेर पडला व एप्रिलच्या ४ तारखेस बऱ्हाणपुरास दाखल झाला. वरील दोन्ही पत्रें त्यानें बऱ्हाणपुरच्या मुक्कामाहून बुंदेल्यास पाठविलीं. एप्रिल १० रोजीं हांडिया येथें तो नर्मदेवर आला. तेथून सिहोर, भोपाळ, सिरोंज, ओर्च्छा हीं शहरे गांठण्यास सबंध एप्रिल महिना लागला. मे महिन्यांत अरुण, मालन, पाहरी, कालेवार, खेचीवाडा, नरवर हीं गांवें ओलांडून मेच्या तिसऱ्या आठवड्यांत तो ग्वाल्हेरीला येऊन पोंचला. ग्वालेरीला दोन दिवस राहून त्यानें चंबळा नदी गांठली. आठ जूनला तो चंबळा नदीपार झाला. यापलीकड मात्र गंभीर नदीला भयंकर पूर आल्यामुळें पंधरा दिवस त्याची या ठिकाणीं कुचंबणा झाली. अरुणच्या भागांत तेथल्या अहिरांनीं थोडी कटकट केली, पण ती त्यानें निवारली. पंधरा दिवस एकाच ठिकाणीं एवढ्या मोठ्या फौजेची छावणी पडली. यामुळें आसपासच्या जनतेला तिचा कांहीं उपद्रव झाला असल्यास साहजिक आहे. पण दक्षिणेंतून उत्तरेकडे दिल्लीपर्यंत गेलेल्या या प्रचंड सेनेंतील सैनिकांनीं कोठें आसपास जातां जातां लुटालूट, मारहाण, अत्याचार अशा प्रकारचीं कोणतींच कृत्यें केलीं नाहींत. भाऊसाहेबाच्या कडक

शिस्तीचा हा परिणाम होता. जुलैच्या पहिल्या आठवड्यांत गंभीर नदीला उतार मिळाला व यानंतरच्या दुसऱ्या मुक्कामावर शिंदे-होळकरांच्या भेटी झाल्या.

शुक्रतालच्या भागांत अबदालीनें दत्ताजीच्या सैन्याचा धुव्वा उडविला. दत्ताजी या लढाईत ठार झाला. यानंतर दोन तीन महिने शिंदे-होळकरांच्या मागें लागून त्यांना मारवाड, इंदूर, आग्रा, दिल्ली या भागांत अबदालीनें पिदडून काढलें व नंतर त्यानें अंतर्वेदींत अनूप शहराजवळ ठाणें दिलें तें कायमच ठेवलें. भाऊसाहेब प्रचंड सैन्यानिशीं उत्तरेकडे चालून येत आहे अशा बातम्या लागल्या तरी त्यानें आपलें ठाणें हलविलें नाहीं. विशेष हें कीं, रघुनाथरावाच्या ऐवजीं भाऊ येत आहे व प्रचंड सैन्यानिशीं ईर्षेनें मागल्या सर्व गोष्टींचा सूड उगविण्यासाठीं आपल्यावर धांवून येत आहे, असें अबदालीला कळूनही तो तेथून हालला नाहीं. इकडील उन्हाळ्याला त्याची फौज व तो कंटाळतील व नेहमींप्रमाणें ते परत स्वदेशास जातील, अशी कित्येकांची अटकळ होती, ती सपशेल खोटी ठरली. अबदालीला प्रत्यक्ष गांठून त्याचा फडशा पाडायचा या हिरीरीनें भाऊ चालून येत होता तर इकडे अबदालीहि प्रत्यक्ष पेशव्यानें पाठविलेल्या खाशा स्वारीशीं दोन हात करायचेच या ईर्षेनें अंतर्वेदींत कटून राहिला होता.

एप्रिल अखेर भाऊ सिहोर व भोपाळ भागांत होता तेथून पुढें मजल दरमजल करीत गंभीर नदी पार होईपर्यंत दोन महिने लागले. या दोन महिन्यांत भाऊनें जीं अनेक पत्रें गोपाळ गणेशास व बुंदेल्यास पाठविलीं त्या सर्वांत आपली ही मोहीम यशस्वी होण्याच्या दृष्टीनें कोणकोणतीं कारस्थानें कसकशीं लढवावीं याचाच ऊहापोह त्यानें केला आहे. अंतर्वेदीच्या भागांत बंदोबस्ताकरतां गोविंदपंत बुंदेला असल्यामुळें व तिकडेच अबदालीची ही छावणी असल्यामुळें त्याच्याकडूनच पुष्कळशा गोष्टी करून घेणें प्राप्त होतें. गोविंदपंत मल्हारराव होळकराप्रमाणेंच उतार वयाचा झाला होता. तारुण्याची तडफ त्याच्या आंगीं नव्हती. पण त्याच्यावर ज्या जबाबदाऱ्या होत्या व जीं कामें त्याच्यावर सोंपविलीं तीं पार पाडण्यांत त्यानें कुचराई मात्र मुळींच केली नाहीं. भाऊनें दिलेल्या कांहीं सूचना त्याला अमलांत आणतां आल्या नाहींत याचें कारण, त्याच्या अंगची कुचराई नसून

त्या सूचना अमलांत आणण्यास तो समर्थ नव्हता हेंच खरें, गोपाळराव गणेशाला जें पत्र लिहिलें त्यांत गोविंदपंतास धीर द्यावा, मोहिमेच्या हालचाली सुलभ होण्याच्या कामीं सर्व भार त्याच्यावर पडतो म्हणून त्यानें घाबरून जाण्याचें कांहींच कारण नाहीं. सुजा व पातशहा अलीगोहर यांना आपल्याकडे वळवून घेतल्यास त्याच्यावरचा भार कमी होईल असें त्यास सुचविलें आहे. ‘अबदाली हावभरी भरले यामुळें आपल्या फौजेनें आव टाकला’ म्हणूनच मातबर फौज व तोफखाना घेऊन आपण हिंदुस्थानास आलों आहों; असें त्यानें बुंदेल्यास कळविलें. इकडील संस्थानिकांना आपल्यांत सामील करून घेण्याचा प्रयत्न भाऊनें चालविला. विजेसिंग, माधोसिंग, कोट्याचा राजा राणाजी या सर्वांकडे पत्रें व वकील पाठविले. भाऊची स्वारी निघेपर्यंत ही सर्व मंडळी दोन्ही डगरींवर हात ठेवून होती. पण आपल्या येण्यामुळें आतां ते आपल्या पक्षांत सामील होतील असें भाऊला वाटलें. पण ही त्याची अपेक्षा पूर्ण झाली नाहीं. वरील मंडळी पूर्वीसारखीच लोंबकळत राहिली. भाऊ उत्तरेंत मजल दर मजल चालून येत होता, त्याबरोबरच तिकडील मुसलमान सरदारांना आपल्या पक्षांत खेचण्याचा उद्योगही त्याचा अव्याहत चालू होता. दिल्लीची पादशाही, तैमूरशाहाची पातशाही; तिचा पाठपुरावा करणें, तिला सुरक्षित राखणें हें आमचें कर्तव्यच आहे. तुम्हीं मात्र रोहिल्यांच्या मागें हुरळून जाऊं नये. विजयानंतर तुमच्या आमच्या विचारें दिल्लीच्या पातशाहीची व्यवस्था आपण करूं. अबदालीचा पक्ष धरण्यांत तुमचें हित नाहीं, असें भाऊनें त्याना लिहून कळविलें. मलिकाजमानी सुजाकडेच गेली होती; तिलाही आपल्याकडेच खेंचण्याचा भाऊचा उद्देश होता. हें सर्व करतांना अबदालीचें व नजीबाचें कितीसें जमतें, सुजा शेवटपर्यंत अबदालीकडेच राहील कीं मध्येंच कांहीं बिनसेल, त्याचें मन अबदालीकडे खास नाहीं तेव्हां आपल्याकडे त्याला घेण्याकरतां काय करतां येईल, अबदालीजवळ नक्की फौज किती आहे, त्याच्या फौजेचा खर्च किती, त्याची खास अफगाणिस्थानी फौज किती व हिंदुस्थानी फौज किती, त्याच्या जवळचे सरदार मनोमन कोणाकडे आहेत, रोहिले किती, पायदळ किती, तोफा किती, कोणा सरदाराची किती फौज, नजीबखान आपल्याकडे येणें अशक्य. नजिबखान म्हणजे प्रत्यक्ष अबदालीच तथापि त्याच्याकडील

रोहिल्यांतही फाटाफूट करतां येईल कीं नाहीं, अहंमदखान बंगष व हाफिज रहिमतखान हे दोन रोहिले सरदार कच्चे आहेत, त्यांचा बुद्धिभेद करून त्यांना आपल्यांत घेणें शक्य आहे; त्यांतच त्यांचें हित आहे हें त्यास समजून द्यावें. ऐकतील तर बरें. नाहीं तर जाट आम्ही एक झाल्यावर त्यांना जड जाईल हें त्यांस बजावून सांगावें, वगैरे राजकारणें कशीं खेळावीं, शत्रूकडील बित्तंबातमी कशी मिळवावी याची व्यवस्था भाऊनें केली होती. अबदाली, नजीबखान व मलका जमानी यांनीं मराठयांविरुद्ध सर्व मुसलमानांची एकजूट बनविली; यांच्यांतून मुसलमान कोणी फुटेल याची भाऊलाही आशा नव्हती. तरी या एकजूट झालेल्या सरदारांची मनःस्थिति काय आहे, हें भाऊला समजून घेणें जरूर होतें. त्याचप्रमाणें इतर बाबतींतही कच्च्या बातम्या मिळवून शत्रूचें बळ अजमाविण्यास मदत व्हावी एवढाच या सर्व खटाटोपामागें भाऊचा उद्देश होता. मुसलमानांखेरीज उत्तरेकडील रजपुत व इतर हिंदू संस्थानिक कोण व कसे आपल्याला मिळतील, हेंही तो पाहत होता आणि यांत सुद्धां मराठयांच्या पूर्वींच्या दुटप्पी धोरणामुळें कोणी फारसे लोक आपल्याला मिळतील अशी त्यास आशा वाटत नव्हती. मात्र एक गोष्ट खरी कीं, भाऊच्या बाजूला हे लोक मिळाले नाहींत तरी उघडपणें अबदालीला जाऊन मिळण्याची कोणाचीच छाती नव्हती.

गंभीर नदी उतरून भाऊ जुलैमध्यें मुचकंद तीर्थावर शिंदे-होळकरांना भेटला. सरदारांच्या गांठी पडल्या. दोन्ही फौजा एकवटल्या. दत्ताजी पडल्यानंतर जनकोजीची भेट भाऊला प्रथमच झाली. भाऊनें त्याचें सांत्वन केलें. दरबार भरवून त्याला बहुमानाचीं वस्त्रें दिलीं. अशा प्रसंगीं विश्वासराव पेशव्याच्या जागीं श्रेष्ठ स्थानावर बसे. जनकोजी व विश्वासराव समवयस्क, स्वभावानें गोड, विनयशील होते. हे दोघेही परस्परांचे जिवलग मित्र समजले जात.

आंबेपडदूरहून मार्चमध्यें निघाल्यापासून गंभीर नदी उतरेपर्यंत चार महिन्यांत भाऊनें आपलें व शत्रूचें बलाबल मोजलें. शत्रु पक्षांत सामील असलेल्या सर्व मुसलमान सरदारांची मनःस्थिति व त्यांचा मगदूर त्यानें लक्षांत घेतला होता. गंभीर नदीपासून पुढचा मुलूख म्हणजे अप्रत्यक्षपणें

युद्धक्षेत्राचाच मुलूख होता. अबदालीनें आपल्या हिंदुस्थानांतील साथीदारांच्या बळावर इकडील कारस्थानें रचलीं होतीं. खुद्द दिल्ली शहर हस्तगत करून ढवलपुरापर्यंत म्हणजे १५० मैलांपर्यंत त्यानें मराठ्यांना हांकून लावलें होतें. शुक्रतालच्या लढाईपासून अबदालीच्या व त्याच्या साथीदारांच्या आंगीं नवीन आवेश संचारला होता व लाहोर-सरहिंदपासून काशीपर्यंत त्यांनीं मुसलमानी अमलाचा चांगलाच जम बसविला होता. गंभीर नदी ओलांडल्याबरोबर भाऊला पुढें हा मुसलमानांनीं ताब्यांत घेतलेलाच मुलूख लागला व तोहि बेदरकारपणें एक एक भाग हस्तगत करीत चालला. गंभीर नदी उतरून भरतपूर, कुंभेरवरून त्यानें मथुरा गांठली. याच वेळेपासून अबदाली व त्याचे मुसलमान साथीदार यांची व भाऊची चकमक झडावयास पाहिजे होती. मथुरेच्या पूर्वेस अंतर्वेदीच्या भागांत अबदाली आपल्या सैन्याची छावणी देऊन राहिला होता. आणि आपण येथें राहिलों तर मराठे मथुरा काबीज करून दिल्लीच्या रोखानें जातात व तीहि काबीज केल्याखेरीज राहात नाहींत. हें अबदालीला माहीत नव्हतें असें नाहीं. पण अबदाली या वेळीं स्वस्थ बसला. यमुनेच्या मधल्या प्रचंड दुथडी भरून चाललेल्या प्रवाहानेंही त्याला तसें करूं दिलें नाहीं. दक्षिणेंतून मोठ्या आवेशानें आलेल्या ताज्या दमाच्या मराठी फौजेसमोर आपला टिकाव लागायचा नाहीं असें त्याला वाटलें हेंही कांहीं खोटें नव्हतें.

बरें, भाऊसाहेबांनींही अंतर्वेदींत छावणी करून राहिलेल्या अबदालीवर चालून जाण्याचें ठरविलें नाहीं. यमुनेच्या पुराची भाऊच्या मार्गांत अडचण होतीच. अबदालीला ह्या अंतर्वेदींत दाबून ठेवून दिल्लीपर्यंतचा काय तर त्याच्या पुढचाही मुलूख काबीज करून अबदालीला जागच्या जागीं चेपून मारायचा हा या मोहिमेंतील भाऊचा महत्त्वाचा डाव होता. तथापि दिल्ली-कडे जातांना अंतर्वेदीचा भाग अबदालीला अगदीं मोकळा सोडावयाचा नाहीं, असेंही धोरण भाऊनें आंखलें होतें. या दृष्टीनेंच अबदालीला व रोहिल्यांना अंतर्वेदींत पायबंद द्यावा, त्या ठिकाणीं त्यांना चैन पडूं देऊं नये. त्याच्या रसदा माराव्या, त्याच्या आजूबाजूच्या गांवांतून धुमाकूळ उडवावा, तीं जाळून टाकावीं. शत्रूच्या मुलखांतील वसूल जमा करावा, तिकडील धान्य आपल्याकडे पोंचेल अशा तजविजी कराव्या, सुजाला आपल्याकडे वळ-

विण्याच्या प्रयत्नांत अंतर पडूं देऊं नये, अंतर्वेदींत नावा जमा करून त्या सुरक्षित जागीं ठेवाव्या व यमुना नदीवर त्या कोठेंही व केव्हांही हलवितां याव्या, अशी व्यवस्था करावी अशा प्रकारचे हुकूम त्यानें गोविंदपंत बुंदेले यास देऊन ठेवले होते. अशा प्रकारचा कडक बंदोबस्त करून भाऊ मथुरेहून दिल्लीकडे चालून गेला. यमुनेच्या पलीकडचीं इटावा व त्याच्या दक्षिण बाजूचीं कांहीं थोडीं ठाणीं यावेळीं मराठयाच्या ताब्यांत होतीं. त्याचप्रमाणें गंगा यमुनेच्या संगमाजवळच्या कराकुडा भागांतही मराठयांचा अंमल शिल्लक राहिला होता, तोही गोविंदपंतानें मोठया शर्थीनें संभाळून धरला होता. व बाकीचा अंतर्वेदीचा अगदीं हिमालयाच्या पायथ्यापर्यंतचा भाग मुसलमान व्यापून बसले होते. नजीबखानाची गोष्ट अगदींच वेगळी; पण अबदालीचा पराभव व्हावा अशी सुजाची मनापासूनची इच्छा होती, ही गोष्ट भाऊला समजली होती. अलीगोहर यास पातशहाकडून सुजास त्याची वजीरी मिळेल अशीं बोलणीं करण्याकरतां भाऊनें शामजी रंगनाथ यास सुजाकडे पाठविलें होतें. अबदालीकडील सर्व इत्थंभूत बातमी भाऊला कळत होती व त्या धोरणानेंच भाऊ पुढील मोर्चाच्या योजना आंखीत होता.

भाऊ मोठ्या फौजेनिशीं आपल्यावर चालून येतो, असें पाहिल्यावर अबदाली व रोहिले यांनींहि उचल खाल्ली. पण भाऊच्या सैन्याच्या वाटेवर येऊन प्रत्यक्ष तोंड देण्याचें त्यांनीं टाळलें. इटावा ठाण्याला रोहिल्यांनीं वेढा दिला. त्याप्रमाणें अंतर्वेदींतील मराठयांच्या ठाण्यांनाहि त्यांनीं त्रास देण्यास आरंभ केला. रोहिल्याच्या फौजा जोरानीं चालून आल्या म्हणजे मराठे सैनिक कांहीं ठिकाणीं नुसत्या अवईनें पळून जातात, असें भाऊला समजलें. त्यावेळीं 'दुरील आवईनें ठाणीं टाकून पळून न जात ऐसे करणें, ठाणें टाकून पळतील त्याचें पारिपत्य उत्तम प्रकारें करावें.' असे कडक हुकूम भाऊनें आपल्या त्या त्या ठिकाणच्या ठाणेदारांना दिलेले होते. गंभीर नदी ओलांडल्यावर मथुरेपुढें यमुना नदी उतरून अबदालीवर तेथूनच जोराची चाल करावी, असें भाऊच्या मनांत एकदां आलें होतें. पण यमुनेला उतार मिळाला नाहीं व त्याच्या हुकुमाप्रमाणें नांवाही कोणी एकत्र करूं शकला नाहीं. त्यामुळें भाऊनें हा बेत सोडून आपला प्रथमचा दिल्ली घेऊन नंतर अबदालीस कोंडावें हा बेतच त्यानें ठाम केला. नावा एकत्र करण्याच्या

सूचना भाऊनें केवळ गोविंदपंतासच दिल्या होत्या असें नाहीं, यशवंतराव कोन्हेर व इतर त्या त्या ठिकाणच्या कमाविसदारांना त्यानें असेच हुकूम सोडले होते. पण ही तरतूद कोणीच करूं शकला नाहीं. म्हणून थांबून न राहतां मथुरेला पोंचण्यापूर्वींच भाऊनें आग्रा शहरावर हल्ला करून तें आपल्या ताब्यांत घेतलें व नंतर तो मथुरेवर आला. सुजाच्या बाबतींत भाऊनें जी योजना ठरविली होती, नेमकी तीच गोष्ट अबदालीनें केली. अलीगोहरला पातशाही दिली व सुजास त्याची वजीरी देऊं केली. त्यामुळें सुजा मराठ्यांना मिळणें अधिकच मुष्किल झालें. सुजाच्या आईचा व गोविंदपंताचा बराच घरोबा होता तेव्हां तिच्यामार्फतही सुजास चार समजुतीच्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न झाला; पण तोहि निष्फळ ठरला. यापुढें सुजा आपल्याला मिळत नाहीं, असें पाहिल्यावर त्याच्या मुलखांत धुमाकूळ उडवून द्यावा, असे हुकूम भाऊनें गोविंदपंत वगैरेंना दिले. भाऊनें आग्रा शहर काबीज केलें व तेथें फौजेबरोबर असलेलीं बायकामुलें ठेवण्याची व्यवस्था केली. नंतर भाऊनें मथुरेच्या बाजूनें दिल्लीकडे मोर्चा वळविला. महत्त्वाची गोष्ट अशी कीं, यमुनेच्या पलीकडच्या तीरावर अबदालीहि आपल्या फौजेनिशी तयारीनें चालूं लागला. या दोन्ही प्रचंड सैन्यांमध्यें यमुना दुथडी भरून चालली होती. दोन्ही सैन्यांना ती एकमेकास भिडूं देत नव्हती. यामुळें भाऊ व अबदाली या दोघांचाहि नाइलाज झाला होता.

सुजाउद्दौल्यानें शेवटीं आपलें वजन अबदालीकडेच टाकलें. सुजानें आपल्या आईचें ऐकलें नाहीं. पाताळयंत्री नजीबखानाच्या गोड थापांना व कारस्थानांना तो बळी पडला. सुजाला अबदालीनेंहि मोठ्या इमानानें वागविलें.

भाऊची फौज मथुरेवर आली. त्यावेळीं अधिक श्रावणमास पडला. समोरच्या तीरावर अबदाली आपल्या फौजेनिशीं होता. पण त्यामुळें अधिक मासाच्या यात्रेला कांहींच अडथळा येण्याचें कारण नव्हतें. दुथडी भरून चाललेल्या यमुनेनें भाऊच्या फौजेला निश्चिंत बनविलें होतें. यमुनेचें स्नान, दान, जप, पुरश्चरण, अनुष्ठान, भजन, कीर्तन, वगैरे सर्व कर्में मराठ्यांनीं भक्तिभावानें केलीं. मथुरावृंदावनांतील तीर्थांचें दर्शन व देवदर्शन केलें. याच ठिकाणीं सुरजमल जाट भाऊच्या भेटीस आला. शिंदे होळकरांच्या मध्यस्थीनें तो

आला होता. एक कोस सामोरा जाऊन भाऊनें त्याचा योग्य तो बहुमान केला. हत्ती, घोडे नजर देऊन त्याला आपलेंसें करून टाकलें. एकमेकास अंतर न देण्याबद्दल यमुनेच्या तीर्थानें उभयपक्षीं प्रतिज्ञाही झाल्या. सुरजमलनें आपली सर्व फौज पेशव्याच्या मदतीस देण्याचें ठरवून मराठ्यांच्या फौजेस रसद पोंचविण्याचीही त्यानें हमी घेतली. मथुरेस गेल्यावर यमुनेचा उतार मिळेना तेव्हां पूर्वींचाच दिल्ली काबीज करण्याचा बेत नक्की करण्यांत आला. आंबेपडदूर येथें उत्तरेंतील स्वारीवर कोणी जावें यासंबंधानें कडाक्याचे वाद झाले त्याचप्रमाणें या ठिकाणींही भाऊंनीं कोणतें धोरण स्वीकारावें याबद्दल खूपच वाटाघाटी झाल्या. भाऊंनीं याच्या पुढें जाऊं नये, येथें कायमचें ठाणें देऊन राहावें, अबदालीच्या पारिपत्याचें काम सरदारांनींच करावें. खाशा स्वाऱ्या या पुढच्या झटापटींत इरेला घालूं नयेत, असें कांहींचें मत होतें. पण या मतांत कांहींच अर्थ नव्हता. शिंदे-होळकरादि इकडल्या सरदारांत तेवढा नेट असता तर त्यांनीं अबदालीला इतकें सरसावूं दिलेंच नसतें. शिवाय गेलीं चार पांच वर्षें उत्तरेच्या बंदोबस्ताकरतां व निरनिराळ्या सरदारांमधून उत्पन्न झालेल्या कटकटी मिटविण्याकरतां खुद्द नानासाहेब किंवा त्याच्या खालोखाल भाऊसाहेबांनीं तरी इकडे यावें. अशा सारख्या मागण्या चालू होत्या आणि आतां प्रत्यक्ष भाऊसाहेब मातबर फौजेसह उत्तरेंत आल्यानंतर अमुक एका मर्यादेपर्यंतच त्यांनीं जावें, पुढें त्यांनीं सरूं नये अशा विचारसरणीला या वेळीं कांहींच किंमत नव्हती. आणखी महत्त्वाची एक गोष्ट या ठिकाणीं चर्चिली गेली व ती म्हणजे जनानखाना ग्वाल्हेरीसच ठेवावा, तो पुढें नेऊं नये ही होय. थोडासा विचार केला तर या सूचनेंत काहीं अर्थ होता. जनानखाना बरोबर असल्यामुळें दत्ताजीचा घात झाला अशी एक समजूत होती पण ती खोटी होती. दत्ताजीचें मरण जनानखानाजवळ असल्यामुळें ओढवलें नाहीं. त्याला दुसरीं बरींच महत्त्वाचीं कारणें होतीं. दत्ताजीला अगदीं एकाकी लढावें लागलें. सगळे रोहिले व अबदालीचे कडवे गिलचे यांना व तेंही नदीच्या तीरावर अगदीं अडचणीच्या जागीं, दत्ताजीला तोंड द्यावें लागलें. म्हणून दत्ताजीवर वाईट प्रसंग गुदरला. थोडीशी सवड मिळती तर दोन्ही चुलते पुतणे अबदालीच्या हातावर तुरी देऊन केव्हांच पसार झाले असते. जनानखाना जवळ

असण्याशीं दत्ताजीच्या वधाचा कांहींच संबंध नव्हता. दत्ताजीनें रूपराम कट्यारीबरोबर तो केव्हांच रणक्षेत्राबाहेर पोंचविला होता. भाऊसाहेबानें ही गोष्टही मान्य केली नसती असें नाहीं. पण भाऊबरोबर जनानखाना असा फारसा मोठा नव्हताच. अगदीं १०।५ बायकांचाच लहानसा असा हा जनानखाना होता, म्हणूनच भाऊनें ही गोष्ट मानली नाहीं.

मथुरेस यमुनेच्या तीरावर ठरल्याप्रमाणें दिल्लीचा कबजा घेण्याकरता बळवंतराव मेहेंदळे व शिंदे-होळकर २२ जुलई (१७६०) ला दिल्लीकडे रवाना झाले. मोगल बादशाहाची एका वेळची अत्यंत वैभवशाली दिल्ली, तिची आज काय दशा होती! अबदालीनें यावें, मराठे आसपास नाहींत असें पाहून तिचा कबजा घ्यावा. अबदालीनें दिल्लीकडे पाठ फिरवायची फुरसत कीं, मराठ्यांनीं तिला कबजांत घ्यावें, असें एक कीं दोन अनेक वेळां दिल्लीच्या बाबतींत झालें होतें. पण या खेपेस दिल्लीच्या या कबजाला थोडें जास्त महत्त्व होतें. कारण अबदाली नेहमींप्रमाणें आपली लुटालुटीची व मुलुखगिरीची हौस भागवून स्वदेशीं परत गेला नव्हता. मराठ्यांशीं दोन हात करण्याच्या ईर्षेनें तो हिंदुस्थानांत दिल्लीपासून शेंदीडशें मैलांच्या अंतरावर थांबून राहिला असतां त्याच्या समक्ष दिल्लीचा ताबा घेणें, हें जास्त महत्त्वाचें होतें. यमुनेनें अडथळा केल्यामुळें अंतर्वेदींतच अबदालीला गाडतां आलें नाहीं, हें पाहून भाऊची मराठी सेना दिल्लीकडे वळली व त्याच्या सरदारांनीं दिल्ली शहर फारशी झटापट न होतांच ताब्यांत घेतलें. किल्ला मात्र मराठ्यांच्या ताब्यांत आला नाहीं. दिल्लीस असलेल्या पठाणी सैन्यानें हा किल्ला लढविला. इब्राहीमखानानें खंदकावर मोर्चे कायम करून किल्ल्याच्या तटबंदीवर तोफांचा जोराचा मारा केला. किल्ल्याचे बुरुज धडाधड खालीं कोसळूं लागले. किल्ला लढविण्याच्या कामीं अबदालीचा वजीर शहावलीखान व त्याचा भाऊ याकूबखान आपल्या हाताखालील पठाणी सैन्यासह लढत होते. पण तोफखान्याच्या माऱ्यापुढें किल्ल्याची धडगत नाहीं, असें पाहिल्यावर त्यांनीं किल्ला खालीं करून दिला. किल्ला खालीं करून मिळाल्यावर मराठ्यांनीं याकुबअलीसह सर्व मुसलमान कुटुंबांना किल्ल्याबाहेर सुरक्षित जाऊं दिलें. मथुरेजवळ यमुनेच्या पैलतीरावर राहून अबदाली या सर्व घटना पाहत होता. दिल्लीच्या किल्ल्यांतून बाहेर पडलेली

मुसलमान कुटुंबें व त्याचे सरदार आगष्टच्या आरंभीं अबदालीस जाऊन मिळाले. अबदालीच्या डोळ्यांदेखत मराठयांनीं दिल्ली काबीज केली. या गोष्टीचा व्हावा तसाच परिणाम झाला. मराठयांच्या पराक्रमाची जाणीव मुसलमानांना या वेळीं तर विशेषच झाली. मराठयांच्या बंदोबस्ताकरतां अबदालीला हिंदुस्थानांत बोलावलें पण त्याच्या नाकावर टिच्चून तो येथें आसपास असतांनाच मराठयांनीं दिल्ली घेतली या गोष्टीनें या मोहिमेचें पारडें पालटण्याची वेळ आली. अबदालीला जाऊन मिळालेल्या मुसलमान सरदारांचीं मनें डळमळूं लागलीं. विशेषतः दोन्ही डगरींवर हात ठेवून राहणाऱ्या सुजाच्या मनाची त्रेधा उडाली. भाऊला या सर्व प्रकारची बित्तं-बातमी मिळत होती ' सुजाची उमेद अबदालीला कळली. दिल्ली घेतल्या-मुळें कमर तुटली. लढाई तर पाण्यावर अवलंबून आहे. तो फाटाफूट करणें ती करतो ' असें उमेदीचें पत्र भाऊनें गोविंदपंतास या सुमारास पाठ-विलें. मोहिमेवर निघाल्यापासून व विशेषतः अंतर्वेदीच्या भागांत प्रवेश केल्यापासून भाऊ आपल्या सरदारांना सारखीं पत्रें लिहीत होता. या पत्रां-तून त्या त्या ठिकाणच्या लष्करी परिस्थितीचें वर्णन असे, व पुढील हाल-चालीच्या सूचना असत. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येक पत्रांतून पैशांची मागणी केलेली असे. गोविंदपंत बुंदेल्याला पाठविलेल्या पत्रांत तर पैशाची विशेषच निकड भाऊ लावीत असे. आणि आश्चर्य हें कीं, पंतानें भाऊची ही मागणी कधींच पुरी केली नाहीं.

मराठ्यांनीं दिल्लीचा कबजा घेतला व त्या राजधानीवर सदाशिवरावभाऊनें खुद्द हिंदूपदपातशाहीचा झेंडा लावला. दिल्लीचा कबजा आजवर मराठयांनीं अनेकवार घेतला पण तिच्यावर मराठयांचा भगवा झेंडा कधींच लावला नव्हता. यापूर्वीं दिल्ली ज्या ज्या वेळीं मराठयांनीं ताब्यांत घेतली त्यावेळीं दिल्लीचा बादशहा तेथें होता. या वेळीं बादशाहा दिल्लींत नव्हता. अबदाली-सारख्या परक्या राजानें दिल्ली ताब्यांत घेतली होती व बंदोबस्ताकरतां त्यानें तेथें या वेळीं पठाणी सैन्य कायम ठेवलें होतें. यामुळें दिल्ली कबजांत घेणें याला एक विशेष अर्थ होता. देशी व परकीय मुसलमानांच्या ताब्यां-तून दिल्लीला सोडवून हिंदूपदपातशाहीच्या कबजांत तिला घेणें व त्या-बरोबर दिल्लीच्या बादशाही मुलुखावर हिंदुपदपातशाहीची सत्ता प्रस्थापित

करणें असाच या कृतीचा या वेळीं सरळ अर्थ होता. हिंदूंचें सार्वभौमत्व रसातळास पोंचविण्याकरतां आलेल्या अबदालीच्या देखत हिंदुस्थानांत गेलीं तीन चार शतकें मुसलमानी सार्वभौमत्व गाजविणारी दिल्ली आज भाऊंनीं ताब्यांत घेतली होती. मुसलमानी सार्वभौम बादशाहाच्या या दिल्लीचें वैभव भाऊनें फक्त कागदोपत्री वाचलें होतें. पण तें भाऊनें आतां प्रत्यक्ष पाहिलें. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर दिल्लीच्या वैभवाला उतरती कळा लागली होती. अनेक वेळां तिची हातपालट झाल्यामुळें तिचे नागरिक सर्वतोपरि गांजून गेले होते. तथापि एकादी वावटळीचे धक्के खाऊन बेजार झालेली वनश्री पुन्हां थोड्याच वेळांत हर्षानें फुलूं फळूं लागते. त्याप्रमाणें दिल्लीच्या राजधानींतील रस्ते नागरिकांच्या प्रफुल्ल चेहऱ्यांनीं खुलून दिसूं लागत व दिल्लींतील चांदणी चौकासारखे भाग आकाशांतील तारामंडळालाही लाजवीत. किल्ला हस्तगत झाल्यावर भाऊनें मोठ्या समारंभानें त्यांत प्रवेश केला. या वेळीं सोन्या चांदीच्या आभरणांनीं शृंगारलेल्या हत्तीच्या अंबारींत बसून विश्वासरावानें प्रथम दिल्लींत प्रवेश केला. आंत शिरल्याबरोबर तेथील सर्व मिळकत भाऊनें ताब्यांत घेतली. विश्वासराव, सदाशिवराव भाऊ, जनकोजी, मल्हारराव, इब्राहिमखान गारदी, समशेर बहाद्दर, यशवंतराव पवार वगैरे सर्व लहानथोर सरदारांनीं किल्ल्यांतील सर्व प्रेक्षणीय भाग पाहिला व आजच्या मोक्याच्या वेळीं दिल्ली कबजांत आल्याबद्दल त्यांना धन्यताही वाटली. सदाशिवराव ज्या उत्साहानें व हिंमतीनें आंबेण्डदुराहून निघाला त्या मोहिमेचा प्रारंभ अशा शुभदायक प्रसंगानें झाला हें पाहून सर्वांचीं मनें हर्षानें प्रफुल्ल झालीं. त्याचप्रमाणें दिल्ली काबीज करण्यांतील मर्महि त्यांच्या निदर्शनास येऊन त्यांच्या व त्यांच्याबरोबरच्या फौजेंतील सैनिकांच्या आत्मविश्वासांत भर पडली. दिवाण-इ खास मध्यें मोठ्या थाटाचा दरबार भरवून हिंदुपदपातशाहीचा प्रतिनिधी या नात्यानें विश्वासरावास सर्व सरदारदरकदारांनीं नजराणे दिले. उलट सर्व सरदारांचाही बहुमान विश्वासरावानें केला. नारो शंकर यास राजेबहाद्दर असा किताब देऊन दिल्लीच्या बंदोबस्तावर त्याची नेमणूक केली. पांच हजार फौज त्याच्या दिमतीस दिली. दिल्लींत मिळालेल्या लुटीनें भाऊनें सर्व फौजेला समृद्ध करून सोडलें. दक्षिणेंतून निघाल्यापासून

फौजेच्या अन्नसामग्रीचा व फौजेला लागणाऱ्या इतर जरूरीच्या सामानाचा पुरवठा करून देणारें स्थळ भाऊसाहेबाला पाहिजे होतें. त्यानें दिल्लीच्या या राजधानीचा या दृष्टीनें चांगला उपयोग करून घेतला. भरपूर अन्नसामग्री, भरपूर कपडे, भरपूर युद्धसाहित्य यांनीं सजलेला भाऊच्या फौजेंतील प्रत्येक सैनिक आत्मविश्वासानें अंतर्बाह्य ताजातवाना झाला.

दिल्लीची राजधानी ताब्यांत घेतली. तेथें दरबारही भरविला. विश्वासरावाला मुख्य स्थानीं बसवून त्याला नजरनजराणे देवविले. तरी दिल्लीचें मोगलशाही तक्त कायमचें बरबाद करावें अशी भाऊची केव्हांही इच्छा नव्हती. दिल्लीच्या बादशाहीचें रक्षण करण्याचा १७५० चा करार भाऊ विसरला नव्हता. आपल्या संरक्षणाकरतां पेशव्यानें लवकर आपल्या फौजेसह धावून यावें या खून झालेल्या अलमगीर बादशहाच्या फर्मानाप्रमाणेंच भाऊ जय्यत तयारीनिशीं हिंदुस्थानांत आला होता. राजधानी ताब्यांत घेतल्यावर बादशाही तक्तावर अलाहाबादेस जाऊन राहिलेल्या अलीगोहरला बसविण्याचा त्याचा बेत होता. त्याप्रमाणें आपला वकील शिवरामभट साठे यास त्यानें अलाहाबादेस अलीगोहरकडे पाठविलें होतें. पण गिलचे व मराठे यांच्या तंट्यांत सांपडलेल्या दिल्लीच्या बादशाही पदावर आरूढ व्हावयाचें अलीगोहरनें नाकारलें. या दोन प्रबल शक्तींची झुंज होऊन कांहीं तरी निकाल लागल्याशिवाय आपण दिल्लीस येणार नाहीं, असें त्यानें भाऊस कळविलें.बादशाहाच्या या विचारांतील मर्म भाऊनें पूर्णपणें ओळखलें. पण त्याबरोबरच अलीगोहरचा मुलगा जवानबख्त यास दिल्लीस आणून त्याला युवराज नेमण्याचा समारंभ भाऊनें केला. या योजनेनें भाऊनें किती तरी गोष्टी साधल्या. राजधानी काबीज केल्याबरोबर नजीबखानासारख्यांनीं मराठे बादशाही बुडवण्यास तयार झाले आहेत असा आरोप करून मराठ्यांबद्दल-द्वेषभावना पसरविण्याचा जो उद्योग आरंभला होता तो बंद पाडला. आपण अबदालीला जाऊन मिळालों ही आपण चूकच केली असें ज्या मुसलमान सरदारांना वाटूं लागलें होतें व जे चलचित्त झाले होते त्यांच्या मनांत भाऊनें पुन्हां विश्वास उत्पन्न केला, जयपूर, जोधपुराकडील जे रजपुत सरदार मध्यस्थ राहून मजा पाहत होते त्यांनाही आपण बापुडें असें राहून चालणार नाहीं. मराठ्यांच्या पक्षांत सामील होण्यांतच आपलें

हित आहे, अशा आपुलकीच्या भावना तिकडील सर्व लहानमोठ्या हिंदु संस्थानिकांच्या मनांत त्यानें निर्माण केल्या.

भाऊचा मुक्काम दिल्ली राजधानींत दोन महिने झाला. या मुक्कामांत शत्रुपक्षात फूट पाडून आपल्या पक्षांतील एकजूट साधण्याचा त्यानें आटोकाटीचा प्रयत्न केला. नदीस उतार नसल्यामुळें इकडे तिकडे हालचाल करणें शक्य नव्हतें तेव्हां त्याला या ठिकाणीं असें कुचंबून राहणें भागच पडलें होतें. पण त्याचाही उपयोग भाऊनें आपलें बळ सर्वतोपरि वाढेल इकडेच केला अबदालीकडे सुजा आहे, ही गोष्ट भाऊच्या डोळ्यांत सारखी सलत होती. दिल्लीच्या मुक्कामांत सुजाला फोडण्याच्या प्रयत्नाला त्यानें पुन्हां हात घातला. अस्थिर मनाच्या सुजाउद्दौल्याला मराठ्यांनीं दिल्ली घेतली हें पाहून अगदीं चैन पडेनासें झालें होतें. अबदालीला मिळाल्याबद्दल त्याला पश्चात्ताप वाटूं लागला होता. सुजाचा वकील भवानी शंकर भाऊकडे होताच. त्याच्यामार्फत या प्रश्नाला पुन्हां चालना देण्यांत आली. दिल्लीच्या सरशीमुळें हाफिज रहिमतखान व अहंमद बंगश यांचींही धाबीं दणाणलीं होतीं. तेहि चांगलेच डळमळले होते. मराठ्यांशीं वैर बांधून अबदालीसारख्या एका परक्या अफगाण सरदाराबरोबर आपण सख्य जोडलें हें बरें झालें नाहीं, असें त्यांनाही वाटूं लागलें होतें. तेव्हां या परिस्थितीचा फायदा घेण्याबद्दल भाऊनें गोविंदपंताकडे निकडीचीं पत्रें पाठविलीं. मराठे अशा रीतीनें चोहोंकडून आपल्याविरुद्ध रान उठवूं पाहत आहेत, असें पाहून खुद्द अबदालीच्याही आत्मविश्वासाला धक्का बसला व त्यानें तहाचें बोलणें सुरू केलें. हा मोका असा होता कीं, मराठे या वेळीं ज्या अटी पुढें करतील त्या मान्य करण्यास अबदाली तयार झाला असता. पण मराठ्यांची या वेळीं चलती होती. मराठ्यांना अबदालीशीं तह करावयाचा नव्हता. नजीबखान व अबदाली यांचा निःपात करून उत्तरेंतील या वारंवार उद्भवणाऱ्या अरिष्टांचा कायमचा निकाल लावण्याच्या इराद्यानें भाऊ दक्षिणेंतून निघाला होता. हिंमत हारवून बसलेल्या सरदारांच्या मदतीनें अबदाली आपलें कांहीं वांकडें करूं शकत नाहीं. त्याला कायमचा रगडून टाकण्याची हीच योग्य वेळ आहे, अशा भरभक्कम विश्वासानें भाऊनें या तहाच्या वाटाघाटींच्या

विनंतीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं व अबदालीला हतबल करण्याचे प्रयत्न तसेच जोरांत चालू ठेवले.

जिकडून बादशहाची वजीरी मिळेल तिकडे सुजाउद्दौला. भाऊनें सुजाची ही नाडी पूर्णपणें ओळखली होती. आपण अबदालीकडे असलों म्हणून काय झालें, आपलें अंतःकरण पेशव्याकडेच आहे, असें सुजाचें म्हणणें होतें. भाऊनें सुजाचें हें कपट ओळखलें होतें. तरी या समंधाला वजीरीचें अवदान देऊं करून त्याला या वेळीं ओशाळगत करून ठेवणें जरूरीचें आहे, असें ठरवून त्याला वजिरी देण्याचें आश्वासन भाऊनें दिलें. दिल्ली काबीज केली त्या वेळीं गाजीउद्दीन सुरजमल जाटाचे आश्रयास होता. गाजीउद्दीन प्रथमपासून मराठयांच्या पक्षाचा असल्यामुळें त्यास वजीरी द्यावी, अशी होळकर व जाट यांची शिफारस होती. पण भाऊला ही गोष्ट पटली नाहीं. सुजास वजीरी देऊं केल्यामुळें जाट नाराज होणार हें भाऊच्या ध्यानांत आलें होतें. पण सुजाला वजीरीचें अवदान देऊन तो अबदालीपासून फुटून निघाला तर एक मोठेंच काम होईल, अबदालीचें बळ चांगलेंच कमी होईल, जाटाची समजूत केव्हांही काढतां येईल, या विचारानेंच भाऊनें हा डाव टाकला होता. पण तो अखेर साधला नाहीं. कोणत्याच पक्षाला उघडपणें जाऊन मिळण्याचा सुजाचा विचार नव्हता. भाऊ ज्याप्रमाणें सुजाला आपलेकडे ओढूं पहात होता त्याप्रमाणें अबदालीही सुजास आपल्या पक्षांतच राखूं पहात होता. ‘अबदाली कोळजेश्वराहून सुजास भेटण्याकरतां अनुप शहरास गेला. बहुत शिष्टाचार अबदालीनें केला. दुसरे दिवशीं वजीरीचा शिरपाव देऊं लागला तेव्हा त्यानें विनंति केली. पातशहा कोण व मी वजीरी कोणाची करावी’, अशी सुजासंबंधाची हकीकत गोविंदपंतानें भाऊस कळविली. सुजाला फोडण्याचा भाऊचा प्रयत्न मात्र यशस्वी झाला नाहीं. नजीबखानाच्या मसलतीचा पगडाच सुजाच्या मनावर बसला. अबदालीनें त्याच्याबद्दल अगत्य दाखविल्यामुळें सुजा त्याच्याकडे चिकटून राहिला. अहमदखान बंगशाचीं पत्रें आम्हास आलीं कीं, ‘मी सर्वस्वी तुमचा आहे,’ असेंही पंतानें एका पत्रांत भाऊला कळविलें. पण हीं सर्व बोलणीं वरकरणी होतीं, असेंच शेवटीं भाऊला आढळून आलें.

' अबदालीची फौज दिल्ली घेतल्यामुळें फार घाबरी झाली. रोहिले फार करून गेले व जाणार. नजीबखान मात्र हिंमत दाखवितो. सुजाउद्दौला जाऊन फसले आहेत. पुरतेंच त्याचें पारिपत्य होईल. ' या पंताच्या पत्राला भाऊनें पुढील आशयाचें उत्तर पाठविलें ' तुम्ही कनोजकडे रोहिल्याच्या मुलखांत गंगातीरीं येऊन पार उतरावयाची आवई घालणें आणि तुम्ही गंगातीरीं राहणें म्हणजे त्यास पायबंद लागेल आणि जे दुदिले झाले आहेत ते यास सोडून जातील ' भाऊ व पंत यांच्यांतील ही पत्रापत्री फारच उद्बोधक आहे. अंतर्वेदीच्या भागांत गोविंदपंतच मुख्यतः असल्यामुळें अबदालीची फौज त्रस्त होईल, अशा हालचाली करण्यासंबंधाचीं भाऊचीं पत्रें गोविंद-पंताला येत असत. पंताला भाऊच्या या सूचना अंमलांत आणणें शक्य होत नव्हतें व त्यांतल्या त्यांत प्रत्येक पत्रांत पैशाची मागणी केली असल्या-मुळें तर तो फारच बेजार झाला होता. भाऊच्या लक्षांत या सर्व गोष्टी आल्या होत्या पण असें केल्याशिवाय दुसरें गत्यंतर तरी काय होतें? एकंदरींत मराठयांची ही मोक्याची बाजू अत्यंत लंगडी होती व त्याचे परिणामही मराठी फौजेला अखेरपर्यंत भोगावे लागले.

मराठयांनीं दिल्ली काबीज केली तेव्हांपासून उभयपक्षांत तहाच्या वाटा-घाटीच्या निमित्तानें आपापल्या बलाची मजबुती वाढविण्याचा प्रयत्न चालू होता. सुजाउद्दौला मराठयांना मिळाला नाहीं. तो अबदालीकडेच शेवटीं गेला. पण अबदालीचें समाधान तेवढ्यानें झालें नाहीं. अस्थिर मनाचा सुजा आपल्याला केव्हां दगा देईल, याची अबदालीला सारखी भीति होतीच. मराठयां-च्या फौजा व अबदालीच्या फौजा दोन अडीच महिने जागच्या जागीं कुचंबून पडल्या होत्या. लाखांनीं मोजतां येण्याजोग्या या फौजांचा खर्च इतके दिवस चालवीत रहाणें, उभय पक्षांना दिवसेंदिवस मुष्किलीचें होत चाललें होतें. नजीबखानामार्फत सुजानें अबदालीचा पक्ष स्वीकारल्यावर अबदालीनें त्याच्याजवळ फौजेचा खर्च भागविण्याकरतां पैशाची मागणी केली. सुजानें अर्थात् ती मान्य केली नाहीं. अबदालीच्या फौजेची या वेळची परिस्थिति कशी होती व अबदालीचें व सुजाचें कसें बिनसत चाललें होतें याची कल्पना येण्यास भाऊसाहेबांकडे या प्रसंगीं गेलेल्या पंताच्या पत्रांतील पुढील मजकुरच

वाचला पाहिजे.* ' चार रोजाखालीं सुजाउद्दौला अबदालीजवळ गेले. अब्दालीनें त्याजला सांगितलें. तुम्ही मातबर. दोन करोड रुपायाचा मुलुख तुम्हाखाले. मी हैराण. मजवर शिपायांची तलब चढली. याची तजवीज करून देणें. हें ऐकून सुजास खेद जाले. शहावली खानाकडे गेले कीं, तुमचे इमानावर आलो. आतां हें काय ? वजीर शहावलीखान बोलला, तुम्ही लुच्च्यांचे सांगीवरून आला. आम्ही तुम्हांस इमान पावविलें नाहीं. नदी उतरून तुम्हावर कोण येत होता ? जसे आला तसे शहास राजी करा. त्याजवर फजीत होऊन डेरां आले. नजीबखानानें अबदालीस सांगितलें, मी सुजास घेऊन आलों आतां रुपये घेणें तेव्हां सोडणें. हें वर्तमान ऐकून सुजा व नजीबखान यांस विघाड झाला. एक करोड रुपये सुजाजवळ मागतात, हें वर्तमान घनसुंदरदासानें लिहिलें आहे. सुजानें धनसुंदरदासास कळविलें. मजला नजीबखानानें फसविलें. श्री. भाऊसाहेबांनीं, सरदारांनीं, गोविंदपंतांनीं व माझे आईनीं सर्वांनीं सांगितलें कीं, तुम्ही न जाणें त्यांचें न ऐकोन या कुंटणाचे बोलास आलो, फजीत पावलो. अबदालीचे लष्करी गडबड झाली, सर्व लहानथोर मराठयांशीं सलूख करून आपले देशास जावयाचा मनसुबा करतात. लढाईची हिंमत त्यांत राहिली नाहीं. दहा हजार घोडे उंट खेचर अनुप शहरीं मेले. नित्य मरतात. स्वामीचें दैव थोर उत्तमच होईल.' पंतांच्या या पत्रांतील थोडी अतिशयोक्ति बाजूला ठेवली तर अबदाली या वेळीं किती पेंचांत आला होता व तो ज्यांच्या मदतीवर मराठयांशीं दोन हात करूं पाहात होता. ते लोक काय किंमतीचे होते व त्यांची मदत किती ठिसूळ पायावर उभी होती याची कल्पना आल्याशिवाय राहत नाहीं. अशा परिस्थितींत अबदाली तहाकरतां उत्सुक झाला असल्यास त्यांत कांहींच नवल नव्हतें. या सुमारास परस्परांचे वकील परस्परांकडे जात होते व तहाचीं बोलणीं जोरांत सुरू झालीं होतीं. सुजाकडून पैसा मिळेना व फौजेचा खर्च तर वाढत चालला. अबदालीनें सुजावर मोरेकरी घातले. गोडीगुलाबीनें भागत नाहीं. असें पाहून त्यानें हा वाममार्गही पतकरला. पण त्याचा कांहींसुद्धां उपयोग न

*म. रि. म. वि. ३ पा. १५९ ( रा. १–२४६ )

होतां, उलट, सुजा जास्तच बिथरला. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, इतकें सर्व झालें तरी उघडपणें अबदालीचा पक्ष सोडून मराठयांस येऊन मिळण्याची सुजाची छाति झाली नाहीं. नजीबखान व अबदाली दोघेही एकदिल होते. यावेळीं सुजानें कांहीं गडबड केली असती तर प्रत्यक्ष अंतर्वेदींत म्हणजे जवळजवळ सुजाच्या मुलखांतच येऊन ठाकलेल्या अबदालीनें नजीबखानाच्या मदतीनें सुजाची चांदीच उडविली असती. इकडे तहाच्या वाटाघाटी चालूच होत्या. सुजाच्या मध्यस्थीनेंच या वाटाघाटी चालू होत्या. भाऊचा वकील भवानीशंकर सुजाकडे व सुजाचा वकील देवीदत्त व त्याच्या जोडीला काशीराय भाऊकडे येऊन तहाच्या बोलण्या चालू होत्या. या वाटाघाटीच्या बाबतींत भाऊचें म्हणणें काय होतें व कोणत्या अटीवर ह्या बोलण्या चालू होत्या हें समजण्यास भाऊचें स्वदस्तुरचें पत्र फारच उपयुक्त आहे. १६ सप्टेंबर १७६० चें हें पत्र आहे.

"चि. घोंडो मल्हार यासी सदाशिव चिमणाजी आशीर्वाद इकडील वर्तमान तरी फौज सरदार सुद्धां दिल्लींत आलों. किल्ला घेऊन आत सरकारचा बंदोबस्त केला. सुज्याउद्दौले व नजीबखान वगैरे रोहिलेसुद्धा अबदाली यमुनेपलीकडे येऊन मुक्काम करून राहिले आहेत. नदीत पाणी फार. सुज्याउद्दौला नजीबखान यांचे विचारें सलुखाचा पैगाम लागला. त्यांचे मने सरंदेची हद्द अबदालीची करून द्यावी. पातशाही बंदोबस्त आपले हवाली करावा. वजिरी सुज्याउद्दौले मागतात. बक्षीगिरी नजीबखान मागतो. नदीमुळें उभयता सैन्याचा मोकाबला होत नाहीं. तो पैगामही आहे. आमचे मतें अटकेची हद्द पातशाही बंदोबस्त सर्वांचे पूर्ववतप्रमाणें राखून चालवावे. याप्रमाणें सलूखाचे करावे. त्यांत कांहीं आमचे जाहालियाशिवाय तह होत नाहीं. बोलतां चालतां होईल तें पाहूं. केवळ आमच्याच चित्तानुरूप घडणें अगर त्याचे चित्तानुरूप होणें, हें कसें होईल? यास्तव जसें बनेल तसें करावें लागेल. होईल तें लिहून पाठवूं. नदीपायाब जहालिया लढाई प्राप्त होईल. सरदार दोघेही बहुत साफ आहेत. कारभारी यांस तो संतोषच आहे. सर्व पेंच पोटाचा. बाहेरील कजियामुळें न मिळे कर्ज. सावकारी बंद. दोनही फौजा व॥ हरदू सरदारांची फौज मोडल्यामुळें त्याची सलाबत आहे. यंदाचें येणें व बाहेरील मसलत भारीच आहे. सर्व आशी-

वांदें करून परिणामास जाईल. लढाई न पडतां सर्व प्रेत्न, आबरू राहून होईल ते करूं. मेवटीं नेटानें सर्व येकत्र जमून लढाई करूं. ईश्वर बरेंच करील. आपलें वर्तमान शरीराचें वगैरे लिहिणें. म्हणजे सर्व मनसबे उत्तम येविशीं वर्तमान लिहीत जाणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.'

अबदालीच्या मुलखाची हद्द सरहिंदपर्यंत मानण्यांत यावी, पातशाही बंदोबस्त त्याच्याकडे द्यावा, सुजाला वजीरी द्यावी व नजीबखानाला बक्षीगिरी द्यावी. अबदालीच्या पक्षाकडून तहाच्या या अटी पुढें आल्या होत्या. अबदालीच्या मुलखाची हद्द अटकेपर्यंत व पातशाही बंदोबस्ताचे बाबतींत सर्वांचे अधिकार लक्षांत घेऊन पूर्वीप्रमाणें सर्व कांहीं चालवावें. बाबरच्या वेळेपासून काबूल कंदाहारापर्यंत मोंगलांचा बादशाही अंमल चालत होता. नादिरशहानें वरील सर्व मुलूख बळकावला. नादिरशहानंतर गादीवर आलेला अबदाली पंजाबच्याहि पुढें जाऊन सरहिंद प्रांतावर आपला हक्क सांगूं लागला इतकेंच नव्हे तर पातशाही बंदोबस्तहि आपल्याच हातीं द्यावा, अशी मागणी करूं लागला. तडजोड या दृष्टीनें अटकेपर्यंतची हद्द कबूल करून काबुल कंदाहारचा मुलुख अबदालीनें ठेवावा, ही गोष्ट भाऊच्या पक्षातर्फे मान्य करण्यांत आली. भाऊच्या वरील पत्राप्रमाणें आणखीहि देघाण देवाण करण्यास मराठ्यांचा पक्ष तयार होता, असें दिसतें. पण या तहाच्या वाटाघाटींतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं.

इकडे तहाच्या वाटाघाटी चालू असतांना मराठ्यांना बदनाम करून दिल्लीकडील मुसलमानांना व हिंदूंनाहि आपल्याकडे फोडण्याचा नजीबखानाचा प्रयत्न चालूच होता. भाऊसाहेबानें विश्वासरावाला बादशाही सिंहासनावर बसविलें. दिल्लीची बादशाही नष्ट करण्याचा मराठ्यांचा विचार आहे, अशा अफवा तो पसरवीत होताच. त्यांतच भाऊनें दिवाण इ आमचें ( बादशाहाच्या दिवाणखान्याचें ) चांदीचें छत फोडलें व त्याचे रुपये पाडले, या गोष्टीचीहि भर घालून पेशव्याच्या पक्षाला आणखी अप्रिय करण्याचा उद्योग तो करूं लागला. नादिरशहानें दिल्लीच्या बादशाहाचें खुद्द सिंहासनच उखडून काढून तें अफगाणिस्थानला नेलें त्यापेक्षां हें भाऊसाहेबाचें करणें फारसें दोषास्पद होत, अशांतला अर्थ नव्हता. किल्ल्यांत शिरल्यानंतर तेथील सर्वच जडजवाहिर भाऊनें आपल्या ताब्यांत घेतलें त्याचप्रमाणें आपल्या

बरोबर असलेल्या फौजेचा खर्च चालविण्याकरतां या मौल्यवान छताचाही त्यानें उपयोग केला. छताचा पत्रा चांगला बोटभर जाडीचा होता व त्यावर सोन्याच्या नकशीचें काम केलें होतें. त्याचे कुल रुपये तीन लाख झाले, असें मराठी बखरकार म्हणतात तर मुसलमानी पक्षाचें म्हणणें कीं, ते सतरा लाख झाले. छताचे रुपये किती पडले हा मुद्दा गौण. छत फोडल्यामुळें पातशाहीची अप्रतिष्ठा झाली, हाच मुद्दा पुढें करण्यांत आला. पातशाहीची अप्रतिष्ठा करावयाची व ती नष्ट करावयाची असा मराठ्यांचा इरादा असता तर यापूर्वीं असे किती तरी प्रसंग आले होते कीं, त्यावेळीं त्यांनीं आपला हा इरादा केव्हांच पूर्ण केला असता. बादशाही राखावयाची, तिची प्रतिष्ठा कायम ठेवायची हा तर शाहू महाराजांपासून मराठयांचा दंडक होता. एकाद्या गोष्टीला महत्त्वच द्यावयाचें असें ठरविलें म्हणजे त्या पक्षालाही कांहीं लोक मिळतात त्यापैकींच हाही एक प्रश्न होता. छत फोडल्यामुळें सुरजमल जाट रागावला व तो पेशव्याला सोडून गेला, असाही प्रवाद पसरविण्यांत आला. सुरजमलचा याकरतां भाऊवर राग झालेला नव्हता. जाटाला बादशाहाची वजीरी पाहिजे होती व तशी कबूली भाऊनें द्यावी असें त्याचें म्हणणें होतें. तहाच्या वाटाघाटीच्या व इतर गडबडीच्या वेळीं तसें आश्वासन देण्याचें भाऊनें तूर्त नाकारलें असल्यास त्यांत कांहींच गैर नव्हतें. सुरजमल जाट या वेळीं नाराज झाला होता तरी त्यानें मराठयांविरुद्ध शत्रुत्व केलें नाहीं. प्रत्यक्ष युद्धांत मात्र त्यानें मराठयांचा पक्ष घेतला नाहीं व इतर दृष्टींनेंही त्यानें मराठयांना फारशी मदत केली नाहीं, असें पुढें आढळून आलें.

दिल्लीच्या मुक्कामाला अडीच महिने होऊन गेले. तहाच्या वाटाघाटींतूनही कांहीं निष्पन्न होत नाहीं असें पाहून अबदालीला वठणीवर आणण्याच्या मार्गाला भाऊ लागला. भाऊचा पक्ष या वेळीं सर्व बाजूंनीं वरचढ होता, फौजेची जय्यत तयारी इब्राहिमखानाच्या हाताखालचा तोफखाना; एकदिलानें सहाय्य करण्यास तयार असलेले नामांकित सरदार, अन्नसामुग्रीची भरपूर तरतूद झाल्यामुळें संतुष्ट असलेली फौज, अशा अनुकूल परिस्थितींत अबदालीला अडचणींत गांठून त्यास रगडून काढण्याचें भाऊनें ठरविलें. दत्ताजीच्या वधाचा सूड घेण्याचा व मराठयांची उत्तरेंतील इभ्रत व दरारा कायम ठेवण्याचा हा

एकच मार्ग होता. अबदालीला आपल्या परिस्थितीची जाणीव झाली होती व योग्य तडजोडीला तो तयार झाल्यास त्यास स्वदेशीं जाऊं देण्यासही भाऊ तयार होता. भाऊ जसा शूर, आग्रही तसा दिलदारही होता.

अबदालीला रगडून काढायचा तर दोन मार्ग शिल्लक होते. पहिला मार्ग असा कीं, गोविंदपंत बुंदेल्यानें अबदालीच्या छावणीवर जोराचे हल्ले चढवून त्याला तेथून हुसकून दिल्लीच्या बाजूला सरकण्यास भाग पाडावयाचें व तेथें भाऊनें त्याचा समाचार घ्यायचा. पण गोविंदपंतांकडून ही कामगिरी होईल अशी भाऊची खात्री नव्हती. तेव्हां दुसरा मार्ग म्हणजे दिल्लीहून कुंजपुऱ्यापर्यंत जाऊन त्या बाजूनें सहराणपुरावरून त्याजवर चढाई करून त्यास मागें रेटीत रगडून काढणें हा होय. पुष्कळ विचाराअंतीं व सर्व सरदारांच्या मतानें हाच मार्ग शेवटीं भाऊनें पसंत केला. सर्व प्रकारची परिस्थिति अनकूल असतां एकादी मोक्याची हालचाल करून शत्रूला जेरीला आणणें यांतच खऱ्या सेनानायकाचें युद्धचातुर्य व्यक्त होत असतें. दोन अडीच महिने यमुनेला उतार मिळाला नाहीं व आणखी किती दिवस ती अशी तुडुंब वाहत राहणार, याचा नेम नाहीं असें पाहून दिल्लीपासून थोडें वर सरकावें व तेथून पूर्वेकडून आपलें सैन्य आणून अबदालीचा उत्तरेकडील मार्ग रोखावा व त्याला मध्यें चेपून टाकावा, हा या हालचालींतील मुख्य इरादा होता. सर्व लहान मोठ्या सरदारांशीं वाटाघाट करून हा चढाईचा मार्ग भाऊनें स्वीकारला होता. भाऊनें स्वीकारलेला हा चढाईचा मार्ग धाडसाचा होता, यांत शंकाच नाहीं. आग्र्यापासून ते कुंजपुऱ्यापर्यंत जवळ जवळ दोनशें मैलांचा नदीकिनारा संभाळून ज्या ज्या ठिकाणीं उतार मिळण्याचा यत्किंचितही संभव आहे त्या त्या ठिकाणीं जबरदस्त चौक्या बसवून कुंजपुऱ्यावरून खालीं उतरून अबदालीवर झडप घालावयाची असा हा डाव होता. यमुना भरून चालली आहे, तिला कोठें उतार नाहीं. तेव्हां अबदालीला अंतर्वेदीच्या कोंडींतून बाहेर पडावयाचें असल्यास कुंजपुऱ्याकडेसच यावें लागेल तोंपर्यंत आम्ही त्याजवर चढाई करून येतच आहों, अशी ही उत्कृष्ट व परिणामकारक योजना होती. या योजनेंत एकच दोष होता व तो म्हणजे आग्र्यापासून कुंजपुऱ्यापर्यंतच्या दोनशें मैलांच्या नदीप्रवाहांत कोठेंच उतार

मिळायचा नाहीं व अबदाली यमुना उतरून पश्चिमेकडे येणार नाहीं असा भरंवसा भाऊला व त्याच्या सरदारांना वाटत होता. उलटपक्षीं ठिकाठिकाणीं चौक्या बसवून कोठें उतार मिळालाच तर त्याचा फायदा अबदालीला घेतां येऊं नये, अशीहि तजवीज करण्यांत आली होती. त्याचप्रमाणें अबदाली ज्या भागांत छावणी करून राहिला होता त्यांत सारखा धुमाकुळ उठवून त्याला तेथें चैन पडूं द्यावयाचें नाहीं, अशीही योजना भाऊनें केली होती व तशीं सारखीं पत्रें गोविंदपंत बुंदेल्याला तो लिहीत होता. सर्व सरदारांच्या मतानें सांगोपांग विचार करून कुंजपुऱ्यास जाण्याचें ठरलें त्यावेळीं भाऊनें आपली योजना पंताला विस्तृतपणें कळविली. 'आम्ही कुंजपुऱ्याकडे गेलों. अबदाली इकडेच कुच करून आलिया उत्तमच झालें. दिल्लीकडील मुलूख मार्ग मोकळा राहील. लढाई इकडेच पडेल. कदाचित् ते इकडे न येतां तिकडे तुमचे रोखे जाईल तरी बरेंच आहे. आम्ही पाठीवरी यमुना उतरून अंतर्वेदींतून पारिपत्य करूं. तुम्ही तिकडे सत्वर जाऊन पोंचणें. केवळ छोटया मोठ्या कामास गुंतून न राहणें. गनीमी मेहनत करून रोहिले व सुजा यांचे प्रांतांत धामधूम होई असें करणें. तिकडे आला तरी पाणी आहे, तो आहे. चार रोजांत कुंज-पुऱ्याचें पारिपत्य करून सारंगपुराकडे उतरून नजीबखानाचे जिल्हे लावून पुढें अबदालीचे पाठीवर येऊं. महिनाभर फौज उतरायाजोगें पाणी होत नाहीं. अबदाली तिकडे आला तर उत्तम न आलिया फिरोन घेऊं.' कुंज-पुऱ्याच्या चढाईचा डाव असा होता. मात्र या चढाईवर निघाल्यावर दिल्लीकडील आपल्या संबंधाचा गैरसमज नाहींसा करण्याकरतां अलीगोहरच्या मुलाचा युवराजपदाचा समारंभ त्यानें अप्पाजी जाधव व नाना पुरंदरे यांना मुद्दाम परत पाठवून उरकून घेतला व अलीगोहरच्या नांवाचा शिक्का तयार करून तो चालू करण्यास हुकूम दिला. कुंजपुरा घेण्यांत उत्तरेकडील दळण-वळण तोडून टाकणें व स्वदेशाकडे जाण्याचा त्याचा मार्ग बंद करणें हा उद्देश होताच. कुंजपुऱ्यावर चाल करून जातांना आघाडीला शिंदे, होळकर व विठ्ठल शिवदेव होते. पिछाडीस दमाजी गायकवाड होते व मध्यें तोफ-खाना व भाऊ आपल्या खास फौजेसह होते. दमाजी गायकवाडाला त्याच्या

पथकासह पिछाडीस ठेवून राखीव फौजेप्रमाणें त्याचा उपयोग करण्याचें धोरण कुंजपुऱ्यापासूनच दिसून येत होतें.

मराठयांच्या फौजा कुंजपुऱ्याच्या रोखें वळल्या, हें समजल्याबरोबर अबदालीची पांचावर धारण बसली. कुंजपुरा मराठयांनीं काबीज केला कीं, स्वदेशाकडे जाण्याचा मार्ग खुंटून आपली गठडी येथल्या येथेंच वळणार असें पाहून तो गडबडून गेला. त्यानें कुंजपुऱ्यांतील आपला सरदार अबदुल समदखान याला पत्रें पाठवून मदत येईपर्यंत दोन तीन दिवस नेटानें टिकाव धरून राहा, असें कळविलें. मराठयांनीं त्याचीं हीं पत्रें पकडलीं व अबदालीची हालचाल सुरू होण्यापूर्वींच कुंजपुरा घेण्याची लगट केली. एका बाजूनें इब्राहिमखानाच्या तोफांचा मारा व बाकीच्या तीन बाजूंवर फौजेच्या तीन निवडक टोळ्या पाठवून जोराचा हल्ला चढविण्यांत आला. दमाजी गायकवाडानें या वेळीं मोठया शर्थेची चढाई केली. तोफांनीं पाडलेल्या भगदाडांतून त्यानें बेलाशक घोडे घातले. शिंद्याचा हुरूप तर अवर्णनीय होता. दत्ताजीच्या वधाचा सूड घेण्याची ही पहिली संधी त्यांना मिळाली होती. त्यानेंही मोठया निकरानें चढाई केली. अशा प्रकारच्या एकजुटीच्या हल्ल्यापुढें कुंजपुरा किती वेळ दम धरणार? शहर व किल्ला ताबडतोब हस्तगत झाला. अबदुल समदखान व कुतुबशहा या दोघांसही दमाजीच्या शिपायांनीं जिवंत पकडलें व भाऊसाहेबांच्या पथकाच्या स्वाधीन केलें. दत्ताजी घायाळ होऊन व आसन्नमरण होऊन शुक्रतालाच्या भूमीवर पडला असतांना कुतुबशहानें त्याच्या जखमी झालेल्या देहाला लाथेनें ठोकर मारली व त्याचें शीर स्वतःच चरचरा कापून नेलें, ही बखरकारानें वर्णिलेली हकीकत खरी असती तर या वधाचा सूड घेण्यास जनकोजी तयार असावयास पाहिजे होता पण तसें नव्हतें व होळकरही सूड घेण्याच्या मताचा नव्हता. या दोन्ही सरदारांना मारूं नये असा शिंदेहोळकरांचा आग्रह असतां भाऊनें त्यांचा शिरच्छेद करविला असा भाऊवर आरोप करण्यांत आला आहे. वास्तविक हकीकत याच्या उलट असावयास पाहिजे. मुसलमानांच्या संबंधानें भाऊचें अंतःकरण निष्ठुर व क्रूर असतें तर दिल्लीचा कबजा त्यानें घेतला तेव्हांच तें व्यक्त झालें असतें. दिल्लीचा कबजा एकदांच काय पण यापूर्वीं कितीदां तरी पेशव्यांनीं घेतला. कबजा घेतल्यावर पेशव्यांच्या फौजेनें

लुटालूट केली असेल. पण नागरिकांची सर्रास कत्तल किंवा स्त्रियांवर अत्याचार करून किंवा त्यांना पकडून आपल्या लष्करांत आणणें व त्यांना आपल्याबरोबर स्वदेशात नेणें, असल आसुरी प्रकार मराठ्यानीं कधींच केले नाहींत. अबदालीच्या सैन्यास दहशत बसवायची होती तर या दोघांचाच तेवढा शिरच्छेद कां, कुंजपुऱ्यांत जेवढे मुसलमान हातीं लागले त्या सर्वांची सर्रास कत्तल भाऊनें केली असती.

या बाबतींत असाही एक संभव आहे. नजीबखानाचा फडशा करायचा रघुनाथरावाचा विचार होता. मल्हाररावांनीं त्याला आपला धर्मपुत्र बनविलें. मल्हाररावाचा हा धर्मपुत्रच अबदालीला आणण्यास व पुढच्या पानिपतच्या अनर्थास कारणीभूत झाला. नजीबखानाला राखून ठेवण्यांत मल्हारबाचें एक विशिष्ट धोरण होतें. उत्तरेकडे पेशव्यांना शह देण्याकरतां नजीबखानासारखा मुसलमान सरदार मल्हारबाला पाहिजे होता. नजीबखानाचा निकाल लावण्याबद्दल रघुनाथरावाचा दत्ताजी व जनकोजीला स्पष्ट हुकूम असतांही या दोन्ही शिंद्यांच्या मनांत भलभलत्या गोष्टी भरवून नजीबखानाला मल्हारबानें सुरक्षित राखलें होतें. नजीबखानाला जीवंत ठेवण्यांत ज्या कारणाकरतां शिंदे होळकरांचें एकमत झालें होतें त्याच कारणाकरतां कुतुबशहाला व अबदुल समदखानालाहि राखून ठेवावें असें तर शिंदे होळकरांचें मत नसेल ! आणि खरोखरीच भाऊला या कार-वाईचा वास आला असेल तर त्यानें या दोघांचा शिरच्छेद आपल्या समक्ष करविला हेंच योग्य झालें असेंच म्हणावें लागेल. अबदुल समदखान रघुनाथ-रावाच्या हातीं सांपडला असतां दंड घेऊन त्याला जीवंत सोडला होता. तसा प्रकार या प्रसंगीं करणें तर शक्यच नव्हतें. अबदालीचे हे दोन कर्तबगार सरदार हातीं सांपडले असतां त्यांचें सामर्थ्य कमी करण्याचे दृष्टीनें त्यांचा निकाल लावणें भाऊला योग्य वाटलें व तेंच युद्धरीतीला धरून होतें. भाऊनें या दोघांचा शिरच्छेद करविला. इतर कोणालाहि तसदी दिली नाहीं. कुंजपुऱ्याच्या लुटींत पुष्कळ सामान मिळालें. खजिन्यांत पंधरा लाख रुपये मिळाले. या लुटींत दत्ताजीचा जव्हेरगंज हत्ती पुन्हा शिंद्यांना मिळाला. कुतुबशहानें शुक्रतालच्या लढाईच्या वेळीं तो आपल्याकडे नेला होता. मराठ्यांनीं दिल्ली काबीज केली त्यापेक्षांहि कुंजपुरा त्यांच्या हस्तगत झाला

ही या मोहिमेंतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट होती. भाऊनें हा डाव सिद्धीस नेऊन त्याच्या ठिकाणीं सेनाकर्त्याचे सर्व गुण वास करीत आहेत असें सर्वांच्या निदर्शनास आणून दिलें. कुंजपुरा हस्तगत झाला तो दिवस दसऱ्याचा होता ( १९ ऑक्टोबर १७६० ). मराठ्यांनीं हा विजयादशमीचा सण मोठ्या उत्साहानें साजरा केला. दिल्लीच्या मुक्कामानंतर मराठी फौजेला पुन्हा या ठिकाणीं मुबलक लूट मिळाली. लष्करास दाणादुणा मिळाला. अन्नसामुग्रीची व युद्धसामुग्रीची लयलूट झाल्यामुळें फौजेच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. या ठिकाणीं विजयादशमीचा दरबार भरविण्यांत आला. विश्वासरावास सर्वांनीं नजराणे दिले. विजयोत्सवानिमित्त तोफा उडविण्यांत आल्या. कुंजपुरा घेतल्यावर आतां पूर्वेकडे वळून अबदालीला चिमट्यांत धरून त्याची चटणी उडविण्यास कितीसा वेळ असें मराठ्यांना वाटूं लागलें. आणि या चढाईच्या उपक्रमाचा विचार करतां तें यथार्थही होतें.

अबदालीला या सर्व हकीकती कळल्या, त्या वेळीं त्याच्या अंगाचा तिळपापड झाला असल्यास नवल नाहीं. त्याचे दोन सरदार मारले गेले यामुळें तो चिडला होता. पण त्यापेक्षांही मराठे आतां आपल्यावर चालून येऊन आपला फडशा उडवितात या खात्रीमुळें पिसाळलेल्या वाघाप्रमाणें या पेंचांतून बाहेर पडण्याकरतां त्यानें आपल्या जोराच्या हालचाली सुरू केल्या. या वेळीं थेट मराठ्यांवरच चालून गेलें तर आपली धडगत नाहीं. कारण भाऊनें याकरतांच हा सर्व डाव रचला होता. यांतून सुटून जाण्याचा एकच मार्ग अबदालीपुढें होता. यमुनेला कोठें तरी उतार पाहून व अंतर्वेदीच्या बेळक्यांतून बाहेर पडून उलट मराठ्यांच्या पिछाडीवर जातां आलें तर आपला बचाव होतो हें त्यानें पूर्णपणें जाणलें. उतार पाहण्याकरतां त्यानें आपले लोक चोहोंकडे पाठविले. यमुनेला या दिवसांत कोठेंच उतार मिळणें शक्य नव्हतें. शिवाय ज्या ठिकाणीं उतार मिळविण्याचा थोडासुद्धां संभव त्या ठिकाणीं भाऊनें आपल्या भरभक्कम चौक्या बसविल्या होत्या हेंही त्यानें जाणलें होतें. तथापि तो कच्च्या दिलाचा माणूस नव्हता. भगीरथ प्रयत्नी होता. व त्याप्रमाणें बागपतावर उतार मिळण्याचा संभव आहे असें त्याला आढळून आल्याबरोबर आपलें सर्व बळ त्यानें त्या ठिकाणीं खर्ची

घातलें. बागपतासमोर छातीइतक्या पाण्याचा गचक्या उतार त्याला मिळाला. चांदीच्या पत्र्यावर कुराणांतील वाक्यें लिहून ते यमुनेंत सोडले व आपल्याला या ठिकाणीं उतार येऊन आपल्याला वांचविण्याबद्दल त्यानें खुदाची प्रार्थना केली. रामनामाच्या सीमेंटाचा आधार घेऊन वानर मंडळींनीं सेतुबंधन केलें नाहीं का ? त्याचप्रमाणें अबदालीच्या मदतीला त्याचा खुदा धांवत आला. तंग सोडलेला घोडा पाण्यांत घालून तो स्वतः यमुनेच्या पलीकडे जाण्याकरतां निघाला. गचक्या उतारांत व भर प्रवाहांत अशा रीतीनें यमुनेसारखी मोठी नदी उतरून जाण्याचा प्रयत्न करणें, हें खरोखरीच अचाट व असामान्य धाडसाचें कृत्य होतें. आपला हा सेनापति याप्रमाणें पुढें झालेला पाहिल्यावर कोणता मायेचा पूत मागें राहील ? या अलौकिक धाडसाचा अवलंब करून स्वतः त्यानें परतीर गांठलाच व आपल्या बरोबर हजारों वीर त्यानें परतीरावर आणले. पाण्यामध्यें हत्तींची ओळच ओळ उभी करून लढाईतील जड सामान त्यानें पलीकडे आणलें या धाडसांत त्याचे हजारों शिपायी मृत्युमुखीं पडले, पण त्याची त्यानें पर्वा केली नाहीं. इतर ठिकाणांप्रमाणें बागपतावरही भाऊनें आपली चौकी बसविली होती पण तळहातावर प्राण घेऊन धाडसानें नदींत घालून घेणाऱ्या या हजारों मुसलमान शिपायांपुढें या चौकींतील शिपायांचा निभाव लागणें कसें शक्य होतें! चौकीचे शिपाई अबदालीचा व त्याच्या पठाणी शिपायांचा आवेश पाहून केव्हांच पळून गेले होते. अबदालीनें आपल्या भोंवती जमा केलेली प्रचंड फौज व तिच्या जवळचें सामान पलीकडे न्यावयाचें हें चुटकीसरसें होणारें काम नव्हतें. चार दिवसपर्यंत अहोरात्र हें काम चालू होतें. नदीच्या पैलतीरावर अबदालीनें आपल्या फौजेची गणति केली. या धाडसांत आपण किती लोक गमावून बसलों हें या वेळीं पाहाणें जरूरीचें होतें. हजारों शिपायी यमुनेनें वाहून नेले तरी त्यानें जी गणति केली तींत त्याला आपली स्वतःची २४ हजार स्वार व वीस हजार पायदळ, रोहिले सरदारांचें सर्व सैन्य मिळून तीस हजार व सुजाउद्दौल्याचे तीस हजार अशी एक लाखावर फौज शिल्लक राहिलेली त्याला आढळून आली. भाऊसाहेबानें कुंजपुऱ्यावर चाल केली व तो हस्तगत केला. अबदालीवरील या मोहिमेंत भाऊनें हा अपूर्व डाव रचला त्याचप्रमाणें तोडीस तोड म्हणून अबदाली बागपतावर नदी उतरून

पलीकडे आला हा डाव सुद्धां युद्धकौशल्याच्या दृष्टीनें अतिशय परिणामकारक व अगदीं अनपेक्षित असा होता. नदीला उतार मिळणार नाहीं व आपण कुंजपुऱ्याहून परत फिरून अबदालीला रगडून काढूं, हें धोरण आतां सपशेल फसलें. अबदाली अंतर्वेदींतून बाहेर पडला. एक लाख फौजेसह तो आपल्याच पिछाडीवर आला. कुंजपुऱ्यावर जाऊन त्याचा स्वदेशीं जाण्याचा मार्ग अडविला गेला होता. आतां अगदीं उलट झालें. बागपतावर नदी उतरून पलीकडे आल्याबरोबर अबदालीची फौज आतां बरोबर भाऊच्या पिछाडीवर आली व त्यानेंच आतां मराठ्यांच्या फौजेची दक्षिणेकडील वाट अडविली. कुंजपुऱ्याहून अबदालीच्या सैन्याच्या रोखानें आपली फौज नेत असतां भाऊला ही अद्‌भुत बातमी समजली. ही बातमी समजल्याबरोबर झपाट्यानें आपल्या फौजेची दिशा बदलून बागपतावर अबदाली स्थिरस्थावर होतो न होतो इतक्यांत त्याच्यावर चालून जावयाचें धोरण न आंखतां अबदाली आपल्या पिछाडीवर येऊन ठेपला त्याची पर्वा न करतां त्याला त्याच ठिकाणीं डांबून ठेवून हैराण करण्याचा नवीन डाव भाऊनें व त्याच्या सरदारांनीं रचला. दोन वाकबगार सेनापती प्रसंग पडेल त्याप्रमाणें आपल्या धोरणांत व डावपेचांत बदल करीत असतात. अशा वेळीं अमक्यानें अमकें केलें असतें तर तमकें झालें असतें असला तर्क लढविण्यांत कांहींच अर्थ नसतो. भाऊला या मोहिमेंत शेवटीं अपयश आलें तेव्हां भाऊ अमक्या अमक्या प्रसंगीं अमक्या अमक्या चुका करीत गेला असें म्हणण्यांतही अर्थ नाहीं. कुंजपुरा हस्तगत झाला त्या वेळची मराठ्यांची सर्व प्रकारची तयारी व त्यांच्याजवळ असलेली भरपूर साधनसामग्री व त्या बरोबरच फौजेच्या व सैनिकांच्या मनांतून वावरत असलेला भरपूर उत्साह या सर्व गोष्टी लक्षांत घेतां भाऊनें आपल्या सर्व सरदारांच्या सल्ल्यानें जें धोरण यापुढें ठरविलें तेंच बरोबर होतें. या ऐन मोक्याच्या प्रसंगी ज्या सल्लामसलती झाल्या त्यावेळीं मल्हारबांनीं आपली एक मसलत सुचविली होती. गनीमी काव्याचा अवलंब करून अबदालीला या वेळीं सळो का पळो करून सोडावें असा मल्हारबाचा या वेळचा सल्ला होता. पण ही मसलत कोणासच मान्य झाली नाहीं व दत्ताजीच्या वधानंतर अबदालीनें शिंदे होळकरांची जी त्रेधा उडविली होती ती सर्वांच्याच लक्षांत होती.

गनीमी काव्याच्या बाबतींत अबदालीचे पठाणही कांहीं कमी नव्हते. मराठयांच्या गनीमी काव्याला ते पुरून उरतात आणि मराठयांचा हा गनीमी कावा म्हणजे शेवटीं पळापळीचा मामला ठरतो. ही गोष्ट अबदालीच्या बाबतींत तरी खरी ठरली होती. शिवाय भाऊ एवढें प्रचंड सैन्य व इब्राहिमखान गारदीचा प्रचंड तोफखाना घेऊन दक्षिणेंतून निघाला त्यावेळींच या गनीमी काव्याच्या धोरणाला त्यानें रजा दिली होती. तोफखान्याच्या जोरावर व आपल्या बरोबरच्या प्रचंड फौजेच्या धडाक्यावर अबदालीला जेरीस आणण्याच्या इराद्यानेंच त्यानें आजपर्यंच्या हालचाली चालविल्या होत्या. अबदाली बागपतावर नदीपार होऊन आला ही सर्वांनाच आश्चर्यचकित करून सोडणारी बातमी कळतांच कुंजपुऱ्यावर या प्रश्नासंबंधानें ज्या वेळीं पुन्हा जोराची चर्चा झाली त्यावेळीं इब्राहिमखान गारद्यानें दिलेल्या सल्ल्याचाच स्वीकार करण्यांत आला.

अबदाली बागपतावर उतरून आपण होऊन पुढें आल्याबद्दल भाऊला एक प्रकारें इष्टापत्तीच वाटली. कुंजपुऱ्याहून आपली प्रचंड सेना हलवून बागपताच्या रोखें तो गणोरापर्यंत चालून आला व याच ठिकाणीं पानिपत पाठीशीं घालून इब्राहिमखानाच्या सल्ल्याप्रमाणें सर्व फौज एकत्र आणून मोठया बंदोबस्तानें तो राहिला. या छावणीची योजना इब्राहिमखानानें सिद्ध केली होती. पानिपत गांव मध्यें घेऊन सर्व फौजेभोंवतीं ५० हात रुंद व १२ हात खोल असा खंदक खणण्यांत आला होता व ठिकठिकाणीं प्रचंड मातीचे ढीग घालून मोर्चे बांधण्यांत आले होते. त्याच्या पश्चिमेस बागपत सोनपताजवळ अबदालीनें आपली छावणी दिली होती. भाऊची छावणी पूर्वाभिमुख व अबदालीची पश्चिमाभिमुख अशा या दोन्ही छावण्या एकमेकांसमोर तळ देऊन राहिल्या. 'अबदालीची व आमची गांठ पानिपताजवळ पडली आहे. तोफखान्याचा अराबा रचून लढाई करावयास तयारी केली आहे. त्याच्यानें इकडे तिकडे जाववत नाहीं व कांहीं करवत नाहीं. दीड पावणे दोन कोसांची तफावत आहे.' असें भाऊनें पंतास यावेळीं कळविलें. ता. ४ नोव्हेंबर १७६० चें हें पत्र आहे. या पत्रांत आतांपर्यंतच्या सर्व पत्रांप्रमाणें पैसे पाठविण्यासंबंधानें व अबदालीची रसद लुटण्यासंबंधानें भाऊनें पंतास सूचना दिल्या होत्या.

सोनपत पानपताजवळ सदाशिवरावभाऊ व अबदाली आपल्या प्रचंड फौजा बरोबर घेऊन एकमेकांसमोर दीड पावणेदोन कोसाच्या अंतरानें छावण्या देऊन राहिले होते. कुंजपुऱ्यावरून अंतर्वेदींत जाऊन अबदालीला चिमट्यांत धरून रगडून मारायचा डाव हुकल्याबरोबर त्याला आतां उपासमार करून जेरीस आणायचा नवीन डाव भाऊनें रचला होता. या दोन्हीही नामांकित सेनानींनीं फौजेभोंवती तोफांचा गोल बांधून एकमेकांसमोर कटून राहण्याची व्यवस्था केली होती. अबदालीचा स्वदेशीं जाण्याचा मार्ग भाऊनें रोखून धरला होता. त्याला इकडून तिकडे हालतां न येईल अशा रीतीनें त्याचे सर्व मार्ग रोखले होते हें खरें आहे. पण अबदालीची उपासमार करण्याचा भाऊचा इरादा व्हावा तितका फलद्रूप झाला नाहीं. गोविंदपंत बुंदेल्याच्या प्रयत्नानें अबदालीच्या सैन्याची रसद मारून काढण्यांत आली होती. ' यामुळें पीठ शेर, चणे चार शेर व तूप अर्धा शेर' याप्रमाणें अबदालीच्या छावणींत महागाई झाली होती व भाऊच्या छावणींत 'गहू सोळा शेर, चणे बारा शेर व तूप अडीच शेर अशी स्वस्ताई होती' असेच आणखी कांहीं दिवस गेल्यास अबदालीला या परिस्थितींतून मार्ग काढण्याकरतां मराठ्यांवर चाल करून जावें लागेल. तसें झाल्यास त्याचा पुरा निःपात होईल, अबदाली असाच स्वस्थ राहिला तर मराठे त्याच्यावर चालून त्याचा फडशा उडवतील अशी कल्पना होती. अबदालीही कसलेला सेनानी होता. पण दीडदोन कोसांवर असून तो स्वस्थ बसला आहे हें पाहून सुद्धां मराठी फौजेचा उत्साह वाढत्या प्रमाणावर होता यांत शंकाच नाहीं. पण ही परिस्थिति फार दिवस टिकली नाहीं. अबदाली ज्या बाजूनें यमुना उतरून आला तेथून रसद मिळविण्याची त्यानें तजवीज केली व तिकडील पठाण रोहिले लहानमोठ्या सरदारांनीं त्याला ही सामुग्री मिळवून देण्याच्या कामीं मदतही केली. अबदालीची रसद तोडण्याचें व त्याबरोबरच शक्य त्या उपायांनीं आजूबाजूस लुटालूट करून व कांहीं प्रसंगीं आपला हक्काचा वसूल जमा करून तो भाऊसाहेबाकडे पाठविण्याचें काम गोविंदपंत नेटानें करीत होता. या बाबतींत गोपाळराव गणेशाची तेवढीच त्याला मदत होती. पंतानें भाऊच्या पत्रांतील सूचनांप्रमाणें आपल्या हातून होईल तेवढें भाऊच्या फौजेचा पाठपुरावा करण्याचें काम चालविलें होतें. त्यानें उगाच कोठें तरी वेळ

घालविला व कुचराई केली असें म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. अबदालीला अंतर्वेदींतले व त्या बाजूचे इतर लहानमोठे मुसलमान सरदार कंबर कसून मदत करीत होते तर याच भागांतील रजपूत व जाट विशेषतः रजपूत सरदार भाऊचा पाठपुरावा न करतां केवळ मजा पाहात राहिले होते. तथापि भाऊच्या फौजेची हिंमत जोरावरच होती.

दोन सेनानींच्या दोन प्रचंड फौजा एकमेकांसमोर छावणी देऊन राहिल्या असतां उभयतांतर्फे कांहींच कटकट न होतां त्या तशाच स्वस्थ राहणें कधींच शक्य नव्हतें. रोजच्या रोज कांहीं ना कांहीं निमित्तानें उभय छावणींतून तोफांची गोळागोळी चालू होती. रोज सकाळीं मराठयांच्या छावणींतून सैनिकांच्या लहानमोठया झुंडी बाहेर पडायच्या व आजूबाजूच्या प्रदेशांत संचार करून त्यांनीं लूट मिळवावयाची व संधी सांपडेल तेथें अबदालीच्या छावणीची रसद मारायची हा प्रकार चालू होता. ता. १ नोवेंबरच्या सुमारास या दोन्ही फौजांचा तळ पडला. पण प्रत्यक्ष एकमेकांवर चालून जाऊन लढाईचा प्रसंग आणण्यास कोणीच तयार नव्हते. चढाई करण्यास भाऊ तर मुळींच तयार नव्हता. पहिली आगळिक अबदालीनें करावी व मग त्याचा आपण समाचार घ्यावा असें भाऊनें या बाबतींतलें धोरण नक्की केलें होतें. आपल्या फौजेला रसद मिळेल व आपल्याला या भागांत कांहीं दिवस निभावून नेतां येतील असें अबदालीस वाटत होतें तथापि मराठयाकडली भरपूर अन्नसामुग्री व युद्धसामुग्री व त्यांची वाढती हिंमत पाहून अबदालीला आपल्यातर्फें अगदीं स्वस्थ बसून राहणें शक्य झालें नाहीं. या उभय फौजेंतील पहिली चकमक ता. १५ नोवेंबरला उडाली. जनकोजी शिंद्यांचीं पथकें छावणीच्या ज्या बाजूला होतीं त्या बाजूवर रोहिल्यांनीं एकाएकीं हल्ला चढविला. या दिवशीं जनकोजीनें प्रथम अबदालीच्या रोहिल्यांच्या तुकडीवर हल्ला चढविला. बळवंतराव मेहेंदळयाच्या चुरशीनें त्यानें चढाई केली व भाऊनें हुकूम केला असतांही मेहेंदळे त्याच्या मदतीस गेला नाहीं असें कांहींचें म्हणणें आहे. पण त्यांत अर्थ दिसत नाहीं. मराठे सरदारांत आपसांत चुरस होती, एकोपा नव्हता; भाऊचा एक पक्ष होता व मल्हारबा वगैरेंचा एक पक्ष होता व त्यामुळें मराठयांची ताकद कमी झालेली होती, असें प्रतिपादणाऱ्या बखरकारांचें हें म्हणणें आहे.

मराठे सरदारांत थोडीबहुत चुरस असेल पण भाऊनें ठरविलेल्या धोरणाविरुद्ध वागण्यापर्यंत या चुरशीची मजल खात्रीनें पोंचली नव्हती. जनकोजीनें चढाई करून आलेल्या या रोहिल्यांचा चांगलाच समाचार घेतला, रोहिल्यांचे शेंकडो स्वार या चकमकींत कामास आले. हजारों पायदळ शिपाई शिंद्यानें कापून काढले. त्याच्या तोफा हिसकावून घेतल्या व त्यांचा पाठलाग करून त्यांना परत गोटांत घातलें. रात्र झाल्यामुळें ही लढाई थांबली. पण शिंद्याच्या विजयामुळें अबदालीच्या सैन्याची हिंमत खचली. आपणास यापुढें निभावून जाण्याची शक्यता नाहीं, असें वाटून अबदालीनें आपली बायकामुलें मारून पळून जाण्याची तयारी केली अशाही बातम्या येऊं लागल्या. मराठे सैनिकांची कसोटी पाहण्याकरतां म्हणून अबदालीनें हा एक लहानसा डाव रचला होता. मराठे ऐन वेळीं कच खातात व पळायला लागतात ही गोष्ट त्यानें बऱ्याच वेळां पाहून ठेवली होती. म्हणून मराठ्यांच्या छावणीवर एकाएकीं हल्ला चढवून मराठ्यांना भेदरून सोडण्याचा त्यानें प्रयत्न केला पण तो त्याच्याच अंगाशीं आला. गनिमी कावा करण्यांत तरजेब असणारे व प्रसंगीं अवसानघात करून पळूनही जाणारे मराठे एके ठिकाणीं चिकटून राहून शत्रूशीं दोन हात करूं शकतात, हें अबदालीला या वेळीं दिसून आल्यामुळें त्याच्या मनानें हाय खाल्ली व त्याचाच परिणाम म्हणून या जनकोजीच्या विजयानंतर पुढें पंधरा दिवस अबदालीच्या फौजेनें मुळींसुद्धां हालचाल केली नाहीं. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे गोविंदपंतानें अगदीं शिकस्तीचे प्रयत्न करून अबदालीची बहुतेक रसद याच वेळीं बंद पाडली होती. अशा रीतीनें सर्वतोपरि खालावलेल्या परिस्थितींत आपल्या फौजेची हिंमत वाढविण्याकरतां अबदालीनें पुन्हा आणखी चढाईचा प्रयत्न केला. अमावास्येचा हा दिवस होता. अंधार पडल्यावर मराठे सैनिकांचा चांगला समाचार घेतां येईल या उद्देशानेंही याच दिवशीं कांहीं निवडक अफगाण व रोहिल्यांच्या तुकड्या मराठ्यांच्या छावणीच्या मध्यभागावर म्हणजे ऐन हुजुरातीच्या फौजेवर त्यानें पाठविल्या. हुजुरातीच्या निवडक फौजेबरोबर बळवंतराव मेहेंदळ्यानें या अफगाणांच्या तुकड्यांवर मोठ्या निकरानें चाल केली. या चकमकीला सायंकाळीं तोंड लागलें. उभयपक्षीं तोफांचाही मारा सुरू झाला. पण

या प्रसंगीं मराठ्यांच्या तोफखान्यानें द्यावें तसें काम दिलें नाहीं. मराठी फौज कच खाऊन मागें सरकूं लागली. पण मेहेंदळ्यांनें या वेळीं प्रसंगावधान राखून आपल्या फौजेला परत फिरविलें व सर्वांच्या पुढें होऊन ' हर-हर महादेव ' ची गर्जना करून गिलच्यांवर निकराचा हल्ला चढविला. बळवंतराव मेहेंदळ्याचें हें अचाट साहस व शौर्य पाहून शत्रुपक्षाचे लोकही चकित झाले. गिलच्यांच्या फौजेची तिरपिट उडाली. पण या हातघाईंत बळवंतरावास गोळी लागली. तो घायाळ झाला. त्याचें शिर कापून घेण्याकरतां कांहीं गिलचे लोक धांवले असतां अकलूजच्या खंडेराव नाइक निंबाळकरानें त्याच्या प्रेतावर पडून तें शत्रूच्या हातीं लागूं दिलें नाहीं; इतकें झालें तरी मराठ्यांची फौज कचरली नाहीं. या गडबडींत गिलच्यांची फौज अगदीं खंदकाजवळ आलेली पाहून शिंदे होळकरांनीं आपल्या तुकड्या मदतीस पाठवून गिलच्यांच्या फौजेचा धुव्वा उडविला. या झटापटींत दोन तीन हजार पठाणांची मराठ्यांनीं कत्तल उडविली व त्यांना पुन्हां अबदालीच्या गोटांत हुसकून लावलें. अबदालीनें केलेल्या या दुसऱ्या चढाईंत त्याला यश आलें नाहीं खरें. पण मराठ्यांकडला एक शूर सरदार धारातीर्थीं पतन पावल्यामुळें मराठ्यांच्या छावणींत निरुत्साहाचें व शोकाचें वातावरण पसरलें. बळवंतराव मेहेंदळे ऐन तारुण्याच्या भरांत स्वामिकार्यांत बळी पडला. त्याची पत्नी त्याच्या प्रेताबरोबर सती गेली.

पंधरा दिवसांच्या अंतरानें अबदालीनें आपणहून मराठ्यांच्या छावणीवर हल्ले करून पाहिले. पण या दोन्ही हल्ल्यांत त्याला यश आलें नाहीं. जवळ जवळ महिना होत आला. मराठ्यांचें बळ वाढत्या प्रमाणावर होतें व त्यांची हिंमतही वाढतच होती. आणि त्याच्या उलट आपली फौज नामोहरम व निरुत्साह होत चाललेली त्याला दिसत होतें. या सर्व परिस्थितीचें एक मोठें कारण त्याच्या आतां पूर्ण लक्षांत आलें होतें. " जोंपर्यंत गोविंदपंत बुंदेले आपल्या साथीदारांच्या मदतीनें आपली रसद हाणून पाडीत आहे व प्रसंगवशात् मराठ्यांना रसद व खजीना पोंचवीत आहे तोंपर्यंत किती ही दिवस झाले तरी मराठे जेरीस येत नाहींत व आपली फौज मात्र सारखी असंतुष्ट होत चालली आहे, हें त्यानें जाणलें होतें. याकरतां त्यानें आत गोविंदपंताचाच कांटा काढण्याचें ठरविलें. भाऊंनीं गोविंदपंताला पत्रावर

पत्रें पाठवून ज्या अनेक सूचना दिल्या त्याच्या दशांशानेंही गोविंदपंताकडून काम होत नव्हतें खरें. पण मल्हारबा होळकरांइतकाच वृद्ध झालेला हा ब्राह्मण सरदार भाऊच्या आज्ञा अंमलांत आणण्याचा कसून प्रयत्न करीत होता व तो अबदालीला जाचक झाला होता म्हणूनच गोविंदपंतांची ही ब्याद नाहींशी करण्याकरतां आपला वजीर शहावल्लीखान याचा पुतण्या अताईखान यास शिकारीचें निमित्त करून दहा हजार निवडक फौजेनिशीं अबदालीनें गुप्तपणें गोविंदपंतावर हल्ला करण्यासाठीं पाठविलें. पंत यावेळीं यमुनेपलीकडे होता. बागपताकडून अबदालीकडे जाणारी रसद हाणून पाडण्याकरतां तो या भागांत वावरत होता. अताईखानानें मोठ्या झपाट्यानें तीन चार प्रहरांत पंचवीस कोसांची मजल मारून संध्याकाळच्या सुमारास गाजीउद्दीन नगराजवळ त्यानें गोविंदपंतास गांठलें. अताईखानानें यावेळीं एका कपटयोजनेचा अवलंब केला होता. होळकराचें बांड्या रंगाचें निशाण घेऊन ही गिलच्यांची फौज गोविंदपंतावर चालून गेली. गोविंदपंताला ही शत्रुसेना नसून आपलेच लोक आहेत, असें वाटून तो गाफिल राहिला. जवळ येतांच गिलच्यांनीं पंताच्या शिपायांची एकदम कापाकापी करण्यास सुरुवात केली. गिलच्याचें सैन्य किती आहे याचा अदमासही पंताला लागला नाहीं. त्यांतल्या त्यांत चपळाई करून पंतांनीं आपल्या मुलांसह घोड्यावरून पळ काढला. पण या भरधांव दौडींत पंत घोड्यावरून खालीं पडले. गिलचे मागें होतेच. त्यांनीं या वृद्ध सरदारावर झडप घालून त्याचें शिर कापून घेऊन आपल्या विजयोत्सवाचें चिन्ह म्हणून अबदालीकडे सादर केलें. अबदालीनें हा एक मोठाच विजय मिळविला होता. पंतांच्या मृत्यूमुळें बागपताकडला रसद मिळण्याचा त्याचा मार्ग निर्धास्त झाला. त्यानें दुसरे दिवशीं पंताचें हें शिर भाऊंना खिजविण्याकरतां त्याच्याकडे पाठवून दिलें. भाऊनें हा आघात एकाद्या शूर व दिलदार खेळगड्याप्रमाणें सहन केला व आपल्या चित्ताची स्वस्थता यत्किंचितही ढळूं दिली नाहीं. पंताच्या मुलास सांत्वनपर पत्र पाठवून बुंदेलखंडांतलि त्याच्या जाहागिरीची व्यवस्था शोक आवरून दक्षतेनें ठेवण्याबद्दल लिहिलें. अबदालीनें मराठ्यांकडला अगदीं नेमका मनुष्य या वेळीं उचलला होता. त्यामुळें अबदालीच्या छावणींतील निराशेचें वातावरण नाहींसें होऊन तेथें आशेचे व उत्साहाचे वारे वाहूं लागले.

बळवंतराव मेहेंदळे पडल्यानंतर मराठयांवर हा दुसरा आघात झाला. मेहेंदळे पडल्यानंतर मराठ्यांच्या फौजेनें गिलच्यांवर प्रतिहल्ला चढवून त्यांच्यांतील शेंकडों लोक कापून काढून त्यांना पूर्णपणें पराभूत केलें होतें. पण या आघातांत त्यांचा एक गोविंदपंतासारखा सरदार गमावला व त्या-बरोबरच त्यांचा दक्षिणेकडला एक मोठा आधार तुटला. गोविंदपंताचा निकाल लावल्याबरोबर अबदालीनें मराठयांच्या छावणीकडे जाणारे सर्व रस्ते रोखले. पंताच्या मरणानंतर अबदाली असे कांहीं तरी प्रयत्न करणार, हें भाऊ जाणून होता. त्यानें रोज सकाळीं लहानमोठया ज्या टोळया रसद मिळ-विण्याकरतां बाहेर पडत त्यांच्याबरोबर पांच सातशें स्वारांच्या टोळ्याही तो पाठवूं लागला. त्याचप्रमाणें लमाणांच्या तांडेवाल्यांना बोलावून आणून जे कोणी अबदालीचे पाहारे चुकवून रसद आणून पोंचवीत त्यांना बक्षिसें देऊन त्यांचा तो सन्मान करी. भाऊची छावणी पानिपतच्या भागांत होती तिच्या पश्चिमेकडची बाजू मोकळी होती. पण त्या बाजूला दाट जंगल पसरल्यामुळें या प्रदेशाचा त्याला कांहीं उपयोग होण्यासारखा नव्हता. पण पंताच्या मृत्यू-नंतर भाऊनें व त्याच्या सरदारांनीं कितीहि प्रयत्न केले तरी फौजेला रसद मिळण्याचे मार्ग खुंटतच चालले. पानिपत गांव छावणींतच गणलें जात होतें तेव्हां त्या गांवांतील सर्व कांहीं मराठी फौजेच्या भक्ष्यस्थानीं पडलें होतें व त्याचप्रमाणें आजूबाजूच्या पांच पन्नास मैलांतील टापूंत जें कांहीं हातीं लागलें तें हस्तगत करून मराठयांनीं हा प्रदेश उजाड करून टाकला होता. अबदालीच्या छावणीवरही कांहीं वेळा हल्ले करून त्यांनीं रसद मार-ण्यास कमी केलें नव्हतें. खजीना पाठवाल तो दिल्लीला पाठवावा असें भाऊ नेहमी पंताला लिहीत असे. पंताला गिलच्यानीं गिळून टाकला त्या वेळीं ५० लाख रुपये दिल्लीच्या खजिन्यांत पडून आहेत, असें भाऊंना कळलें पण हे पैसे पानिपतला आणायचे कसे ? हे पैसे आणायची पूर्वींची व्यवस्था आतां अबदालीनें मोडून टाकली होती. अशा प्रसंगीं भाऊनें आपल्या बरोबरचें सर्व चांदी सोन्याचें सामान काढून फौजेंत त्यानें नवीन टांकसाळ उभी केली. या नाण्यावर बादशाही शिक्का कायम ठेवला होता व मागच्या बाजूला भाऊशाही, जनकूशाही व मल्हारशाहीचा निर्देश करणाऱ्या भा. ज. म. अशा अक्षरांचा ठसा उमटविला होता. छावणींतले भावही आतां पूर्वी-

सारखे राहिले नव्हते. धान्याचा भाव रुपयाला अडीच शेरापर्यंत येऊन ठेपला. वरील नाणें किती दिवस टिकून राहाणार? पंधरा तीन वारांत हें नाणेंही खलास झालें. या दिवसांत दोन्ही फौजांची कुचंबणाच चालली होती. अबदालीस थोडीबहुत रसद मिळत होती. दोघांचाही बाहेर पडण्याचा मार्ग अडून राहिला होता. जोराचा हल्ला चढवून या कोंडींतून फुटून बाहेर पडण्याची ताकद दोघांतही उरली नव्हती. एवढें धाडस कशाकरता करावयाचें हा प्रश्नही अबदालीपुढें होताच. हिंदुस्थानांत त्याला पठाणशाही स्थापावयाची नव्हती, नजीबखान वारंवार आडवा आला म्हणून तहाच्या वाटाघाटी फिसकटत होत्या. तह होऊन अबदाली निघून गेल्यावर मराठे आपला चांगलाच कांटा काढतील अशी भीति त्याला वाटत होती. तहाच्या वाटाघाटीला पुन्हां एकदां या सुमारास सुरुवात झाली पण त्या तग धरूं शकल्या नाहींत. दोन्ही पक्षात आतां तग धरून कोण राहातो किंवा कोण दम सोडून हतवीर्य होतो याचीच वाट दोन्ही पक्ष पहात होते. अशा परिस्थितींत मराठी फौजेची हिंमत आणखी थोडी खचेल असा एक प्रसंग घडून आला. दिल्लींत असलेल्या आपल्या खजीन्यापैकीं कांहीं रक्कम छावणींत पोंचविण्यासंबंधानें भाऊचीं निकडीचीं पत्रें पाराजीपंत वाघ यास व गोविंद पंताच्या मुलास गेलीं या दोघांनींही अत्यंत धाडस करून हा खजीना मराठी छावणींत आणून पोंचविण्याचें ठरविलें. पाराजीपंतानें तीनशें निवडक स्वार बरोबर घेतले प्रत्येकाजवळ पांचशें रुपयांची थैली आपल्या जिनांत दिली होती. या थैलीवाल्या स्वारांच्या संरक्षणाकरतां आणखी पांचशें स्वार त्यानें बरोबर घेतले. आणि या बहाद्दर व धाडसी स्वारांसह त्यांनीं मोठ्या झपाट्यानें दिल्लीहून मराठ्यांच्या पानिपतच्या छावणीकडे धांव घेतली. पण रात्रीच्या वेळीं वाट चुकून अबदालीच्या छावणींत ते शिरले. आपण कोणाच्या छावणींत आलों याची कांहीं कल्पना नसल्यामुळें मराठे स्वार शेकोट्या पेटवून शेकत बसले. अबदालीच्या स्वारांना या गोष्टीचा सुगावा लागतांच त्यांनीं या स्वारांच्या तुकडीवर एकाएकीं हल्ला चढवून कापाकापीस सुरुवात केली. कांहीं मराठे स्वार यांतूनही निसटून गेले. या खजीन्यापैकीं कांहीं थोडा भाग त्यांनीं मराठयांच्या छावणींत पोंचवला पण पुष्कळसा खजिना गिलच्यांच्या हातीं लागला. पाराशर दाजी वाघाचें या गडबडींत काय झालें

त्याचा पत्ता लागला नाहीं. पैसे तर मिळाले नाहींत व मराठे स्वार मात्र कत्तल झाले. अशा परिस्थितींतही भाऊनें मोठया धैर्यानें आणखी कांहीं मार्ग काढण्याचा प्रयत्न केला. या वेळीं युक्तिप्रयुक्तीनें आजवर तटस्थ असलेल्या रजपुतांकडूनही त्यानें कांहीं मदत मिळविली. दक्षिणेंत नानासाहेबाकडे तर त्याचीं पत्रें चालूच होतीं. अबदालीनें मराठयांच्या छावणीभोंवतालच्या सर्वच वाटा रोखल्या होत्या तेव्हां या छावणींतून पत्रें घेऊन जाणारे जासूदही त्याच्या पहारेकऱ्यांनीं पाडाव करणें शक्य होतें. पण सर्व पत्रें घेऊन जाणारे शत्रूच्या हातीं सांपडले असें दिसत नाहीं. या परिस्थितीसंबंधाचीं कांहीं पत्रें नानासाहेबाला पोंचलीं असलींच पाहिजेत. असें असूनही नानासाहेब त्वरेनें स्वत: उत्तरेंत आला नाहीं किंवा दुसऱ्या कोणा सरदाराला त्यानें तिकडे पाठविलें नाहीं. मराठयांच्या छावणींतील वाढत चाललेल्या या हलाखीची खबर अबदालीला लागत होती व त्यामुळेंच तहाच्या वाटाघाटीच्या गोष्टी कोणी सांगितल्या तर त्याकडे तो दुर्लक्ष करीत होता. त्याचप्रमाणें मराठयांवर निकराचा हल्ला चढवून फळी फोडून निघून जावें असा सल्ला सुजाउद्दौला व नजीबखान त्याला देत होते. पण याचा निर्णय घेण्याचें कामही माझ्यावरच सोपवा असें तो या आपल्या दोस्तांना सांगत होता, रोज घोड्यावर स्वार होऊन आपल्या छावणीभर तो फेरफटका करी. सबंध छावणीभर हिंडून तो कानाकोपऱ्यांतल्या बातम्या समजून घेत असे. सकाळीं व संध्याकाळीं छावणीसमोरील ठोकलेल्या लाल तंबूंत नमाज पढण्यास व भोजनास तो येत असे. आपल्या छावणींतील अन्नपरिस्थिति फारशी चांगली नाहीं, हें त्याला जसें माहित होतें तसेंच मराठयांच्या छावणींतील ही परिस्थिति अधिकाधिक निकृष्ट होत चालली आहे, हेंही तो पूर्णपणें जाणून होता.

उलटपक्षी भाऊला सुद्धां या परिस्थितीची जाणीव नव्हती असें नाहीं. उपासमारीनें जर्जर करून अबदालीस आपल्यावर चालून येण्यास भाग पाडावें व त्याचा आपण फडशा उडवावा, ही योजना भाऊसाहेबाला आतां मागें टाकावी लागली. आपल्या छावणींतील स्थिति अगदीं निकराला पोंचली नाहीं तोंपर्यंतच आपणच चढाईचा उपक्रम करून अबदालीला पराभूत करावें किंवा तसें न साधल्यास त्याच्या फौजेची फळी फोडून निघून जावें व दिल्लीसारख्या ठिकाणीं पुन्हा एकत्र येऊन

नव्या तयारीनें अबदालीचा समाचार घ्यावा, एवढे दोनच मार्ग पुढें शिल्लक राहिले होते. मराठा छावणीची दिवसेंदिवस अधिकाधिक दुर्दशा होत चालली तेव्हां जीवावर उदार होऊन हर प्रकारची सामुग्री मिळविण्यासाठीं मराठे सैनिकांच्या टोळ्या बाहेर पडत होत्या व छावणीभोंवतीं फिरणाऱ्या पठाणी शिपायांशीं त्यांच्या चकमकी होत होत्या. गिलच्यांचे शिपायी-देखील मराठा छावणीभोंवतीं फिरून रसद बंद पाडीत होते तर कांहीं ठिकाणीं त्यांनीं मराठा छावणींतील वैरणीच्या गंजीही जाळल्या. वैरणीच्या तुटवड्यामुळें घोड्यांचे व इतर जनावरांचे हाल होऊन कांहीं ठिकाणीं तीं पटापट मरूं लागलीं. अशा परिस्थितींत कांहीं तरी झटापटीचे निर्णय घेणें भाऊला भागच होतें. या असल्या दिवसांतच मकर संक्रांतीचा सण आला. व तो सर्वांनीं आनंदानें साजरा केला. सण साजरा करण्याइतकी सामुग्री व उत्साह मराठी फौजेपाशीं अशा वेळीं शिल्लक होता हें उघड आहे. पण ही परिस्थिति यापुढें टिकून राहणार नाहीं अशी खात्री वाटूं लागल्यामुळेंच भाऊनें सर्व सरदार मंडळी जमवून पौष शु. ८ स ( ता. १४ जानेवारी १७६१ ) पहांटेस शत्रूवर चाल करून जावयाचें सर्वानुमतें ठरविलें. मोठ-मोठ्या सरदारांच्या फौजांची भोंवताली पद्धतशीर रचना करून त्याप्रमाणेंच मध्यें व बाजूंनीं तोफखान्याचा गोल बांधून, मध्यें पाठीशीं कबिले घेऊन सर्वांनीं लढत लढत शत्रुसैन्याची फळी फोडून बाहेर निघून जावें, अशी ही योजना होती. या योजनेप्रमाणें भाऊनें मध्यरात्रीपर्यंत सर्व व्यवस्था लावली.

" आतां पात्र कांठोकांठ भरलें. एक बिंदूही जास्त राहणें शक्य नाहीं तेव्हां सलुखासबंधानें काय तो निकाल तत्काळ करावा " अशा मजकुराची चिठ्ठी भाऊनें काशीरायाकडे पाठविली. काशीरायानें ता. १४-१-१७६१ रोजींच्या पहांटे ही चिठ्ठी सुजाकडे आणली. याचा विचार होऊन काशीराय अबदालीकडे त्याच्या तंबूत जातो तों मराठे सज्ज होऊन चालून आले, अशी बातमी अबदालीस आली. ' आजचा दिवस दम खा मग याचा निकाल करूं ' असा जबाब अबदालीनें दिला. तो सदाशिव-रावास वाटेंतच मिळाला पण त्याचा आतां उपयोग नव्हता. " मराठी रियासतींत दिलेला मजकूर केवळ कादंबरीवजा आहे. आतां पात्र कांठोकांठ

भरलें. सलुखासंबंधानें निकाल करावा असें लिहिणें म्हणजे आपल्या हला-खीची कबूली देऊन तहाची याचना करण्यासारखें आहे. लढाईच्या तडा-क्याशिवाय अबदाली ताळयावर येणार नाहीं, असा विचार भाऊंनीं केला होता. याकरतांच तर एकाएकीं रात्रीं सर्व सरदारांशीं खलबत करून दुसरे दिवशीं भाऊनें अबदालीवर चालून जाण्याचें ठरविलें होतें. अशा वेळीं वरील नादानीच्या शब्दांत तहाची याचना भाऊनें करणें कधींच शक्य नव्हतें. भाऊच्या मनांत तहच करावयाचा असता तर या चिठ्ठीचें उत्तर येईपर्यंत भाऊ थांबून राहिला असता. चिठ्ठी घेऊन काशीराय अबदालीकडे त्याच्या तंबूंत जातो तों मराठे सज्ज होऊन चालून आले अशी बातमी अबदालीस आली. एका बाजूनें तहाची याचना करायची व त्याबरोबरच ज्याच्याकडून तडजोडीची अपेक्षा करायची त्याला विचार करायलाही वेळ न देतां त्याच्यावर चालही करावयाची इतका असमंजसपणा तहा-करतां आतुर झालेला कोणीही इसम करणार नाहीं. तहाच्या वाटाघाटीची वेळ आतां निघून गेली होती व गिलचे व मराठे यांच्यांत संग्राम घडूनच हिंदुस्थानची सत्ता मराठयांच्या हातींच राहिली पाहिजे या प्रश्नांचा निकाल भाऊला लावावयाचा होता.

ता. १४ जानेवारी रोजीं सकाळीं उजाडतांच मराठी फौजा शिस्तीनें गिलच्यांच्या छावणीवर चालून आल्या. ही गोष्ट अगदीं अनपेक्षित व आक-स्मिकपणें घडून आली व अबदालीला बेसावधपणानें मराठयांच्या या सामुदायिक हल्लयाला तोंड द्यावें लागलें असें मात्र म्हणतां येत नाहीं. मराठे एक दोन दिवसांत आपल्यावर चालून येणार असा सुगावा अबदालीला अगाऊ लागला असल्याशिवाय या हल्लयाला तोंड देण्याची त्यानें जी कांहीं तयारी ठेवली, तीही त्याला ठेवता आली नसती. प्रातःकाळीं दोन घटका दिव-सास या युद्धास प्रारंभ झाला. मराठयांनीं आपल्या फौजेची विशिष्ट रचना करून शत्रुसैन्यावर चाल केली. मराठयांची सैन्यरचना पूर्वाभिमुख होती. आदल्या दिवशीं जवळ जवळ रात्रभर जागून भाऊनें ही रचना ठरवून दिलेली होती. अबदालीनें मराठयांच्या या प्रचंड व व्यवस्थितपणें चालून आलेल्या फौजेला घाबरून जाऊन विस्कळितपणें तोंड दिलें. असें दिसत नाहीं. त्यानेंही आपल्या सैन्यांतील निरनिराळ्या सरदारांच्या पथकांची

कांहीं विशिष्ट रचना केली होती. मग ही योजना त्यानें केव्हाही आंखलेली असो. स्वतः कांहीं निवडक फौजेनिशी मागें राहून मराठयांच्या निरनिराळ्या आघाडीवरील पथकांना पद्धतशीरपणें तोंड देण्याची व्यवस्था त्यानेंही केली होती.

पूर्वनियोजित योजनेप्रमाणें चालून आलेल्या मराठी फौजेनें गिलच्यांच्या फौजेवर अत्यंत जोराचा मारा केला. सकाळीं सात साडेसातपासून एक दीड वाजेपर्यंत दोन्ही फौजांत घनचक्कर युद्ध झालें. पहिल्यापासून मराठ्यांनीं जें चढाईचें पाऊल टाकलें तें तसेंच नेटानें इतका वेळ कायम ठेवलें होतें. एक दीड मैलाच्या या आघाडीवर मराठयांची सर्वत्र सरशी होत चालली होती. विश्वासराव व भाऊ दोघेही युद्धाची व्यवस्था पाहत होते. यमुना पाठीशीं घालून अब्दालीची सर्व फौज लढत होती. गिलच्यांच्या फौजेची रचना पश्चिमाभिमुख होती व फौजेमागें यमुना नदीचा प्रचंड प्रवाह होता. तेव्हां गिलच्यावर जोराचा हल्ला चढवून त्यांना नदीच्या प्रवाहापर्यंत रेटीत नेऊन जेरीस आणायचें याच नेटानें तो आपल्या सैन्याला हुकूम देत फिरत होता. शत्रूला बेसावध गाठून व आपल्या फौजेचा गोल बांधून त्याजवर एकाएकीं घुसून मारतां मारतां त्याच्या अंगावरून निघून जावयाचें, असें धोरण रात्रीं सर्वानुमतें ठरविण्यांत आलें होतें. पण या धोरणाचा प्रत्यक्ष दोन्ही फौजांची गांठ पडल्यावर भाऊनें त्याग केला व गिलच्यांवर प्रत्यक्ष हल्ला करून व यमुनेपर्यंत त्याला सारखा रेटीत नेऊन त्याला नामोहरम करण्याचा नवीन बेत त्यानें योजला. भाऊनें हें नवीन धोरण स्वीकारलें यांत कांहींच गैर केलें नाहीं. अब्दाली बेसावध अवस्थेंत आपल्याला सांपडले व त्याच्या फौजेला मारीत मारीत त्याच्या अंगावरून निघून जात ईल ही कल्पना प्रत्यक्ष संग्राम झाला त्या वेळीं फोल ठरली. मराठी फौज प्रत्यक्ष चालून आली त्या वेळीं अबदालीही पक्का सावध आहे, या हल्ल्याला तोंड देण्याची त्यानें पद्धतशीर व्यवस्थाही केली आहे असें आढळून आल्याबरोबर व पहिल्या रात्रीं ठरलेल्या योजनेचा उपयोग नाहीं, असें पाहिल्याबरोबर भाऊनें आपल्या सर्व आघाडीवरील सरदारांना गिलच्यावर सरास चालून जाण्याचा हुकूम केला. हें धोरण पूर्वसंकल्पित असतें तर फौजेची थोडी निराळी व्यवस्था करावी लागली असती हें

खरें आहे. विशेषतः इब्राहिमखान गारद्यांच्या तोफखान्याची व्यवस्था य दृष्टीनें निराळी असावयास पाहिजे होती. या नवीन डावाप्रमाणें आपल्या तोफखान्याचा व्हावा तसा परिणामकारक उपयोग करतां येत नाहीं हें पाहून इब्राहिमखान थोडासा नाराजही झाला. पण भाऊसाहेबानें हें तावडतोबीचें नवें धोरण स्वीकारलें व त्याप्रमाणें या नवीन वळणानें लढाईला प्रारंभ झाला पण पुढच्या कांहीं तासांत मराठे सरदारांनीं आपापल्या तडाख्यांत सांपड-लेल्या शत्रूसैन्याची जी धुळधाण उडवून दिली त्यावरून भाऊचें धोरण अगदींच चुकीचें ठरलें नाहीं. भाऊनें आपल्या नवीन धोरणाप्रमाणें सर्वांना जे हुकूम दिले ते सर्वांनीं अगदीं तंतोतंत पाळले. म्हणून घनघोरपणें चाल-लेल्या या सात तासांच्या युद्धांत मराठयांची सारखी सरशीच होत गेली. इब्राहिमखानाच्या तुकडीनें बरखुरदारखान, अमीरबेगखान व दुंदेखान यांच्या पथकांचा खुर्दा उडविला. हुजुरातीच्या फौजेनें शहावलीखान व जनकोजी व महादजी यांनीं नजीबखान रोहिल्याच्या सेनेचा इतका फडशा उडविला कीं, मराठयांपुढें आपला निभाव लागत नाहीं, असें अबदालीच्या पक्षाकडील सरदारांना वाटूं लागलें. वझीर शहावलीखान याचा पुतण्या अताईखान यास ठार करून गोविंदपंत बुंदेल्याच्या वधाचा सूड मराठयांनीं घेतला. या झटापटींत वजीराच्या मांडीखालचा घोडा ठार झाला. तो पाय-उतार झाला. अशा प्राणसंकटाचे वेळीं सुजाला हें वर्तमान कळलें असतांही तो त्याच्या मदतीस धांवून गेला नाहीं. मराठयांनीं चालविलेल्या हातघाईच्या लढाईपुढें वजीराच्या फौजेला दम निघाला नाहीं व ती सैरावैरा पळूं लागली. या पळापळीमुळें आपल्या इतर फौजेची हिंमत खचते, हें पाहून अबदालीनें रण टाकून पळ काढणाऱ्या लोकांना छाटून टाकण्याचा हुकूम केला. तेव्हांच ही पळापळ थोडीशी थांबली. विश्वासराव व भाऊसाहेब कांहीं वेळ हत्तीच्या अंबारींत व कांहीं वेळ स्वार होऊन लढत होते. भाऊसाहेब आपल्या परी नांवाच्या घोडीवर बसून बिजलीसारखा रणांगणावर इकडून तिकडे चम-कत होता, आपल्या सैन्याला उत्तेजन देत होता व कोणता सरदार कसा लढतो, कोणी कुचराई करतो कीं काय हें पाहात होता. या निकराच्या लढाई-मुळें गिलच्यांच्या तोंडचें पाणी पळालें व आपला विजय होणार अशी मराठयांना खात्री वाटूं लागली. मराठयांची हिंमत वाढत गेली. परंतु

ऐन याच वेळीं दोन प्रहरीं तीन वाजण्याच्या सुमारास विश्वासरावाच्या छातींत बंदुकीची गोळी घुसून तो गतप्राण झाला. लढाईचें पारडें फिरलें. विश्वासरावाच्या मृत्यूमुळें हुजरातीच्या फौजेंत एकच हाहाःकार उडाला. आणि ही संधि साधून अबदालीनेंही आपली इतका वेळ राखून ठेवलेली फौज बाहेर आणली. या ताज्या फौजेनें ताज्या दमानें मराठयांवर जोराचा हल्ला केला. याच वेळीं समशेर बहादूर जखमी झाला. यशवंतराव पवारही गोळी लागून पडला. मराठी फौजेचा दम सुटत चालला. भाऊनें पिछाडी-कडे नजर फेंकली. त्या वेळीं मल्हारबांनीं आपली जागा सोडलेली त्यांच्या नजरेस आलें. शत्रूवर तुटून पडून चढाईचें धोरण भाऊनें स्वीकारलें त्या वेळींच होळकरांना दम निघत नसल्यास बायकापोरांचे कबीले सुरक्षित राखून त्यांना बाहेर नेण्याची सूचना भाऊनें त्यास केली होती. पण आतां होळकर जागेवर नाहींत, ते मागें हटण्याच्या विचारांत आहेत, असें पाहिल्यावर बायका पोरांना संभाळण्याचे कामांतही कुचराई करूं नका, असा निरोप त्यांनीं होळकरांना पाठविला. मल्हारबा निरोप ऐकण्याच्या परिस्थितींत नव्हते. दमाजी गायकवाडाच्या सेनेचा राखीव फौजेसारखा उपयोग व्हावा, असें या नवीन योजनेच्या वेळीं भाऊनें ठरविलें होतें व इब्राहिमखानाला वेळप्रसंगीं मदत करावी, असेंही कळविलें होतें. युद्धाच्या ऐन जोराच्या हातघाईत दोन्हीं सैन्यें एकमेकाला येऊन भिडलीं त्या वेळीं इब्राहिमखानाच्या तोफेचे गोळे अबदालीच्या फौजेच्या डोक्यां-वरून जाऊं लागले तेव्हां हातांत निशाण घेऊन व बागनेटी तुकड्या बरोबर घेऊन त्यानें गिलच्यांवर निकराचा हल्ला केला आणि पुढून चालून आलेल्या रोहिल्याचा त्यानें फन्ना उडविला पण या हातघाईत इब्राहिमखान घायाळ झाला व शत्रूच्या हातीं सांपडला. दमाजीनें वास्तविक या वेळीं पुढें येऊन आपली बाजू संभाळावयास पाहिजे होती. तो अगदींच स्वस्थ राहिला नव्हता. पण विश्वासरावाच्या मृत्यूमुळें उडालेला गोंधळ पाहून त्यानेंही हळूच मागें पाय काढला. ऐन वेळेकरतां राखून ठेवलेल्या दमाजीचा भाऊला कांहीं उपयोग झाला नाहीं. इतकें झालें तरी मराठयांची सरशीच होत होती. गिलच्यांनीं मराठी फौजेपुढें हाय खाल्ली होती व अबदालीनें कितीही धडपड केली तरी आपल्या फौजेंत हिंमत भरण्याचें सामर्थ्य त्याच्यांत राहिलें

नव्हतें. पण विश्वासरावाच्या पतनामुळें हुजुरातीच्या फौजेची जी तारांबळ उडाली तिचा फायदा अबदालीनें पुरता घेतला व मराठी सेनेच्या या अवसानघातामुळें विजयाचा हातातोंडाशीं आलेला मोका फुकट गेला. भाऊची हिंमत अद्याप खचली नव्हती. विश्वासराव पडल्यावर नानासाहेबास तोंड काय दाखवावें असे उद्गार त्यानें काढले असले तरी केवळ भावनांना वश होऊन त्याला बळी पडणारा त्याचा स्वभाव नव्हता. विश्वासराव पडल्यावर साहाजिकच गिलच्यांनीं मारा केला. निशाण हातचें जाऊं नये म्हणून भाऊनें त्याच्याभोंवती जोराची लगट केली. घाबरटपणानें पळून जाणाऱ्या लोकांत हिंमत उत्पन्न करावी, म्हणून विजयाचीं शहाजणें वाजविलीं. पण त्याचाही उपयोग झाला नाहीं. असल्या परिस्थितींतही तेथें टिकून राहिलेल्या हजार बाराशें लोकांना त्यानें संघटित केलें व चढून आलेल्या गिलच्यांना मागें हटवीत तो त्यांच्यांत जोरानें घुसला. शूर जनकोजीही याच तुकडींत नेटानें लढत होता. भाऊनें पराक्रमाची शर्थ केली. अबदालीच्या राखीव सैन्याशीं भाऊने झुंज घेतली. आपल्या बरोबरच्या हजार बाराशें लोकांसह हे दोघे वीर पुरुष गिलच्यांच्या फौजेंत इतके दूरवर घुसले कीं, त्याचें पुढें काय झालें, हें कोणाच्या दृष्टीस पडलें नाहीं. पण भाऊ व जनकोजी यांच्या संबंधानें पुढें ज्या हकीकती उपलब्ध झाल्या त्यांवरून असें खात्रीलायक म्हणतां येतें कीं, हे अद्वितीय योद्धे आपल्या समशेरीनें गिलच्यांना कंठस्नान घालीत त्यांची फळी फोडून बाहेर निसटून गेले.

तसाच प्रसंग आला तर होळकरांनीं मागें फिरतांना कबील्याचें रक्षण करून त्यांना बरोबर घेऊन जाण्याची व्यवस्था करावी, असा निर्वाणीचा निरोप भाऊनें मल्हारबाकडे पाठविला होता. पण मल्हारबानें एवढी साधी गोष्टही केली नाहीं. विश्वासराव पडल्याबरोबर हुजुरातीच्या फौजेंत गोंधळ उडालेला पाहून होळकरांनीं रणांगणांतून पाय काढला. बाजीरावाच्या तालमींत तयार झालेल्या या वृद्ध व अनुभवी सरदारानें ताबडतोब आपल्या बरोबरीच्या फौजेनिशी भाऊसाहेबांच्या मदतीस जाऊन हुजुरातीच्या फौजेस धीर द्यावयास पाहिजे होता. तसें न केल्यामुळें व आपली फौज त्यानें मागें फिरवल्यामुळें मराठ्यांचा धीर अधिकच सुटला. विठ्ठल शिवदेव यांच्या पथकांत गिलच्यांकडून फुटून आलेले दोन हजार गिलचेही उलटले. हे लोक आपले आहेत

हें दर्शविण्याकरितां खूण म्हणून भगवे फडकें यांच्या डोक्यास बांधावयास दिलें होतें. विश्वासराव पडल्यावर या लोकांनीं भगवें फडकें टाकून दिलें व गिलच्यांची फत्ते झाली व ते लुटालुट करूं लागले, अशी आवई घातली. त्याबरोबर बुणगे पळूं लागले, हें दृश्य पाहिल्याबरोबर विठ्ठल शिवदेवांनीं आपल्या पथकासह पळ काढला, मल्हारबाच्या घाबरट स्वभावाची जाणीव ठेवूनच कीं काय, भाऊनें पार्वतीबाई वगैरेंच्या संरक्षणाची व्यवस्था विसाजी जोगदंड याच्याकडेही सोंपविली होती व त्यास आज्ञा केली होती कीं,आम्ही झुंज करून पार निघालों तर यास घेऊन दिल्लीचे रोखें घेऊन जावें आणि पडलों असें ऐकल्यावर यास जीवें मारून तुम्ही निघून जावें. पण विसाजी जोगदंडही बेइमान झाला. हुजुरात फौजेंत गडबड होतांच आपला जीव वांचवून तो पळून गेला. "जानू भिताडा खिदमतगार एकटा राहिला. त्यानें हिंमत धरून आपले पाठीशीं पार्वतीबाईला बांधून तेथून बाहेर काढले. तो दमला तेव्हां पिराजी राऊत पळत होता. त्यांनीं पाहतांच पाठीची सोडून आपल्या पाठीमागें बांधून सहा कोसपर्यंत आणली. त्याचा घोडा पुढें थकला त्यानें उतरून ठेवली. पुन्हा जानू भिताडा कोश अर्धकोश चालवित. तों बळकट घोड्याचा मातबर सरदार कोणी भेटला तर त्यांचे घोड्यावर बसवी. ऐसे करीत तसा संकटानें दिल्ली अलीकडे तीन मजलावर मल्हारजी होळकर व कितेक सरदार व पागेचे बारगीर व स्वार शिलेदार पन्नास भेटले त्यामध्ये येऊन भेटली व मिळाली." * विश्वासरावाची बायको लक्ष्मीबाई या मोहिमेंत आली नव्हती. ती त्र्यंबकेश्वरास आपल्या माहेरींच होती. विश्वासरावाच्या मरणाच्या बातमीनें अंतःकरणास धक्का बसून ती कांहीं दिवसांनीं आजारी पडून वारली.

कैफियतीच्या हकीकतींत 'आम्ही झुंज पार निघालों तर यास घेऊन दिल्लीस रोखें जावें, हें भाऊचें वाक्य अर्थपूर्ण आहे. पराभवाचाच प्रसंग आला तर गिलच्याची फळी फोडून दिल्लीस येण्याचा व पुन्हा सैन्याची जमवाजमव करून गिलच्याला तोंड देण्याचा भाऊचा इरादा होता असें त्यावरून स्पष्ट दिसतें. पण पानिपतमधील पळापळ, कत्तल व मराठ्यांची वाताहात झालेली ऐकून दिल्लीच्या बंदोबस्ताकरतां ठेवलेला नारो शंकर दिल्लींतील

---

* भाऊची कैफियत पा. २५

मराठ्यांचा चाळीस लाखांचा खजीना तेथें तसाच, ठेवून आपल्या फौजे-सह दिल्लीहून घाबरून पळून गेला. विशेष हें कीं होळकरांचा दिवाण गंगोबा तात्याही त्याच्याबरोबर पळून गेला, असें कळल्यावर भाऊ तिकडे न जातां जाटाच्या मुलखांत गुप्तपणें निघून गेला.

अंताजी माणकेश्वर, बाजी हरी हे दिल्लीच्या सुमारें चालले असतां गिलच्यांच्या तडाक्यांत ठार झाले. रणभूमीवरून पळून चाललेल्या हजारों मराठ्यांची गिलच्यांनीं कत्तल उडविली. नाना फडणिसासारखे फारच थोडे लोक या संहारांतून वाचले. हे लोक जाटाच्या मुलखांत आले त्या वेळीं जाटानें आपल्या धर्मबांधवाना अन्नवस्त्र देऊन त्यांचा सांभाळ केला. जाटाच्या नायकोनें तर या सर्वांना मदत करण्याचे कामीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. परत आपल्या मुलखांत जातांना या लोकांना तिनें आठ रोजांचा शिधा व ब्राह्मणांना मिठाया दिल्या. कांहीं प्रामाणिक शिपायांनीं जखमी झालेल्या समशेर बहादूरास याच भागांत आणलें. त्यावेळीं सुरजमलानें त्याची फार काळजी घेतली. पण समशेर बहादूर भाऊ गमावला, या समजुतीनें भाऊ, भाऊ करीत मरण पावला. अबदालीच्या फौजेनें दुसरे दिवशीं पानपतच्या छावणींतल्या लोकांचाही मन-मुराद संहार केला. या ठिकाणीं गिलच्यांना अतोनात लूट सांपडली.

होळकर, दमाजी गायकवाड व महादजी शिंदे हे नामांकित सरदार रणांगणांतून परत आले. पेशव्यांच्या अगदीं निकटवर्ति मंडळीपैकीं नाना फडणीस-ही या रणभूमींतून पळून दक्षिणेंत कसाबसा पोंचला. भाऊबरोबर हा शेवटपर्यंत होता. आपल्या आत्मचरित्रांत या संग्रामाचें वर्णन त्यानें केलें आहे पण तें अगदीं मामुली आहे. भाऊ गर्दींत नाहींसा झाला तो दिसला नाहीं, असें त्यानें म्हटलें आहे. नाना फडणीसाला घोड्यावर चांगलें बसतां येत नव्हतें. तरवार तर त्यानें कधींच परजली नव्हती. आईला घेऊन नाना उत्तरेंतील तीर्थयात्रा करण्यास आला होता. भाऊबरोबर असेच आणखी पुष्कळ लोक आपल्या आयाबहिणी घेऊन तीर्थयात्रेकरतां आले होते. सर्वांची समजूत कीं, भाऊपुढें गिलच्याची काय तमा ! ही मोहीम केव्हांही यशस्वी होणार व आपण तीर्थयात्रा संपवून सुखरूप परत येणार. नाना फडणीसानें आपल्या आत्मचरित्रात्मक पत्रांत तीर्थयात्रांचें वर्णन भक्तिपूर्वक केलें आहे. तसेंच या यात्रेला आपण कां प्रवृत्त झालों, हेंसुद्धां त्यानें स्पष्टपणें निवेदिलें

आहे. नानानें आपल्या दोषांचें केलेलें आविष्करण महात्मा गांधींची आठवण करून देतें. लहानपणापासून आपले कामविकार किती प्रबळ झाले होते, आपल्याला कशा वाईट संवयी लागल्या होत्या हें सांगून आत्मशुद्धीकरतां आपण या तीर्थयात्रेला निघालों असें तो म्हणतो. नानाच्या या पत्रांवरून नानाचा प्रेमळ व भक्तिभावयुक्त भोळा बावडा स्वभाव व्यक्त होतोच. शिवाय भाऊसाहेबासंबंधानें त्याच्या भावना काय होत्या हेंही व्यक्त होतें. त्यांतल्या त्यांत विशेष म्हणजे पानिपताहून जे लोक पळून दक्षिणेकडे आले त्यांचे कसे अनन्वित हाल झाले, याची कल्पना येण्यासही नानाचें हें आत्मचरित्रात्मक पत्र वाचलेंच पाहिजे.

"दहावे वर्षी विवाह झाला. पुढें अकरा वर्षांनंतर कामाविर्भाव शरीरीं होऊं लागला. तेणेंकरून व असत्समागम झाला तेणेंकरून पापवृत्तीही होऊं लागली. रेतस्खलनही करूं लागलों. घोड्यावरून पडलों, ईश्वरें वाचविलें. पंधरावे वर्षीं पित्याचा काळ झाला. पुढें सेवाधर्म चालला यायोगें व श्रीमंताची कृपा पुत्रवत् असें जाणून कर्नाटक प्रांतीं श्रीरंगपट्टणपर्यंत गेलों. प्रत्यही स्वप्नावस्था होऊं लागली. रमणीयोग झाला. पापबुद्धि निःशेष सुटेना...बुद्धीचा निश्चय करावा तथापि स्थिरता राहूं नये. संस्कार बलवत्तर. पुढें टोक्यास अतिरुद्र करावयास गेलों. तेथें देवतार्चन नेम धरला. परंतु शरीरीं पीडा तेणेंकरून वैराग्य असें कीं, परस्त्री मनांत येऊं नये. मग पाहणें कोठील ! मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊबरोबर हिंदुस्थानांत जाऊन त्रिस्थळीं यात्रा करावी. अंतःकरणशुद्धि होईल. या भावनेकरून निघालों. त्या काळीं चित्तास अतिवैराग्य. नर्मदा—महागंगेमध्ये स्नान करून एक वृत्तीनें ध्यान केलें. भाऊची ममता विशेष व आंवेची व्यथा बहुत झाली. उठावयास शक्ति नाहीं. रेचन बहुत, ग्लानी फार, तेव्हां कूच झालें असतां मुक्काम श्रीमंतांनीं करावा. चरमण्वती तीरी आलों...यमुनाईचें तीरीं गौघाटाजवळ गेलों. मथुरा, वृंदावन या स्थळीं गेलों. गोपीचंदनाचे टिळे व तुळशीच्या माळा घालून भगवंताचें ध्यान करीत होत्साता अटलबिहारी, कुंजबिहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवंताच्या मूर्तींचीं दर्शनें घेतलीं... कुंजविहारीं मध्यान्हकालीं चौपाळ्यावर निद्रिस्त. कपाट लागलेलें परंतु चौपाळ्याची दोरी बाहेर ओढीत असत ती आपले हाती ओढून भगवान् जी

यास आंदोलन लीला केली. शृंगारवटाचें दर्शन घेतलें. यमुनातीरीं रेतींत लोळन ती रेती मस्तकावर घेतली. तेथून ज्ञानगुदडीस गेलों. कालिंदी तीरीं जाउन सायंकाल संध्या करून भगवान सांब सदाशिव जो याचे एकाग्र मनें-करून ध्यान करून येता झालों. याप्रमाणें तीन चार दिवस क्रमले...पादे करून चालत गेलों तेणेंकरून पायाचें सार्थक झालें. एका बैराग्यानें कृपा करून एक मंत्र भगवंताचे नामाचा सांगितला कीं, याचा जप करीत जावा. तो भगवंतेंच सांगितला, असें मानून सर्वत्रास यथाशक्ति देणें देवून संतोषातें पावलों. पुढें दिल्लीस गेलों. तेथें पृथ्वीपतीचें दर्शन घेतलें. श्रीमंतांचे आज्ञे-वरून घेतलें. त्यांनीं बहुत कृपायुक्त भाषण करून आशीर्वाद देवून आपले जवळील वस्त्रें दिलीं. ती घेतलीं. किंचित संतोष झाला कीं, भगवंताचे कृपेनें अंतर्वर्तीही कृपा आहे. पृथ्वीपति बादशहा जवानबख्त म्हणून एक लहान शहाजादा भाऊंनींच गादीवर बसविला होता.

तदनंतर श्रीमंतांचे लष्करांत श्रीमंताजवळ आलों. बसलों असतां भूमिकंप झाला. पुढें उत्तरेकडील यवन शत्रुत्वेंकरून यमुना पैलतीरी पाऊण लक्ष सेने-सह वर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली तेणें करून उभय-पक्षी स्तब्धताच झाली. पुढें कुंजपुरा श्रीमंतांनीं घेतला. मी ही युद्धांत होतो. ईश्वरें रक्षिलें तो इतकियांत यवन अलीकडे आला. श्रीमंत सैन्यासह वर्तमान सामोरे गेले. गाठ पडली तेव्हां मी तर लहान. श्रीमंतांचे बुद्धीस, महानबुद्धि, परंतु भावी अर्थ तेणें करून विपर्यास घडला...परस्पर युद्ध होत असे. गोळे प्रत्यही शत्रूचे राहुटीवरुन जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत. त्यास विनंती केली कीं, ईश्वरीं लक्ष असावे.... पूढें थोरले युद्ध उदयीक होणार... दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकाळचे दोन घटका दिवसास युद्धास गोळागोळीचा आरंभ झाला...मी श्रीमंतासान्निध ईश्वरस्मरण करून किंचीत असे.... तों विश्वासराव यास गोळी लागली. पडले. ते श्रीमंतांनी घालून उभेच राहीले. तों पठाण पायउतारा होऊन आंत मिसळले. तोडातोडी होऊं लागली आणि दोन बाजूचे मातबर सरदार चौघड्याचे धनीदेखील पुर्वींच पळाले. दोन तीन शत पायदळास होते. श्रीमंत दिसेनासे झाले. तेव्हां ईश्वरें बुद्धि दिली माघारें फिरावें, त्यास उत्तर केलें कीं, अशा समयीं श्रीमंतास सोडणें ठीक

नाही. परंतु पुढें याप्रमाणें जहाले. लक्ष सैन्य असतां एकही त्या समयीं श्रीमंतास आप्त न जाला. बहुत दिवस अन्न भाक्षिले. कृपा पुत्रवत् केली चांगला काळ होता तेव्हां केंसास धका लागल्यास प्राण देऊं, अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वरघटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो. सर्व सुखाचे सोबती. निदान कोणी नाहीं. सर्व वाताहत झाले, मी सायंकाळचे दोन घटिका दिवसास पाणिपतांत आलों. तेथें परमेश्वरें वाट दाखवावयापुरते रामाजीपंत उभे होते, सांगू लागले, घोडे, वस्त्रें टाकून द्यावीं, शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जाहल्यावर चाललों. तो एका कोसांत तीन चार वेळ टोपीवाल्यांनीं शरीरास हात लावून झाडा घेतला. दर खेपेस समागमेचे दहा-वीस तोडून टाकीत त्यांत मी राहिलों, हें सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत रामाजीपंत आमचेबरोबर राहातच गेले. असे जातां दहा बारा कोस पश्चिमेस गेलों तो तेंच शत्रु येऊन बापूजीपंत व रामाजीपंत यांस जखमी भारी केले पडले. मी एकटा राहिलों. तों गवतांत ईश्वरें माझें रक्षण केले पुढें दो कोसांवर मागते दृष्टीस पडले. तो मागती तृणांत जाऊन बसलो, तों जवळ येऊन काढूं लागले. मग गेले. पानिपतावर शक्ति बहुत क्षीण. पण पादचारी अभ्यास नसता सोळा सत्रा कोस अन्नोदका-व्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली तेव्हां बोरीचा पाला सांप-डला तो खाऊन पाहिला. तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें, त्याची भाकर खादली. ती अमृतप्रमाण लागली. नंतर निद्रा केली. प्रातःकालीं दुसरे गांवास गेलों. एका साहुकारानें भोजन घातलें. तो शत्रूचे स्वार गांवांत आले. तेव्हां पायउतारा होऊन चालले असें सात दिवस समागमेची मंडळी सुद्धां रेवडीस आलों तेथें बालोराव म्हणून चौघे भाऊ माझें नांव ऐकून असत. त्यांनीं घरीं नेऊन भोजनाचें साहित्य दिलें. तेथें सात दिवस राहून एक लग्न निघालें त्याबरोबर दीग भरतपुरास निघालों. वाटेंत कृष्णभट वैद्य भेटले. त्यांनीं सांगितलें कीं, स्त्री विरोजी बारावकर यांनीं सांभाळून आणली. ती नारोपंत गोखल्याचे घरीं आहे तेथें गेल्यावर भोजन शरिरिचें घातलें आनंद झाला. मग गाडी करून स्त्रीसह डीगेस आलो. तेथून मातोश्रीचा फार शोध केला. घरचा खिजमतगार बरोबर होता. त्यानें

सांगितलें कीं, घोड्यावरून पडून जखम लागून मेली. पुढे ढवळपुराहून सगळें लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंदरे, मल्हारजी होळकर सारे होते तेथें आलों."

पानिपतच्या पराभवामुळें सर्व महाराष्ट्र नामोहरम झालें. त्याचें मुख्य कारण हें कीं, गिलच्यांनीं पळत सुटलेल्या लोकांच्या व पानिपतच्या मुख्य छावणींत असलेल्या बुणग्यांच्या सर्रास कत्तली केल्या.

मराठे पळत सुटतात; थोडें कांहीं अनपेक्षित व आकस्मिक झालें कीं त्यांचा धीर सुटतो ही गोष्ट अबदालीनें पूर्णपणें जाणली होती. विश्वासराव गोळी लागून पडण्यापूर्वी अबदालीचा बहुतेक सर्व बाजूंनीं मोड झाला होता. त्याची सर्व फौज घाबरून गेली होती, त्याच्या फौजेंतही कांहीं ठिकाणीं पळापळ सुरू झाली होती. पण ती त्यानें जबरदस्तीच्या उपायानें थांबविली व आपली ताज्या दमाची फौज पुढें आणली. इतक्यांत विश्वासराव पडला व मुख्य हुजुरातीच्या फौजेंतच पळापळ सुरू झाल्या-बरोबर तिचा जोरानें पाठलाग करून ज्या दिशेनें ते पळून जाणार त्या वाटेवरच त्याना अडवून त्याची सर्रास कत्तल करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें मराठी सेनेचा धीर अधिकच सुटला. हिंदुस्थानावरील अगदीं पहिल्या स्वारींत त्याच्यावर चालून आलेला वजीर कमरुद्दिन तोफेचा गोळा लागून मरण्यापूर्वीं त्याच्या फौजेची दाणादाण उडाली तेव्हां त्यानें माघार घेऊन रणांगणातून बाहेर पाय काढला, ही आपली चूक कमरुद्दिन मरण पावल्या-ची बातमी समजली त्या वेळीं त्याच्या नंतर लक्षांत आली होती. वजीराच्या मरणामुळें मोगल फौजेंत उडालेल्या गोंधळाचा आपल्याला फायदा घेतां आला असता असें त्याला मागून आढळून आलें. पानिपतच्या युद्धांत त्यानें अशी चूक होऊं दिली नाहीं. मराठ्यांच्या झपाट्याच्या हल्ल्यामुळें गांगरून गेलेल्या आपल्या फौजेला त्यानें आवरून धरलें आणि योग असा कीं, विश्वासराव हत्तीच्या अंबारींतून खालीं पडल्याबरोबर मराठ्यांच्या फौजेंत जो एकाएकीं गोंधळ उडाला त्याचा त्यानें पूर्ण फायदा घेतला. मराठ्यांना येऊन मिळालेल्या दोन अडीच हजार पठाणांनीही याच वेळीं फितुरी करून मराठ्यांच्या फौजेंत व बुणग्यांत अधिकच धांदल उडवून दिली. अबदालीचा चांगलाच मोड झाला होता. सर्व मराठे

सरदार व त्यांच्या फौजा जोसांत होत्या. विश्वासराव पडला म्हणून मराठे सैनिकांनीं एकाएकीं इतकें घाबरून जाण्याचें कारण नव्हतें. भाऊनें या लोकांना आवरण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला. विश्वासरावाचें प्रेत पुन्हा अंबारींत बांधून ठेवलें. विजयाचीं शहाजणें वाजविलीं. घाबरटपणानें पळून जाणाऱ्या शिपायांची राळ उडवून त्यांची धावपळ थांबविण्याचाही त्यानें प्रयत्न केला असता. पण ज्या सरदारांना असे हुकूम द्यावयाचे ते होळकर व गायकवाडच माघारे फिरलेले पाहिल्यावर त्याचा इलाजच खुंटला. 'ब्रम्हांड कोसळलें तरी हिंमत सोडणार नाहीं' अशी भाऊची ख्याति होती. त्यानें ही गोष्ट सार्थ करून दाखविली व जे लोक त्याला मिळाले त्यांना बरोबर घेऊन गिलच्यांच्या फौजेची फळी फोडून व शेवटच्या सैनिकापर्यंत लढा चालू ठेवून हाणमार करीत तो पार निघून गेला हेंच खरें.

पानिपतचा हा विजय अबदालीलाही मोठासा फायद्यांत पडला, असें नाहीं. त्याचे दोन मुलगे व नामांकित सरदार या युद्धांत बळी पडले. मराठयांचा पराभव झाला तरी मराठे सैनिकांच्या व त्यांच्या सरदारांच्या शौर्यानें त्याचे डोळे दिपवून टाकले होते. मराठे आज पराभूत झालेले असले तरी त्यांच्याशीं शेवटपर्यंत आपण टिकाव धरूं शकणार नाहीं, हें त्याला पुरतेपणीं कळून चुकलें होतें. मोगल पातशाही मोडून त्या ठिकाणीं दुराणी पातशाही स्थापण्याची हांव त्यानें कधींच बाळगली नव्हती. दिल्लींत मराठे सरदार कोणी नाहींत,दिल्लीच्या बंदोबस्ताकरतां भाऊनें नेमलेला नारो शंकर फौजेसह पळून गेला हें त्याला कळल्यावर सात दिवसांनीं तो दिल्लीस आला. त्यानें नजीबास बक्षीगिरी व सुजास दिवाणगिरी बहाल केली. दिल्लीच्या मुकामांत त्याच्या फौजेनें दोन वर्षांचा तुंबलेला पगार चुकविण्याची व स्वदेशीं निघून जाण्याची मागणी केली. अबदालीला सुजानें या वेळीं पैशाची मदत केली नाहीं. तो हा गोंधळ पाहून अयोध्येस निघून गेला. अबदालीचें व त्याचें मनोमन नीट नव्हतेंच. मोठ्या शिकस्तीनें नजीबखानाकडून त्याला कांहीं लाख रुपये मिळाले. अबदाली अफगाणिस्थानांत नाहीं, असें पाहून इराणी फौजेनें अफगाणिस्थानावर स्वारी केली, अबदालीला ही खबर लागली. अनेक विवंचनांनीं तो आधींच त्रासून गेला होता. शालीमारची छावणी उठवून ता. १७६१ मार्चच्या शेवटच्या आठवडयांत त्यानें अफगाणिस्थानाकडे प्रयाण केलें.

दिल्लीची बादशाही अबदालीला नको होती. पण सतलजपर्यंत आपल्या राज्याची सीमा असावी, असें त्याला वाटत होतें. पण त्याची ही मनीषाही पुरी झाली नाहीं. पंजाबांत शिखांचा जोर वाढला व त्यांनीं लाहोर काबीज केलें. १७६१ च्या अखेरीस तो पंजाबांत आला व त्यानें लाहोर हस्तगत केलें. १७६२ च्या फेब्रुवारींत त्यानें शिखांचा पराभव केला, पण तो तात्पुरताच होता कारण तो निघून गेल्यावर शिखांनीं जोर मारून सर्व पंजाब पुन्हा आपल्या कबजांत आणला. अबदालीला याप्रमाणें हिंदुस्थानांत दोन शत्रू निर्माण झाले. तेव्हां त्यानें मराठयांकडे आपले वकील पाठवून त्यांच्याशीं तह करण्याचा प्रयत्न केला. नानासाहेब पेशवा या वेळीं जिवंत नव्हता. पानिपतनंतर मराठयांची उत्तरेंतलि मुलुखगिरी ढिली पडली होती. तेव्हां दिल्ली येथें हिंगण्यामार्फत वाटाघाट होऊन त्याचे वकील गुलाबराज व आनंदराम पेशव्याकडे दक्षिणेंत आले. नगर येथें या वकीलांचा बंदोबस्त पेशव्यांनीं ठेवला होता. "तो कैलासवासी यांच्यावेळेस ज्याप्रमाणें अंमल होता त्याप्रमाणें परगणियांत अमल शहानीं करावा. याप्रमाणें झाल्यास वकीलांस चाळीस हजारांची जहागीर अंतर्वेदींत देण्याचा करार पेशव्यानें केला." अबदालीकडून आलेला पोशाख पेशव्यांनीं स्वीकारला व पेशव्यानीं भद्रगज हत्ती अबदालीस नजर केला. अबदालीनें मराठयांशीं कशी तरी लाडीगोडी केली पण शिखांनीं त्याला पंजाबांत थारा न देतां साफ उठवून लावला. यानंतर पांच वर्षांनीं तो पुन्हा हिंदुस्थानांत आला. पण शिखांच्या सामर्थ्यापुढें त्याला कांहीं करतां आलें नाहीं. आला तसा तो हात हालवीत परत गेला. हिंदुस्थानांतील मराठयांच्या सत्तेला सारखा शह देणारा हा पुरुष १७७२ त काळपुळीच्या विकारानें चमननजीक मरण पावला. मरणसमयीं त्याचें वय केवळ ४८ वर्षांचें होतें. नादीरशहापेक्षांही शूर, कर्तृत्ववान, मुत्सद्दी व मुसलमानांनीं ज्याच्याबद्दल अभिमान बाळगावा असा हा पुरुष होता.

पानिपतच्या पराभवानें मराठयांची एक सबंध पिढी कापली गेली या म्हणण्यांत थोडी अतिशयोक्ति असली तरी मराठी फौजेंतलि हजारों सैनिक व इतर बिनलष्करी लोक पठाणी सैन्याच्या तरवारींना बळी पडले ही गोष्ट खरी आहे. पण त्यामुळें मराठी साम्राज्यसत्तेला धक्का बसला असें

मात्र म्हणतां येत नाहीं. गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांत मराठ्यांना पराजय ही काय चीज आहे, हें माहित नव्हतें. नागोर येथें मारेकरी घालून जयाप्पा शिंदे याचा खून करण्यांत आला. पण त्याचा वचपा ताबडतोब घेण्यांत आला. शुक्रतालावर अडचणींत अडकवून दत्ताजीचा केलेला वध तर पानिपतच्या मोहिमेची नांदीच होती. या दोन्ही प्रसंगांनीं मराठे मुळींच गांगरले नाहींत. उलट दुप्पट त्वेषानें व तयारीनें त्यांनीं रजपुतांना हात दाखविला व त्याचप्रमाणें अबदालीवरही ते चालून गेले. पानिपतच्या पराभवानें मराठ्यांचा हा आवेश अगदीं अल्पकाल मावळला. नानासाहेब पुत्रशोकानें व विशेषतः बंधुशोकानें 'भाऊ भाऊ' करीत पर्वतीवर वारल्या-नंतर नानासाहेब व भाऊसाहेब यांच्या इतकाच कर्तृत्ववान व शूर पुरुष पेशवा झाला व त्यानें आपली उत्तरेकडली पडलेली बाजू मोठ्या कर्तब-गारीनें सांवरून धरली. पानिपतच्या पराभवानें मराठी सत्तेला तसा खरो-खरीच हपका बसता तर पेशवाईचे शत्रू हिंदुस्थानांत थोडथोडके नव्हते. त्यांनीं ही संधि साधून तिला केव्हांच नामशेष करून टाकलें असतें. भाऊ-सारखा कर्ता व शूर पुरुष एकाएकीं नाहींसा झाला, मराठी सत्तेला कधीं माहित नसलेला पराभवाचा प्रसंग पहावा लागला, आणि याच प्रसंगीं गेलीं वीस वर्षें बहादरीनें पेशवाईचा कारभार चालविणारा नानासाहेबही मृत्यु पावला; तरीसुद्धां मराठ्यांनीं न डगमगतां आपल्या सत्तेला स्थिरता आणली, हें निर्विवाद आहे.

पानिपत येथें मराठ्यांचा पराभव झाला याची परंपरा शोधून काढून त्यावर चर्चा करीत बसण्याचें हें स्थल नाहीं. पराभव झाला त्या अर्थीं कोठें तरी चूक झाली असलीच पाहिजे. या पूर्वग्रहानें दूषित होऊन पानिपतच्या या घटनेकडे पाहणाऱ्या माणसाला सगळीकडे दोषच दोष दिसूं लागतात. पण असल्या अशुद्ध, बेहिंमती व पराभूत वृत्तीला थारा न देतां या प्रसंगाचा विचार केला तर पानिपतचा पराभव हा एक आकस्मिक प्रसंग होता असेंच म्हणावें लागेल. दोन्हीही पक्ष समबल होते. भाऊनें आपल्या सेनेंतलि एकोपा शेवटपर्यंत कायम राखला होता. प्रत्येक हालचाल त्यानें सर्वानुमतें ठरवून केली होती. लढाईच्या ऐन प्रसंगीं तिला त्यानें थोडें निराळें वळण दिलें तरी त्यामुळें कांहींच बिघडलें नव्हतें. एवढ्या

मोठ्या लढाईच्या वेळीं लागणाऱ्या सर्व प्रकारच्या तजविजी त्यानें आगाऊ करून ठेवल्या होत्या, म्हणूनच हा पराभव झाला तरी मराठ्यांना आपल्या सत्तेची सावरासावर तावडतोब करतां आली, हें लक्षांत ठेवलें पाहिजे आणि याचें सर्व श्रेय भाऊच्या कर्तबगारीला व सर्वगामी हुशारलाच दिलें पाहिजे. पानिपत व त्याच्या आसपासच्या रणक्षेत्राच्या सीमाभूमीत काय जी कत्तल झाली तेवढीच. पण या भागांतून बाहेर पडल्याबरोबर लागणाऱ्या प्रदेशांतील जनतेनें त्यांना हरतऱ्हेची मदत केली. सुरजमलनें व त्याच्या राणीनें या आपद्ग्रस्त लोकांना मदत करण्यासाठीं आपला खजिना मोकळा केला. युद्धाचा काय निकाल होतो तें पाहूं या विचारानें जे रजपूत राजे तटस्थ राहिले होते त्यांनीं मराठयांचा पराभव झालेला पाहून त्यांच्यावर अत्याचार केल्याचें आढळलें नाहीं. उलट युद्धाचें हें वातावरण नाहींसें होतांच चौथाई व सरदेशमुखीचे वसूल मराठयांना बिनबोभाट करतां आले. या मराठयांच्या कामाला कोणीही अडथळा केलेला दिसत नाहीं. भाऊनें या बाबतींत घालून दिलेल्या पद्धतीचा हा परिणाम होता. पानिपतच्या पराभवामुळें मराठयांची सत्ता नामशेष होण्याच्या पंथास लागली हें म्हणणें केवळ अतिशयोक्तीचें व पराभूत वृत्तीचें दिग्दर्शक आहे. या पराभवामुळें दिल्लीच्या बादशाही सत्तेचें मात्र फारच नुकसान झालें, या सत्तेला असलेला मराठयांचा आधार तुटला. पण ही उणीवसुद्धां मराठयांनीं पुढें भरून काढली. महादजी शिंद्यानें दिल्लीचा बादशहा शहाअलम याला मदत करून दिल्लीची पातशाही राखली व तिच्यावरचें मराठयांचें वर्चस्वही राखलें.

---

# “ भाऊसाहेब, खरे ”

पानिपतच्या ‘ भाऊ गर्दी ’तून भाऊ सहीसलामत बाहेर पडला ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे. सुजाच्या वकील काशीराय यानें विश्वासरावाच्या देहास यथाविधी अग्नि दिला त्याचप्रमाणें एकीकडून एक धड आणून व एका दुराणीनें आणून दिलेलें शिर त्याला जोडून व सदाशिवराव भाऊचें हें प्रेत आहे, असें ठरवून त्याचेंही त्यानें विधीपूर्वक दहन केलें. त्याबद्दलचें पत्रही त्यानें पेशव्यास पाठविलें व सुजानें आजवर केलेल्या अपराधाची क्षमा मागितली. पण या पत्रावर पेशव्यानें विश्वास ठेवलेला दिसत नाहीं.

सदाशिवरावभाऊ भाऊगर्दीत घुसला व दिसेनासा झाला. एवढया-वरून तो मरण पावला नसावाच असें म्हणतां येत नसलें तरी पानिपतच्या या प्रसंगानंतर भाऊच्या हालचालींसंबंधानें ज्या वाटाघाटी सुरू झाल्या व त्या बाबतींत शोध करण्याबद्दल पेशव्याचीं जीं निवडक पत्रें येऊं लागलीं त्यावरून पानिपतच्या रणांगणांतून तो जिवंत बाहेर पडला असेंच सर्वांना वाटूं लागलें होतें, यांत शंका नाहीं.

‘ भाऊ गर्दीत ’ भाऊ दिसेनासा झाला. जनकोजीचेंही असेंच झालें. जनकोजीच्या शोधाकरितां जोराचा प्रयत्न करावा, अशीं पत्रेंही नानासाहे-बानें उत्तरेंत पाठविलीं व एका पत्रांत तर ‘ उपरि राजश्री भाऊ व जन-कोजी शिंदे यांचें ठीक वर्तमान कळत नाहीं. पावणे दोन महिने युद्धास झाले. तुम्हास ठीक कलले असेल आणि लिहीत नाहीं, हें अपूर्व आहे. तुम्ही सरकारचे चाकर आहां, काये मजकूर, कोणीकडे गेले, कसे जाहले हें स्पष्ट उगवून लिहिणें ’ * असें लिहून भाऊ व जनकोजी यांचा तपास करावा असें नानासाहेबानें पत्र पाठवून खुलासा मागविला आहे. *

---

* भा. इ. सं. मं. त्रै. व. २५ पा. १४५ हिंगणे दप्तर खंड १.

आणखी एक त्याच तारखेचें पत्र खुद्द जनकोजीस नानासाहेबानें पाठविलें त्यांत पुढील मजकूर आहे.

'राजश्री जनकोजी सिंदे गोसावी यासी...तुम्हीं स्वस्ति क्षेम आला, हें श्रवण होऊन जो आनंद जाहाला तो पत्री कोठवर ल्याहावा. परंतु तुम्ही काहींच न लिहिलें अपूर्व आहे. या उपरी सविस्तर संतोषवून लिहीत जावे. तुम्ही यंदा छावणीस देसी यावे, दसरा होतांच फौज ठेवून हिंदुस्थानांत जावे. राजश्री मल्हारजी होळकर हिंदुस्थानांत छावणीस राहतील.'

या तिन्ही पत्रांवरून भाऊ व जनकोजी पानिपतच्या रणांगणांतून अब-दालीच्या सैन्यांत हाणमार करीत करीत जिवंतपणीं बाहेर पडले व तेथेंच कोठें आसपास गुप्तपणें राहिले अशीच सर्वांची समजूत होती व हे दोघे जण पुढें जाटाच्या मुलखांत गेले अशाही खबरा बाहेर आल्या. या सर्व खबरांवरून भाऊ व जनकोजी दोघेही एकत्र होते व दोघेही गांवोगांव गुप्तपणें संचार करीत होते अशी मात्र कोणीही खबर दिलेली दिसत नाहीं. भाऊ व जनकोजी दोघेही एकमेकांचा एकमेकांना पत्ता न लागतां एकेकटेच फिरत होते. पानिपतचें अखेरचें युद्ध ता. १४ जानेवारी १७६१ रोजीं सकाळीं सुरू झालें व तिसरे प्रहरीं खतम झालें. यानंतर सात आठ दिव-सांनीं अबदाली दिल्लीच्या बाजूला आला. तो मार्चमध्यें परत आपल्या देशास गेला. वास्तविक या दोन महिन्यांत मराठे एकत्र होऊन अबदाली-वर पुन्हा कां चालून गेले नाहींत, असें विचारणारांना युद्धशास्त्रच माहीत नाहीं, असें म्हणावें लागेल. खुद्द नानासाहेब दक्षिणेंतून वर येत असतांना माघारा परतला हेंसुद्धां यथायोग्यच होतें. नानासाहेब प्रकृतीनें खालावला असेल पण तो भिऊन माघारा गेला किंवा नुकत्याच पैठणास केलेल्या नूतन भार्येची भीड त्याला मोडवली नाहीं, म्हणून तो माघारा गेला असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. कांहीं म्हटलें तरी मराठी फौजेनें शिकस्त खाल्ली होती. ती बेहिंमत झाले होती. पानिपताजवळ मराठी सैन्याची व बुणग्यांची झालेली कत्तल व वाताहात यांच्या बातम्या कर्णोपकर्णीं नाना-साहेबांच्या छावणींत येऊन धडकत होत्या. अशा परिस्थितींत कोणता शहाणा सेनानी पुन्हां शत्रूवर चढाई करून जाण्याच्या कामास हात घालील ? गिरणीमालकाच्या विरुद्ध कामगारांनीं अगदीं एकजुटीनें कितीही जोराचा

संप केला व तो कांहीं दिवस हिंमतीनें चालविला असला तरी हा संप एकदां मोडल्यावर मालकांनीं तावडतोब कसलींही जुलमाचीं कृत्यें केलीं तरी कामगारांना पुन्हा लगेच संपावर जाणें शक्य नसतें. मालक-मजुरांच्या साध्या लढ्यांत सुद्धां हा अनुभव येतो. पानिपतचा संग्राम हा हिंदुस्थानांतील दोन प्रचंड लष्करी शक्तींचा सामना होता. या सामन्यांत पराभव पावल्या-नंतर मराठ्यांजवळ यानंतर कितीही फौज शिल्लक असली तरी ते पुन्हा तावडतोब अबदालीवर चालून गेले नाहींत, हेंच शहाणपणाचें होतें, असेंच म्हटलें पाहिजे.

युद्धांतून आपण सहीसलामत बाहेर पडलों तर दिल्लीस येऊं व तेथून पुन्हा चढाईची तयारी करूं असाच, भाऊचा लढाईच्या पूर्वरात्रींचा मनसबा होता असें दिसतें. विसाजी जोगदंडाकडे पार्वतीबाईच्या संरक्षणाची तजवीज सोंप-विली त्यावेळीं भाऊनें पार्वतीबाईला वरील परिस्थितींत दिल्लीस आणून पोंचवावी असेंच सांगितलें होतें. आपला पति दिल्लीला खात्रीनें गेला असेल तेथें तो आपल्याला भेटेल, असें पार्वतीबाईला वाटत होतें. पण तिची बिच रीची निराशा झाली व कर्मधर्मसंयोग असा कीं, पुढें कितीही उलथा-पालथी झाल्या तरी भाऊची व तिची अखेरपर्यंत भेट होऊं शकली नाहीं. असो. पण पानिपतच्या संग्रामानंतर भाऊ रणभूमींतून बाहेर पडला तरी लगेच दिल्लीकडे जाण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं. पानिपतास मराठी फौजेनें जी माघार घेतली होती ती यशस्वी माघार नव्हती. शिस्तीनें घेतलेली ही माघार नव्हती आणि दुसरी नामुष्कीची गोष्ट ही कीं, मराठी फौज दिल्लीकडे येण्यापूर्वींच दिल्लीच्या बंदोबस्ताकरतां राहिलेल्या नारो शंकरनें केव्हांच दिल्लीहून पलायन केलें होतें. अशा परिस्थितींत दुसरें कोठेंही न जातां भाऊला कोठें तरी गुप्तपणें राहूनच दिवस काढणें भाग होतें. तोतये पुढें येण्याला अशाच प्रकारची परिस्थिति निर्माण व्हावी लागते. माणूस जिवंत तर खराच पण त्याचा पत्ता मात्र कोठें लागत नाहीं, अशा वेळीं तोच माणूस मी असें सांगून कोणी दुसरांच माणूस पुढें येतो व या गुप्त राहिलेल्या माणसाशीं असलेलें आपलें साम्य जितक्या प्रमाणांत बेमालुमपणें तो वठवितो तितक्या प्रमाणांत तो त्या माण-साच्या नातेवाइकांना भ्रमांत पाडतो व इतर समाजालाही तो फसवूं

शकतो. केवळ पुरुषाच्या बाबतींतच ही गोष्ट शक्य असते असें नाहीं तर स्त्रियांच्या बाबतींतही असा प्रकार होऊं शकतो. सवाई माधवरावाची बायको यशोदाबाई मीच असें सांगून पेशव्यानंतर सुरू झालेल्या इंग्रजी अमदानींत एक बाई पुण्यास आली व तिनें कित्येक खानदानी घराण्यांतील मंडळींना फसविलें व पेशव्याचा खजीना पुरंदर किल्ल्यावर कोठें पुरून ठेवलेला आहे हें आपल्याला माहित आहे असें सांगून कित्येक मंडळींना तिनें भुरळ घातली होती असें म्हणतात. यशवंतराव पवाराच्या बाबतींतही असाच एक तोतया पुढें आला होता. अशा प्रकारचीं तोतयाचीं उदाहरणें पुष्कळच देतां येतील.

पानिपतच्या रणक्षेत्रांतून अशा रीतीनें गुप्तपणें बाहेर पडलेले दोन मोठे पुरुष म्हणजे भाऊ व जनकोजी हे होत. जनकोजी मीच आहे असें सांगणारा एक पुरुष उत्तरेंत एक दोन वर्षांनीं पुढें आला. पण तो जनकोजी नसून तो रघुनाथ थोरात नांवाचा इसम होता, असें ठरवून त्याला ठार करण्यांत आलें. केव्हां केव्हां असें सुद्धां होतें कीं, गुप्तपणें वावरणारा असा पुरुष, अगदीं स्वतः तोच असलेला, प्रकट झाला तर त्याचें अस्तित्व ज्यांना अहितकारक असतें अशा लोकांकडून तो तोतया ठरविला जातो व त्याचें अस्तित्व बाधक न होईल अशी त्याची कायमची व्यवस्था करण्यांत येते.

जनकोजीच्या बाबतींत असा प्रकार झाला कीं काय, हें सांगण्याला सबळ पुरावा कोठें मिळत नाहीं. खरा जनकोजी प्रकट झाला होता व 'तुम्ही यंदा छावणीस देशी यावे. दसरा होतांच फौज ठेवून हिंदुस्थानांत जावें' असें पत्र नानासाहेबानें पाठविलें होतें, ही गोष्ट हिंगणे दप्तरांत नमूद झालेली आहे. पण हा खरा जनकोजी नव्हता, वर लिहिल्याप्रमाणें ज्याला रघुनाथ थोरात ठरविलें तोच हा होता कीं काय, हें समजण्यास मार्ग नाहीं. खरा जनकोजी पुन्हा प्रकट झाला असतां तर तो पुण्यास आला असता व फौज जमवून परत हिंदुस्थानांत गेला असतां तर महादजीच्या मार्गांत त्याचा एक मोठा अडथळाच झाला असता हें उघड आहे. तेव्हां महादजीच्या लोकांनीं या जनकोजीला खोटा ठरवून त्याचा कायमचा निकाल लावला कीं काय अशी स्वाभाविक शंका येते. सरंजामशाही युगांत असले भावानें भावांचे खून करणें ही तर सामान्य गोष्ट आहे. जनकोजीच्या

बाबतींत असला अत्याचार झाला असेल काय ? पण या संबंधांत कोठें पुरावा आढळत नाहीं. त्यावेळच्या कागदपत्रांतून यासबंधानें वाटाघाटही झालेली दिसत नाहीं. पण भाऊच्या बाबतींत मात्र असा घोटाळा झाला आहे. भाऊचें तोतयाचें प्रकरण सहजासहजीं निकालांत निघालें नाहीं. १७६५ च कां तर १७६२ पासून ते १७७७ पर्यंत १५ वर्षें या प्रकरणाचा ऊहापोह पेशवाई कारभारांत चालू होता.

भाऊसाहेबांच्या संबंधात एकंदर तीन तोतये पुढें आले. मी भाऊसाहेब आहे असें सांगणारा एक पुरुष १७६३ मध्यें काशीच्या भागांत प्रकट झाला. या ठिकाणीं आपल्या भोंवतीं लोक जमवून त्यानें दंगा मांडला असें इलीयटच्या इतिहासांत म्हटलें आहे. पण हा दंगा कोणत्या स्वरूपाचा होता, हें त्यानें सांगितलें नाहीं. भाऊसाहेब म्हणून सांगणारा पुरुष लोकांना अप्रिय होतील अशीं कृत्यें करणे शक्य नाहीं. त्यांचा दंगा म्हणजे मराठयांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें तिकडील चौथाई सरदेशमुखीच्या खंडण्या वसूल करणें. पण या उद्योगास त्यानें प्रारंभ केला असल्यास तें अशक्य नाहीं. अर्थात् या भागांतील लोकही त्याला वश झाले. शिंद्यास ही बातमी लागली. त्याचे दिवाण जिवबादादा बक्षी काशीकडे आले. त्यांनीं या तोतयास पकडलें व हा भाऊसाहेब नसून त्याचा तोतया आहे, असें ठरवून त्याला चुनारच्या किल्ल्यांत ठेवलें. पुढें तो गोरखपूर येथें मरण पावला.*

यानंतर थोड्याच दिवसांत झांशी प्रांतांतील नरवर गांवीं भाऊसाहेब म्हणून ज्या पुरुषाला ओळखण्यांत आलें त्याची हकीगत देण्यापूर्वीच कर्नाटकांत प्रसिद्धीस आलेल्या तिसऱ्या तोतयाची हकीगत देणें सोयिस्कर आहे. १७६९ मध्यें कर्नाटकांत आपणास सदाशिवराव भाऊ म्हणून म्हणवून घेणारा एक पुरुष पुढें आला. हैदर अल्लीनें त्याला आश्रय दिला. आपल्या दरबारांत त्याला मानमरातबानें ठेविलें +मोठें सैन्य जमवून तो महाराष्ट्रांत आला, त्यानें बंडाळी माजविली. बंड नानांनीं मोडविलें. तोतया ठरवून या इसमास देहांत शासनाची शिक्षा दिली. पण ती अमलांत न आणतां त्याला नगरच्या किल्ल्यांत नेऊन ठेवलें.×

* अधिकारयोग खरे, पा. ४३

+ नाना फडणवीस यांचे चरित्र—देव, पा. ३१. ×जिवबादादा बक्षी पा. ७९

गोरखपुरला मरण पावलेला व कर्नाटकांत प्रसिद्धीस आलेला अशा या दोन तोतयांच्या हकीकतीनंतर झांशी प्रांतांत सदाशिवरावभाऊ म्हणून ओळखल्या गेलेल्या पुरुषाच्या हकीगतीकडे वळूं. झांशीच्या भागांत हा पुरुष गोसाव्याच्या वेषांत फिरत होता. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, पानिपतच्या गर्दीत नाहींसा झालेला सदाशिवरावभाऊ मी आहे असें हा पुरुष स्वतः होऊन सांगत सुटला नाहीं. त्याला इतरांनीं हा सदाशिवराव भाऊ आहे, असें ओळखलें. या वेळीं प्रवासानें थकून नरवर गांवीं एका वाण्याच्या दुकानाजवळ विश्रांतीकरतां तो बसला होता. या गांवांतील शंभुपुरी पंथाच्या गोसाव्याच्या मठांत तो उतरला. अर्थात् ही बातमी बाहेर पसरली. आपल्यांतील एक वैरागी सदाशिवरावभाऊ आहे, असें कळल्यावर गोसाव्याचा महंत व त्याचे शिष्य सहजच त्याच्या भजनीं लागले.

नारो शंकरचा पुतण्या विश्वासराव हा नरवरजवळ असलेल्या करेरा किल्ल्यावर राहात होता. झांशी प्रांताच्या बंदोबस्ताचें काम त्याच्याकडे होतें. या विश्वासरावाजवळ कांहीं फौजही होती. आपल्या प्रांतांत सदाशिवराव आले आहेत. ते गोसाव्यांच्या मठांत आहेत, अशी बातमी त्याला लागल्याबरोबर त्यानें आपले कारकून व कांहीं स्वार नरवरास पाठविले. या लोकांनीं भाऊला ओळखून तसें विश्वासरावास कळविलें. एवढ्यानें विश्वासरावाचें समाधान झालें नाहीं. त्यानें एका सरदाराला नरवर मुक्कामीं पाठविलें. या सरदाराबरोबर चारशें स्वारही दिले होते. या सरदाराचीही खात्री पटली कीं, पानिपतच्या संग्रामांत नाहींसे झालेले सदाशिवराव भाऊ हेच आहेत. या परिस्थितींत भाऊला यापुढें गुप्त राहणें शक्य नव्हतें. त्या वेळीं त्यानें त्या सरदाराबरोबर विश्वासरावास सांगून पाठविलें कीं, आपण लवकरच करेऱ्यास येणार आहों, त्या वेळीं तेथें आम्हाला भेटावें. यानंतर थोड्याच दिवसांनीं भाऊ करेऱ्यास किल्ल्यावर गेला. त्यावेळीं विश्वासराव त्यास सामोरा गेला व मोठ्या समारंभानें त्यानें त्यास किल्ल्यावर नेलें. भाऊ हे करेऱ्याच्या किल्ल्यावर येऊन राहिले. सदाशिवराव भाऊ याप्रमाणें प्रकट झाले, ही बातमी उत्तर हिंदुस्थानांत प्रांतोप्रांतीं पसरली. हिंदुस्थानांतील मामलेदार व कमाविसदारांच्या नेमणुका भाऊनेंच केल्या होत्या. हे महालोमहालींचे कमाविसदार भाऊला येऊन भेटले. करेऱ्याच्या किल्ल्यावर असलेला भाऊ

सदाशिवराव भाऊचा तोतया नाहीं. ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत अशी या कमाविसदारांचीही खात्री झाली. समशेर बहाद्दरच्या मेहुण्यानें थोरल्या माधवरावाचा भाऊ नारायणराव यास पत्र पाठवून ही सर्व हकीकत कळविली. हें पत्र फारशींत होतें. त्यांत सदाशिवरावभाऊ खरे असल्या-बद्दल स्पष्ट उल्लेख होता. " भाऊसाहेब खरे " लवकरच येतील, आम्ही समागमेंच आहो, असें दोघां भिक्षुकांनीं पार्वतीबाईस पत्रद्वारा कळविलें. " भाऊसाहेबांच्या तोंडावर जखम आहे, त्र्यंबकेश्वरास जाऊन डोईचे केस काढावे, गोसाव्याचा वेष टाकून द्यावा. समागमें फौज गोसावी दोन हजार व धोंडाजी पवार दोन हजार व भिल्ल कोळी दोन हजार याप्रमाणें आहे. देसची बोली बोलत नव्हते तीही बोलूं लागले " अशा मजकुराचीं पत्रें दक्षिणेंत येऊं लागलीं. भाऊसाहेबाच्या स्वारींत आपण वीस दिवस होतों, भाऊसाहेब खरोखर आहेत, अशी आपली खात्री झाली आहे असेंही एकानें आपल्या पत्रांत लिहिलें. करेऱ्यास असतांना शिवाजीपंत मुजूमदार व आबाजीपंत चिटणीस व आणखी कांहीं सरदार मंडळी ग्वाल्हेरहून आपल्या लवाजम्यासह करे-ऱ्यास गेली. भाऊंनीं त्यांच्याकडून फौजेच्या उभारणीकरतां पैसा घेतला. झांशी, ग्वाल्हेर, भेलसें या भागांतील लोकांसही भाऊसाहेब प्रकट झाल्या-बद्दल आनंद वाटला. भाऊंनीं करेऱ्यास असतांना फौज उभारली. करेऱ्या-हून दक्षिणेकडे त्यांनीं मुक्काम हलविला त्यावेळीं हत्ती, घोडे, तोफा, गारदी, डेरे, राहुट्या, पालख्या, नौबती, निशाणें हा पेशव्याप्रमाणें सर्व थाटाचा सरंजाम त्यांच्याबरोबर होता. प्रारंभींच्या फौज उभारणीकरतां त्यांनीं लोकांकडून पैसा घेतला पण ते जेव्हां दक्षिणेकडे निघाले त्यावेळीं या सरं-जामास लागणारा खर्च भागविण्याकरतां ते ठिकठिकाणीं खंडणी वसूल करूं लागले. भाऊसाहेब हे पेशव्याच्या घराण्यांतील खाश्या स्वारींपैकीं एक होते. त्यांना तसा हक्कच होता. याप्रमाणें भाऊ फौज जमा करून पेशवाई थाटानें दक्षिणेंत अर्थात् पुण्याकडे यावयास निघाला व मजल दरमजल करीत तो खानदेशांत उतरला. तेव्हां त्याच्या या सर्व हालचालींच्या बातम्या पुण्यास सारख्या येऊन धडकूं लागल्या. विंचूरकर, नारो शंकर, शिंदे, होळकर या लहानमोठ्या सरदारांच्या फौजा हिंदुस्थानांत होत्या त्यांतील लोकांचीं पत्रें ' भाऊसाहेब खरे ' असल्याबद्दल व तो दक्षिणेकडे येत असल्याबद्दल

पुण्याकडील आप्तइष्टांना येऊं लागलीं. वेदमूर्ति धोंडभटजी दात्ये या नांवाचे एक भटजी १७६५ च्या जानेवारींत उत्तरेकडून पेशव्याच्या लष्करांतून मिरजेस आले. भाऊसाहेब प्रकट झाल्याबद्दल उत्तरेकडे जो प्रकार त्यांना दिसला त्याहून भिन्न प्रकार त्यांना पुण्याच्या पेशवे दरबारांत दिसून आला. मिरजेस गोविंद हरी पटवर्धन यांना भेटतांच ते म्हणाले कीं, "श्रीमंत भाऊसाहेब खरे. परंतु दरबारी कोणास तिकडील अगत्यच नाहीं. खबर कोणी सांगितली तर लटकी होते. त्यास दगा झाला होता. परंतु खैर झाली. करेराहून ते मागती नरवरास गेले. धोंड भटजींचें हें मतप्रदर्शन किती तरी गोष्टींवर प्रकाश पाडणारें आहे. उत्तरेंतून भाऊसाहेब प्रकट झाल्यावर दक्षिणेकडे येत असल्याबद्दल पत्रांवर पत्रें येऊं लागलीं, भाऊसाहेब खरे असल्याबद्दल जो तो छातीवर हात ठेवून आपापल्या पत्रांमधून कळवूं लागला, यामुळें पुण्यास व विशेषतः पेशव्याच्या मुत्सद्दी मंडळांत व शनिवार वाड्यांतील खाश्या मंडळींत खळबळ उडून जाणें स्वाभाविक होतें. पण ही खळबळ भाऊसाहेबांच्या प्रकट होण्याच्या या घटनेला अनुकूल होती असें मात्र दिसत नाहीं.

**सदाशिवरावभाऊ पानिपतच्या मोहिमेंत यशस्वी झाले असते तर,** हिंदुपदपातशाहीचें साम्राज्य अफगाणिस्थानापर्यंत पसरलें असतें. कर्नाटकांत प्रस्थापित झालेल्या मराठी सत्तेनें सेतुबंध रामेश्वर गांठला असता. गुजराथच्या सरदारांनीं कराचीवर व बंगालवर स्वारी करणाऱ्या मराठ्यांनीं कलकत्त्यावर भगवे झेंडे रोवले असते. मल्हारबा होळकराला वाटणाऱ्या भीतीप्रमाणें पेशव्यानें म्हणजे भाऊनें जासूदाकरवीं खंडणीचा वसूल केला असता. मराठी साम्राज्याची मध्यवर्ती सत्ता प्रबल झाली असती. या साम्राज्याकडे कोणी वांकड्या नजरेनेंही पाहूं शकला नसता. भाऊसाहेबासारखा कर्तबगार नेता मराठी साम्राज्यास मिळाल्यामुळें साम्राज्याचें लष्करी सामर्थ्य जसें वाढलें असतें त्याचप्रमाणें सरंजामशाही युगाचा नाश करणारें व भांडवलशाही युगाला प्रारंभ करणारें ऐतिहासिक कार्य घडून येण्यास या यशाचा व त्यामुळें प्रस्थापित झालेल्या एकमुखी सत्तेचा फार उपयोग झाला असता व अपरिहार्यपणें हिंदुस्थानच्या प्रचंड औद्योगीकरणाला सुरुवात होण्यास वेळ लागला नसता.

पानिपतच्या अपघातामुळें इतिहासाच्या या स्वाभाविक प्रगतीला एक जबरदस्त धक्का बसला. भाऊसारख्या सर्व लहानमोठ्या सरदाराच्या डोक्यावर मिरे वाटणाऱ्या मध्यवर्ती सत्तेच्या या पुरस्कर्त्याच्या कर्तृत्वाची माती झाली. विठ्ठल शिवदेव व होळकरांसारख्या सरदारांना बरें वाटलें.

"पण या अपयशानंतर भाऊसाहेब प्रकट झाले. आणि खरोखरच त्यांच्या दक्षिणेंत येण्याच्या मार्गांत कोणताही अडथळा न येतां आपल्या इतमामासह ते पुण्यास दाखल होऊन योग्य तो अधिकार त्यांनीं हातीं घेतला असता तर."

ही कल्पना सुद्धां क्रांतिकारक अशीच आहे. सदाशिवरावभाऊ कोणत्याही प्रकारचा अडथळा न येतां त्यांचें सर्वत्र स्वागत होऊन पुन्हा पहिल्याप्रमाणें पेशव्याच्या कारभारीपणाच्या आपल्या हक्काच्या जागीं आरूढ झाल्याबरोबर मराठी साम्राज्याची घडी त्यांनीं पुन्हा बसविली असती, तिचा दर्जा वाढविला असता व अटकेवरला उतरलेला भगवा झेंडा पुन्हा त्याच स्थानावर फडकत ठेवला असता व त्याचप्रमाणें अधिकारारूढ झाल्याबरोबर पानिपतच्या लढाईत ज्या लोकांनीं कुचराई केली त्यांचा समाचार घेतला असता. पानिपताहून पळून आलेल्या सरदारांना ही गोष्ट फारच जड गेली असती.

एकाद्या ध्येयाला बिलगून राहून त्याच्या सिद्धीकरतां सतत पराकाष्ठा करीत झटत राहणें हा सरंजामशाहीचा स्वभावच नसतो. या युगांतील राजे, राजघराण्यांतील व इतर सरदार दरकदार जितके सत्ताभिलाषी असतात तितके ते कधींच ध्येयनिष्ठ असत नाहींत. पेशवाई या नियमाला मुळींच अपवाद नव्हती. पहिल्या दोन पेशव्यांच्या कारकीर्दींत या दोषाचा शिरकाव झाला नाहीं. पण नानासाहेबाच्या मनांत मात्र या सत्ताभिलाषाच्या म्हणजे सैतानानें प्रवेश केला व आपल्या सख्या चुलत भावाच्या सदाशिवराव भाऊच्या कर्तृत्वासंबंधानें त्याला असूया वाटूं लागली. त्याची बायको गोपिकाबाई हिनेंही या असूयेचें पोषण केलें. नानासाहेबाला भाऊबद्दल असूया वाटूं लागली, याचें मूळ गोपिकाबाईच्या स्वभावांत होतें. गोपिकाबाईनें त्याला तसें बनविलें हें खरें आहे. तथापि मराठी सत्तेच्या वाढत्या कालांत व वाढत चाललेल्या कारभारांत त्याला भाऊची चांगलीच

भरीव मदत असल्यानें या असूयेची वाढ फारशी होऊं शकली नाहीं. भाऊला टाळून पेशवाईचा सर्व दृष्टीनें व्यापक होत चाललेला कारभार एकट्यानें हांकणें नानासाहेबाला अशक्य होतें. पण पानिपतच्या अयशस्वी मोहिमेनंतर व नानासाहेबाच्या मरणानंतर पेशवाईच्या कारभारांत त्याच्या जहांबाज व कारस्थानी बायकोचा चांगलाच हात शिरला. आपल्या मुलांच्या हिताविरुद्ध जो कोणी येईल त्याचा अडथळा दूर करण्याच्या मार्गाला ती लागली. नवऱ्याच्या मरणानंतर अशा कारवाया करण्यास तिला चांगलीच सवड मिळाली. नानासाहेबानंतर माधवरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं पण त्याचा अधिकार अनियंत्रितपणें चालण्यास तिचा दीर रघुनाथराव याचा अडथळा होत होता. त्यांतच आतां भाऊसाहेब प्रकट झाल्यामुळें आणखी भर पडली असती. भाऊसाहेब प्रकट होणें व त्यानें पुन्हा पहिल्याप्रमाणें पेशवाईच्या कारभाऱ्याच्या जागीं अधिकारारूढ होणें हें मराठी सत्तेच्या व हिंदुपदपातशाहीच्या संरक्षणाच्या व वाढीच्या दृष्टीनें उचित व जरूर होतें. पण या सत्तेचीं सूत्रें ज्यांच्या हातांत होतीं त्या गोपिकाबाई व तिला पाठिंबा देणाऱ्या मुत्सद्यांना ही गोष्ट अर्थातच नको होती. पानिपतच्या मोहिमेला निघतांना मतभेद झाले म्हणून रघुनाथरावाला भाऊ आवडत नव्हता. रघुनाथराव व भाऊ यांचें मनोमनीं इतकें बिनसलें होतें कीं, पानिपतच्या मोहिमेंत रघुनाथराव तर आला नाहींच पण त्याचे पक्षपाती असलेल्या पटवर्धन सरदारांनाही भाऊनें आपल्या बरोबर घेतलें नव्हतें. अशा सर्व कारणांनीं पुण्याच्या दरबारी मंडळींना भाऊ नको होता. म्हणूनच धोंडभट दात्यानें 'दरबारी कोणास अगत्यच नाहीं! खबर कोणी सांगितली तर लटकी होत्ये' असे उद्गार काढले ते अगदीं सार्थ होते. इतकेंच नव्हे तर भाऊ प्रकट होऊन त्याला इतर कोणाचा पाठिंबा मिळण्यापूर्वी त्याचा फडशा करण्याचीही खटपट झाली होती, असें त्यानें दिलेल्या माहितीवरून स्पष्ट होतें. करेरा किल्ल्यावर असतांना भाऊसाहेबाला दगा झाला होता. पण खैर झाली, असें या दाते भटजीनें मिरजकर पटवर्धनास सांगितलें. भाऊसाहेब प्रकट होऊन करेऱ्यास तो आपल्या मंडळीची जमवाजमवी करण्यापर्यंतच्या कालांत त्याच्याविरुद्ध असलेल्या मंडळींपैकीं

कोणीतरी चपळाई करून त्याच्यावर मारेकरी घालण्याचा प्रयत्न केला होता, असें दिसतें.

पण करेऱ्यासच भाऊचा फडशा करण्याचा हा प्रयत्न फसला व भाऊसाहेब योग्य त्या फौजेची जमवाजमव करून खानदेशपर्यंत आला. थोरला माधवराव या वेळीं कर्नाटकांत स्वारीवर होता. त्याला या बातम्या कळतांच त्यानें एक पत्र गोपिकाबाईचा एक कारकून रामचंद्र नारायण गोरे यास १७६५ च्या जानेवारींत तुंगभद्रा तीरावरील होनहळ्ळी मुक्कामावरून पाठविलें. त्या पत्रांतील मजकूर पुढीलप्रमाणें आहे. "तीर्थस्वरूप राजेश्री भाऊसाहेब यांचें नांव करून खानदेशांत खूळ माजलें आहे. त्यास कित्येक कागद लोकांस लोकांचे येतात. त्यांत भाऊसाहेब खरे असें म्हणतात. कुफराणा तर खराच भाउसाहेबाची रीत अशी यावयाची वाटत नाहीं व मागेही एकदोन प्रकार लबाड झाले. तथापि खऱ्या लटक्याचा शोध करवून या अर्थें लिहिलें असे. तरी शाहणा माणूस दाट ओळखा पाठवून बारीक शोध करवून लिहून पाठविणें." या पत्रांतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. भाऊसाहेब प्रकट झाले. लोकांनीं त्यांना ओळखलें म्हणूनच ते प्रकट झाले व ज्यांनीं त्याला ओळखलें व आपली खात्री करून घेतली त्या लोकांकडूनच थोडीशी मदत मिळवून आपल्या मानमरातबाप्रमाणें कांहीं थोडी फौज ठेवून व आपल्या संरक्षणाची योग्य ती तजवीज करून ते दक्षिणेकडे यावयास निघाले. येतांना त्यांनीं कोठें दंगेधोपे किंवा लुटालूट केली नाहीं किंवा पुण्यावर स्वारी करून गादी बळकावण्यासाठींही ते स्वारीवर निघाले नाहींत. एकाद्या थोर दिलदार सरदाराप्रमाणें ते दक्षिणेंत यावयास निघाले. यांत त्याची येण्याची रीत कांही गैर होती, असें दिसत नाहीं. तो कुफराणा आहे म्हणजे* काफर आहे, लबाड आहे, असें म्हणण्यासारखें एकही कृत्य त्यानें केलें नाहीं. माधवरावानें असें जें पत्र लिहिलें त्यांत त्याचाही दोष दिसत नाहीं. पुण्याहून त्याला ज्या प्रकारचीं पत्रें गेलीं असतील त्याच्या आधारानेंच त्यानें असें भाऊच्या थोर स्वभावावर शिंतोडे उडविणारें पत्र लिहिलें. पुण्याच्या त्याच्या लोकांनीं माधवरावाला कांहींही विपरीत लिहून कळविलें असलें किंवा त्याचें मन भाऊसंबंधानें कलुषित करण्याचा प्रयत्न केला असला तरी शेवटीं अनेक लोकांचीं अनेक लोकांना यासंबंधाचीं पत्रें आलेलीं पाहून चांगल

शाहणा दाट ओळखीचा माणूस पाठवून भाऊसाहेबाचा नीट शोध लावावा, असें लिहिणें त्याला भाग पडलें, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यानंतर सहा महिन्यांनीं म्हणजे जूनच्या आठ तारखेस ( १७६५ ) माधवराव पेशवे पुण्यास आले. या वेळीं भाऊसाहेब होळकरांच्या कैदेत होते. माधवरावांच्या पत्राप्रमाणें ते खरे खोटे याचा नीट शोध कोणीच केलेला दिसत नाहीं. उलट भाऊसाहेब खानदेशांत आपल्या जुजबी फौजेनिशीं असतांना मल्हारराव होळकरानें त्याच्यावर हल्ला केला व त्यास पकडून आपल्या कबजांत घेऊन त्यांना नाशिकास आणलें.

मल्हारराव होळकर हे मराठशाहीतले वृद्ध व अनुभवी सरदार होते. भाऊसाहेबाला त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें होतें. भाऊ मल्हारबाच्या चांगल्या परिचयाचे होते. भाऊ पेशव्याच्या कारभारांत लक्ष घालूं लागल्यापासूनच्या वीस बावीस वर्षांच्या कालांत भाऊशीं निकट परिचय होण्याचे किती तरी प्रसंग मल्हारबाला आले होते. शिवाय तीन चारच वर्षांपूर्वी एक मोठी मोहीम मल्हारबांनीं व भाऊंनीं चालविली होती. अशा परिस्थितींत मल्हारबांनीं भाऊंना ओळखलें नसेल असें नाहीं. मल्हारबांनीं भाऊ खरे कीं, खोटे हें निश्चित मत दिलें असतें तर त्याविरुद्ध कोणी कांहींही बोलणें शक्य नव्हतें. भाऊसाहेब खरे नाहींत पण भाऊसाहेबाचा हा तोतया आहे, असेंही होळकरानें सांगितलेलें दिसत नाहीं. मल्हारबानें भाऊसाहेब खोटे आहेत, असें अगदीं स्पष्टच सांगितलें असतें तर कांहीं निराळाच प्रकार झाला असता. पण होळकरानें भाऊसाहेब खरा किंवा खोटा याचा निर्णय देण्याची जबाबदारी आपल्यावर घेतली नाहीं. भाऊसाहेबाला कैद करून त्याला नाशिकास आणून ठेवण्यापेक्षां त्यानें जास्त कांहींच केलें नाहीं. मल्हारबाच्या दुटप्पी व पाताळयंत्री धोरणास त्याचें हें वर्तन साजेसेंच होतें.

माधवराव कर्नाटकांतून पुण्यास आल्यावर भाऊसाहेबांनाही नाशिकाहून पुण्यास आणून त्यांना पर्वतीवरील गोशाळेंत ठेवण्यांत आलें. भाऊसाहेबास पुण्यास तर आणलें. यापुढे काय करायचें हा एक मोठाच चर्चेचा विषय पुण्याच्या दरबारी लोकांत झाला असला पाहिजे. पानिपतच्या मोहिमेवर निघतांना आंबेपडदुरावर जी चर्चा झाली त्यापेक्षांही पुण्याच्या शनिवार वाड्यांत

* महादजी शिंदे चरित्र—नातू पान. २८१

झालेली ही चर्चा अधिक कडाक्याची असली पाहिजे. या चर्चेत शेवटीं पर्वतीवर जाऊन भाऊसाहेबाशीं करारमदार करावा, असें ठरविण्यांत आलें. भाऊसाहेब खरे कीं खोटे हा प्रश्न आतां राहिला नव्हता. भाऊसाहेबाशीं करारमदार करून हें प्रकरण मिटवावें असाच या चर्चेनंतर निर्णय घेण्यांत आला, असें दिसून येतें. पण आयत्या वेळीं या निर्णयाला बगल देण्यांत आली. १५ आक्टोबर १७६५ रोजीं मुत्सद्दी व शास्त्री मंडळी जेव्हां पर्वतीवर गेली त्या वेळीं कांहीं निराळेंच धोरण स्वीकारण्यांत आलें. या लोकांनीं भाऊसाहेबांशीं करारमदार करण्याचें बाजूला राहून त्याला त्यांनीं तोतया ठरविण्याचा प्रयत्न केला. रामशास्त्री प्रभुण्यानें भाऊसाहेबांच्या हातांत बेलभंडारा देऊन त्याच्याकडून आपण सदाशिवराव भाऊ नव्हे तर आपण कनोजा ब्राम्हण आहों, आपलें खरें नांव सुखलाल आहे. आपल्या बापाचें नांव रामानंद, आईचें नांव अन्नपूर्णा व आजीचें मन्मथा आहे. असें खरें काय तें काढून घेतलें. अर्थात् त्याला तोतया ठरवून घनगडास किल्ल्यावर पाठवून तेथें कैदेंत ठेवण्यांत आलें.

१७६५ च्या आक्टोबरांत भाऊसाहेबाच्या खरेंखोटेपणाबद्दल ही जी चौकशी करण्यांत आली तिचें स्वरूप अशाप्रकारचें होतें. रामशास्त्री प्रभुणे हा एक सच्च्या न्यायाधिश म्हणून इतिहासांत प्रसिद्धी पावला आहे. रामशास्त्री हा खराखुरा न्यायाधीश असता तर त्यानें या बाबतींत असल्या जादुटोण्यांच्या मार्गांचा कां अवलंब करावा, हा एक प्रश्नच आहे. खरा न्यायाधिश अशा वाममार्गाचा कधींच अवलंब करणार नाहीं. खरा न्यायाधीश प्रत्यक्ष पुराव्याला अधिक महत्त्व देतो, देवाची शपथ घेऊन व बायबलचें चुंबन घेऊन दिलेल्या साक्षीवर एकादा न्यायाधीश विश्वास ठेवू लागला व तोच पुरावा मानून आपल्या पुढें आलेल्या खटल्यांचा निकाल देऊं लागला तर समाजांत कोणते अनर्थ उत्पन्न होतील हें सांगतां यावयाचें नाहीं. रामशास्त्रीसारख्या न्यायाधीशाला भाऊसाहेब खरे कीं खोटे हें ठरविण्यास असल्या अत्यंत हीन व न्यायाच्या बाबतींत अत्यंत बेभरंवशाच्या व लंगड्या पुराव्यावर विश्वास ठेवण्याची कांहींच गरज नव्हती. भाऊसाहेब गायब होऊन अवघीं ४-५ वर्षें झालीं होतीं. चारच वर्षांपूर्वीं या पुरुषानें एक असामान्य युद्धसंग्राम लढविला होता व त्यापूर्वीं मराठी राज्याच्या एका अत्यंत जबाबदारीच्या

जागेवर अधिकारी या नात्यानें तो काम करीत होता. विशेष हें कीं, प्रत्यक्ष पुण्यास पर्वतीवर त्याला आणून ठेवलें होतें तेव्हां त्याच्या बाबतींतला खरे-खोटेपणा ठरविण्यास प्रत्यक्ष पुराव्याला कांहीं तोटा नव्हता. या न्यायाधीश शास्त्रीबुवांनीं त्यांना योग्य वाटतील तीं भाऊसाहेबांचें चारित्र्य माहित असलेलीं निकटवर्ति माणसें साक्षीदार म्हणून निवडलीं असतीं व त्यांच्याकडून निवडक प्रश्न करून भाऊसाहेबांची चौकशी केली असती तर त्यांचा खरे-खोटेपणा अगदीं सहज व खात्रीलायक रीतीनें ठरवितां आला असता. अगदीं पांचच वर्षांपूर्वी गायब झालेल्या माणसाला ओळखायला किती वेळ लागतो. शनवार वाड्यांतील एकाद्या कुणबिणीनें देखील भाऊसाहेबाला पहातांक्षणीं तो खरा कीं खोटा, हें चटकन् सांगितलें असतें. शनिवार वाड्यांतले कुलोपाध्याय, पेशव्याच्या नात्यांतील अधिकारी वडिल माणसें, कारकून, कारभारी यापैकीं कोणाही चाणाक्ष माणसानें भाऊसाहेबांचा खरेखोटेपणा अगदीं प्रत्यक्ष पुराव्यानिशीं त्यांच्या पदरीं बांधला असता. भाऊसाहेबांबरोबर पानिपतास गेलेले नाना फडणीस तर पुण्यांतच होते. शास्त्रीबुवांनीं भाऊपुढें नानाला उभें करून प्रश्नोत्तरें करविलीं असतीं तर या प्रकरणाचा योग्य तो निर्णय झाला असता व शास्त्रीबुवाच्या न्यायीपणाला तें साजेसें झालें असतें. आणखी एक आश्चर्याची गोष्ट ही कीं, भाऊसाहेबाचा सख्खा चुलतभाऊ रघुनाथराव व पुतण्या थो. माधवराव पेशवा हे पुण्यास हजर होते. पण त्यापैकीं कोणीसुद्धां पर्वतीवर आणलेल्या भाऊसाहेबांना पाहिलेलें दिसत नाहीं. रघुनाथरावानें दुरून त्यांना पाहिलें होतें असा उल्लेख एका पत्रांत आढळतो. पण या अत्यंत महत्त्वाच्या बाबतींत अशा उडवाउडवीची जरूर तरी काय होती ! तेव्हां असा प्रत्यक्ष पुरावा हाताशीं असतां रामशास्त्र्यांनीं ज्याअर्थीं बेलभंडाऱ्याच्या आधारानें जो चौकशीचा फार्स केला त्यावरूनच भाऊसाहेबांना खोटें ठरविण्याचा कटच पुण्यास झाला होता हें उघड आहे. पण रामशास्त्र्यांनीं असा खात्रीलायक प्रत्यक्ष पुरावा न पाहतां बेलभंडाऱ्याचा उपयोग केला व भाऊसाहेबांना खोटें ठरविलें यावरून रामशास्त्री प्रभुणे हा खराखुरा न्यायाधीश नसून कलेक्टरच्या सूचनेप्रमाणें आधींच निकाल लिहून ठेवणाऱ्या आजकालच्या म्याजिस्ट्रेटासारखा तो एक इसम असला पाहिजे असें वाटतें.

रामशास्त्र्यासारख्या एका न्यायाधीशानें बेलभंडाऱ्याच्या मार्गाचा अवलंब करून भाऊंना खोटें ठरविल्यावर हें प्रकरण येथेंच कायमचें मिटणें जरूर होतें. पण आणखी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, बाळाजी विश्वनाथाची मुलगी म्हणजे भाऊची आत्या अनुबाई, भाऊंची बायको पार्वतीबाई व पेशव्याची इतर आप्त मंडळी यांचा रामशास्त्र्यानें या बेलभंडाऱ्याच्या आधारावर केलेल्या चौकशीवर विश्वास बसला नाहीं व त्यांनीं माधवरावास भाऊसाहेबाची पुन्हा नीट चौकशी करण्याबद्दल तगादा लावला. माधवरावानें कांहीं महिने या प्रश्नाबाबत टोलवाटोलवीच चालविली. पण पुढें नाइलाज झाला म्हणूनच कीं काय वेदमूर्ति राजेश्री गंगाधर भट कर्वे, नागोराम, गोपाळपंत देशपांडे यांना भाऊच्या समाचाराकरतां धनगडास पाठविलें व तेवढयानेंही अनुताई व पार्वतीबाई यांचें समाधान होत नाहीं, असें पाहून १७६७ च्या डिसेंबरमध्यें भाऊला पुन्हां पुण्यास आणण्यांत आलें व शनिवारवाड्यापाठीमागच्या अनुबाईच्या वाड्यातच त्यांना ठेवण्यांत आलें.

या ठिकाणीं अनुबाईसंबंधानें थोडी माहिती सांगणें जरूरीचें आहे. त्यावरून अनुबाईच्या मताला या बाबतींत किती महत्त्व आहे हें कळून येईल. अनुबाई बाळाजी विश्वनाथाची सर्वांत लहान मुलगी. १७०७ मध्यें इचा जन्म झाला. वयाच्या सातव्या वर्षीं इचलकरंजीचे संस्थानिक व्यंकटराव नारायण घोरपडे यांचेबरोबर त्यांचें लग्न झालें. व्यंकटराव १७४५ मध्यें मरण पावले. तेव्हांपासून आपल्या संस्थानचा कारभार त्यांनीं स्वतः चालविला. त्यांचे भाऊ बाजीराव व चिमाजी अप्पा पुण्यास असत तेव्हां त्याही पतिमरणानंतर वारंवार पुण्यास येऊन रहात असत. अर्थात् पेशव्याच्या घराण्यांतील एक जवळची आप्त या नात्यानें पुण्याच्या शनिवार वाड्यांतील पेशवे कुटुंबाशीं त्यांचा दाट परिचय असणें व त्यांतील मंडळीवर त्यांचें वजनही असणें स्वाभाविक होतें. नाना, भाऊ, रघुनाथराव, जनार्दन हीं बाळाजीरावाचीं व चिमाजीचीं सर्व मुलें त्यांच्या नजरेखालीं लहानाचीं मोठीं झालीं. या सर्व मुलांचें कर्तृत्व त्यांच्या डोळ्यांसमोर होतें. पेशवे कुटुंबांत एखादें धर्मकृत्य निघालें किंवा इतर कांहीं प्रश्न उपस्थित झाले तर त्यावर अधिकारयुक्त सल्ला अनुबाई देत असत व त्यांच्या शब्दाला मानही देण्यांत

येत असे. त्या अत्यंत धर्मनिष्ठ व बुद्धिमान होत्या. बाजीरावानें मस्तानीचा मुलगा समशेर बहाद्दर याची मुंज करण्याचा घाट घातला. बाजीरावापुढें बोलण्याची व आपलें स्पष्ट मत सांगण्याची कोणाची ताकद होती ? पण अनुबाईनें मोठ्या चातुर्यानें आपल्या भावाला या धर्मबाह्य कृत्यापासून परावृत्त केलें. बाजीराव व चिमाजी अप्पापेक्षां त्या लहान खऱ्या पण स्वतःच्या आंगच्या हुशारीनें व कर्तृत्वानें त्यांनीं या दोन्ही मोठ्या भावांवरही आपलें वजन बसविलें होतें. बाजीराव व चिमाजी अप्पा वारल्यावर पेशव्याच्या घराण्यांत अनुबाईला वडीलकीचा मान मिळाला व हरएक कौटुंबीय बाबतींत त्यांचा सल्ला घेण्यांत येऊं लागला. त्यांचा वाडा शनिवार वाड्यामागेंच होता. यामुळें पेशवे कुटुंबांतील लेकासुनांचा व मुलीबाळींचा अनुबाईशीं दाट परिचय असणें साहजिकच होतें. पानिपतच्या मोहिमेनंतर भाऊसाहेब खरे कीं खोटे हा प्रश्न उत्पन्न झाला. त्या वेळीं या प्रश्नाचा निर्णय लावण्यास अनुबाईसारखें घरचे अधिकारी माणूस पेशव्यांच्या कुटुंबांत त्या वेळीं कोणीच नव्हतें. या प्रश्नाला ज्याप्रमाणें एक राजकीय बाजू होती त्याचप्रमाणें दुसरी कौटुंबिक बाजूही होती. भाऊसाहेब खरे ठरले तर ते पुन्हा पेशव्याच्या कुटुंबांत मिसळायचे होते व पानिपतावर कशी तरी बचावून आलेली त्याची पत्नी पार्वतीबाई यांच्यावरील पतिविरहाचें संकट टळून हीं दोन्ही नवरा बायको पुन्हा एकत्र नांदणार होतीं. अशा परिस्थितींत भाऊसाहेब खरे कीं खोटे हा अनिर्णीत राहिलेला प्रश्न सोडविण्यास अनुबाईच योग्य आहेत, असें माधवरावानें ठरवूनच जणुं काय भाऊसाहेबास धनगड किल्ल्यावरून जें आणलें तें अनुबाईच्या वाड्यांत त्यांच्या देखरेखीखालीं ठेवलें. (१७६७) अनुबाई यांना भाऊ खरा असावा असें पूर्वींपासूनच वाटत होतें. पण आपल्याच घरीं येऊन राहिल्यानंतर त्यांचा व भाऊचा जो निकट परिचय झाला त्यावेळीं भाऊ खराच आहे असें त्यांचें ठाम मत झालें. अनुबाईची भ्रांती दूर होण्यासाठीं भाऊंना त्यांच्या वाड्यांत ठेवण्यांत आलें होतें असे त्यावेळच्या कागदपत्रांतून उल्लेख आहेत.* पुण्याच्या मुत्सद्यांपैकीं व पेशव्याच्या खुद्द कुटुंबियांनीं ज्यांना भाऊ खरा ठरणें नको होतें त्यांनीं अनुबाईलाही

---

* ऐ. ले. सं. पा. १२९४.

आपल्याकडे करून घेण्याकरितां त्यांना भाऊ खरा असल्याबद्दल झालेली भ्रांत दूर करण्याकरतां अनुबाईच्या घरींच भाऊला कांहीं दिवस ठेवलें, असें म्हटलें तरी कांहींच हरकत नाहीं. पण या गोष्टीचा परिणाम मात्र विपरीत झाला. भाऊ खरा असल्याबद्दल अनुबाईचें मत अधिक दृढच झालें. भाऊसाहेब खरे असें ज्याप्रमाणें अनुबाईला वाटलें त्याचप्रमाणें पार्वतीबाईचा सख्खा भाऊ रघुनाथराव कोल्हटकर यालाही भाऊसाहेब खरे आहेत, हें मनापासून पटलें होतें. भाऊसाहेब अनुबाईच्या वाड्यांत असतांना कोणकोणत्या प्रकारानें त्यांची कसोटी घेण्यांत आली नसेल ! उत्तरेकडील हा कनोजी ब्राह्मण भय्या अनुताईच्या वाड्यांत राहून आपण भाऊसाहेब आहों, असें सिद्ध करून दाखवितो ही गोष्ट कल्पनेच्या क्षेत्रांत देखील येऊं शकत नाहीं. भाऊ ऋग्वेदी कोकणस्थ ब्राम्हण होता. त्याची राहण्याची बोलण्याचालण्याची, जेवणाखाण्याची, त्याच्या विशिष्ट स्वभावांची व संवयींची व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाऊच्या अंगच्या स्वाभाविक हुशारीचें व विद्वत्तेचें सर्वतोपरि अनुकरण करणें या कनोजा ब्राह्मण भय्याला शक्य झालें असें म्हणणें म्हणजे वठलेल्या वृक्षाला पालवी फुटली, सशाला शिंगें फुटलीं, बेडूक बैलाएवढा मोठा झाला, कोल्हा सिंह बनला, असल्या अशक्यप्राय गोष्टी सांगण्यासारखेंच हास्यास्पद होतें. भाऊनें लहानपणीं चांगलें वेदाध्ययन केलें होतें. भाऊची या बाबतींत पूर्ण परीक्षा घेतली गेली. व या सर्व कसोट्यांना तो पूर्ण उतरला होता. भाऊसाहेबाचें मातृभाषेवरचें प्रभुत्व व इतरांवर छाप पाडण्याची त्याची लकब साधणें सुखनिधान नांवाच्या कनोजा ब्राह्मणाला कसें शक्य आहे ! भाऊसाहेब अनुबाईच्या देखत लहानाचा मोठा झाला तेव्हां त्याच्या स्वभावांतलें मर्म न मर्म त्या जाणत होत्या. त्याच्या आवडीनिवडी त्यांना माहीत होत्या. शिवाय अनुबाईच्या वाड्यांत एकट्या अनुबाईच तेवढ्या राहत नव्हत्या. शनिवारवाडा जवळच होता. तेव्हां या दोन्ही वाड्यांतील सर्व लहानथोर मंडळींनीं भाऊची अनेक प्रकारें कसोटी घेणें खास संभवनीय आहे. तेव्हां अशा सर्व कसोटींतून तो उतरला म्हणूनच ‘ भाऊसाहेब खरे ’ असें अनुबाईचें ठाम मत झालें असल्यास त्यांत कांहींच नवल नव्हतें. या प्रश्नाला आणखी एक नाजूक बाजू होती. ‘ भाऊसाहेब खरे ’ ठरले असते तर अर्थात् पार्वतीबाईला पत्नीत्वाचे सर्व धर्म त्यांच्या

बाबतींत पाळावे लागले असते व आजवर दूरावलेली ही नवराबायको एकत्र नांदूं लागली असती. मग पेशवे व त्यांचे कारभारी हा तोतया आहे, खरा भाऊसाहेब नव्हे, असें अट्टाहासानें ठरवीत असतांना सुद्धां अनुबाई आग्रहानें त्याच्या उलट मत देत होत्या. पेशव्याच्या व कारभाऱ्याच्या मताविरुद्ध जाऊन पेशवे कुटुंबांतील वडीलकीचा मान गाजविणाऱ्या व त्यांच्या पावित्र्यासंबंधानें दक्ष असणाऱ्या अनुबाई एका कनोजा ब्राह्मणाला भाऊ ठरवून व पार्वतीबाईशीं त्याचा संबंध घडवून आणून पेशवे कुटुंबांत असला भ्रष्टाकार करण्यास तयार झाल्या होत्या काय? खुद्द पार्वतीबाईचा सख्खा भाऊ सुद्धां एका कनोजा ब्राह्मणाच्या पदरीं आपली साध्वी बहिण बांधण्याइतका अक्कलशून्य व धर्मभ्रष्ट झाला होता काय? शनिवार वाड्याच्या मागें शंभर सव्वाशें फुटांवर असलेल्या अनुबाईच्या वाड्यांत तोतया ठरविलेल्या भाऊला खात्री पटवून देण्याकरतां पेशव्यांनीं कांहीं दिवस ठेवण्याची व्यवस्था केली होती. या तजविजीमागें अर्थात् हाच उद्देश असला पाहिजे कीं खुद्द पेशवे कुटुंबांतील मंडळींनींही या बाबतींत खात्री करून घ्यावी. पेशवे व त्यांचे कारभारी यांचा हा उद्देश अशा उलट रीतीनें सफल झाला कीं, 'भाऊसाहेब खरे' असें अनुबाईचें ठाम मत बनलें. खुद्द पार्वतीबाईनें तोतया भाऊला आपल्या डोळ्यांनीं पाहिलें असा पुरावा पुढें आला नसला तरी अनुबाईला व आपल्या सख्या भावाला अगदीं विश्वासांतील सासरच्या व माहेरच्या माणसांना 'भाऊसाहेब खरे' असें वाटलेलें पाहून तिलाही बिचारीला तसें वाटूं लागलें. पेशवे व कारभारी करायला गेले एक व झालें भलतेंच. अनुबाईलाच नव्हे तर पेशवे कुटुंबांतीलही लहान थोर मंडळींना असेंच वाटूं लागलें. रामचंद्र गणेश कानडे, भास्कर हरी पटवर्धन वगैरे मंडळी ही अशाच मताची बनली व 'भाऊसाहेब खरे' असें त्यांना खालीलायक वाटूं लागलें. वास्तविक स्थिति इतकी उघड असतांही पेशवे व त्यांचे कारभारी यांच्या दहशतीमुळें कोणी तसें स्पष्ट बोलून दाखवीत नसत. पण कोणी कांहींही म्हटलें किंवा कोणाचें कांहीं मत झालें असलें तरी या बाबतींत पेशवे व यांचे कारभारी यांनीं आपलाच हेका चालविला व भाऊसाहेब खरा नसून ते तोतया आहे, तो सुखनिधान नांवाचा कनोजा ब्राह्मण आहे, असेंच ठरवून व ही पीडा जवळ नको अशा समजुतीनें पुण्या-

पासून शंभर कोस लांब असलेल्या दौलताबादच्या किल्ल्यावर त्याला पाठवून दिलें.

"भाऊसाहेब खरे आहेत म्हणून अनुबाई घोरपडी भाऊसाहेबांची आत म्हणत होती. त्याजवरुन तोतयाशी किल्ल्यावरुन येथें आणुन अनुबाईचे घरींच ठेवला. त्यांजला सांगितलें कीं, तुम्ही वलखा त्यावरुन पंधरा दिवस त्यांचे घरांत ठेवून त्यांनीं चौकसी बहुत केली. क्रित्रिम प्रकार त्यांचे ध्यानांत आला. तोतया बोलला कीं, जनकोजीस आणा तो सांगेल. त्यावरुन जनकोजीचे नांवें तोतया होता तो आणिला. दोघे एक जागा करून पुसिले तेव्हां सर्व खोटा प्रकार सर्वांच्या ध्यानांत आला. दोघेही खरे नव्हत. तेव्हां अनुबाईनें तोतया भाऊस बाहेरून कहाडून दिला कीं, हा लटका भाऊसाहेब नव्हे. मग श्रीमंती दुसरे दिवशी प्रातःकालापासून त्रितीय प्रहरेपर्यंत बुधवार पेठेच्या हवदापाशी उभा केला. कारण कीं, सर्वत्र लोकांनीं खरा खोटा मनात आणावा म्हणुन उभा केला होता. सर्व जनानें खोटा केला."

अशा मजकुराचें एक पत्र पेशवे दप्तर १९ पा. ३८ वर प्रसिद्ध झालें आहे. तें उघड उघड बनावट आहे. हें पत्र कोणी कोणास पाठविलें याचा पत्ता नाहीं! शिवाय हें पत्र आक्टोबर १७६५ मधील आहे. भाऊसाहेबांना १७६७ मध्यें अनुबाईच्या घरीं आणून ठेवलें होतें. शिवाय आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे या पत्रानें भाऊ व जनकोजी दोघांनाही खोटें ठरविण्याचें कर्तृत्व साधलें आहे. पत्रांतला यापुढला मजकूर 'भाऊसाहेबांना बुधवार पेठेंत उभें केल्याचा अगदीं उघड बनावट आहे. भाऊसाहेबांना खोटा ठरविणाचा कटवाल्यांच्या कारवाईचा हें पत्र म्हणजे एक नमुना आहे.

थोरल्या माधवरावांनीं आपल्या आईच्या व इतर कारभारी मंडळीच्या नादीं लागून भाऊसाहेबांना दौलताबादच्या किल्ल्यावर बंदींत ठेवलें. खुद्द त्याचे सख्खे चुलते रघुनाथराव यांना तर शनिवार वाड्यांत अगोदरच बंदोबस्तांत ठेवले होते व तेही मधून मधून त्रागा करून उपोषणांवर उपोषणें करून पेशवे व त्यांचे कारभारी यांना शाप देत राहिले होते. थोरले माधवराव हे खरोखरी थोर होते, कर्तृत्ववान होते. पण त्याबरोबरच आपल्या या दोन्ही कर्तृत्ववान चुलत्यांशीं संगनमत करून दरबारांतील इतर

पापग्रहांना बाजूला सारण्याचें धैर्य मात्र त्यांच्या आंगीं दिसून आलें नाहीं. थोरले माधवराव कर्नाटकच्या स्वारींत असतांना क्षयरोगानें पछाडले गेले व १७७२ च्या नोवेंबरांत ते याच रोगाला बळी पडले. मरतांना त्यांनीं रघुनाथरावांना मोकळें करून नारायणरावाला त्यांच्या स्वाधीन केलें. थोरल्या माधवरावांच्या मरणकालचा हा प्रसंग इतका गंभीर होता कीं, या वेळीं त्यांनीं रघुनाथरावांना मोकळें करून आपल्या मृत्युशय्येजवळ बोलाविलें. त्याचप्रमाणें दौलताबादच्या किल्ल्यांत सडत पडलेल्या आपल्या दुसऱ्या चुलत्यालाही पुण्यास आणून व त्यांना विश्वासांत घेऊन नारायणरावांनाच काय तर सर्व मराठी साम्राज्य या दोघां शूर कर्तृत्ववान् पुरुषांच्या स्वाधीन केलें असतें तर तें त्यांच्या थोरपणाला साजेसेंच झालें असतें. मरणसमयीं आणखी एका गोष्टीचा घोर त्यांना लागला होता. थोरले माधवरावांनीं आपल्या कारकीर्दींत ज्या मोहिमा केल्या त्यामुळें ते कर्जांत आले होते व हें कर्ज न फेडतांच आपण मरतों यामुळें त्यांचा आत्मा तळमळत होता. रघुनाथराव व भाऊसाहेब हे दोन्ही माधवरावांच्या मृत्युशय्येपाशीं हजर असते तर कर्जफेडीकरतां त्यांच्या आत्म्याला तळमळण्याचेंही कारण पडलें नसतें. भाऊनें या कर्जफेडीची जबाबदारी मोठ्या आनंदानें पतकरली असती. परंतु थोरल्या माधवरावांना भाऊसाहेबांना जवळ करण्याचें सुचलें नाहीं म्हणा किंवा कदाचित् सुचलें असलें तरी त्यांच्या कारभाऱ्यांनीं त्यांना तसें करूं दिलें नाहीं म्हणा. ज्या चुलत्याशीं आपल्या कारकीर्दींत ते भांडत राहिले व ज्यांना त्यांनीं शनिवार वाड्यांत स्थानबद्धही करून ठेवलें त्याच चुलत्याच्या हातीं त्यांनीं नारायणरावांना सोंपाविलें. कर्जफेडीकरितां तळमळणाऱ्या त्यांच्या आत्म्याला संतोषविण्याकरितां नाना फडणविसानें रत्नागिरीचे किल्लेदार रामचंद्र नाईक परांजपे पुढें आणले व त्यांच्याकडून कर्जफेडीचा रोखा घेऊन माधवरावांना सुखानें मरूं दिलें. थोरल्या माधवरावांच्या मृत्यूनंतर नारायणराव पेशवे झाले. पण त्यांची कारकीर्द पुरती एक वर्षभरही टिकली नाहीं. नारायणराव पेशव्यांची कारकीर्द अवघी सात आठ महिन्यांचीच झाली. पण तेवढ्या अवकाशांत त्यानें आपल्या चुलत्यास रघुनाथरावास शनिवारवाड्यांतच स्थानबद्ध करून आपल्या थोरल्या

भावाचा कित्ता गिरविला. थोरल्या माधवरावानें असलें नामुष्कीचें कृत्य केलें खरें पण इतर मुत्सद्यांवर दाब ठेवून त्यानें आपला कारभार यशस्वी रीतीनें तरी चालविला. पण नारायणरावाला तेंही साधलें नाहीं. दरबारांतील इतर मुत्सद्यांनाही त्यानें दुखवलें त्यामुळें सर्वतोपरि अप्रिय झालेल्या या पेशव्याला सर्वानुमतें धरण्याचा कट झाला. आणि या धराधरीच्या गडबडींत त्याला आपल्या प्राणांस मुकावें लागलें. पण नारायणरावांच्या मृत्यूचे पूर्वी या चुलत्या पुतण्याचें नीट असतांना तोतया प्रकरणाच्या बाबतींत जी एक लहानशी पण महत्त्वाची घटना झाली तिचा उल्लेख करणें अत्यंत जरूरीचें आहे. नारायण गादीवर बसल्यानंतर थोड्याच दिवसांनीं रघुनाथरावाची मुलगी दुर्गाबाई इचा विवाह बाबूजी नाईक बारामतीकर यांचा मुलगा पांडुरंगराव यांच्याबरोबर ठरला. सदाशिवराव भाऊ पानिपतच्या गर्दींत मिसळले व बेपत्ता झाले, या गोष्टीला आतां बारा वर्षे पूर्ण झालीं होतीं. हरवलेल्या किंवा बेपत्ता झालेल्या इसमाचा बारा वर्षे पत्ता लागला नाहीं म्हणजे तो मरण पावला, असें समजावें व त्याची क्रिया करावी असें हिंदुधर्मशास्त्र सांगतें. त्याप्रमाणे रघुनाथरावाच्या मनांत भाऊचे पिंड पाडावे असें होतें. ही क्रिया केल्याशिवाय दुर्गाबाईचें लग्न करता येत नाहीं, असें शास्त्री मंडळीचें म्हणणें पडलें. भाऊचे पिंड पाडायचे म्हणजे त्यापूर्वी पार्वतीबाईचे केस कर्तन करावयास पाहिजे होते. पार्वतीबाईला ही गोष्ट विचारण्यांत आली त्यावेळीं त्या तेजस्वी बाईनें "पर्वतवासी (अर्थात् किल्ल्यावर ठेवलेले सदाशिवराव भाऊ) आणून फडशा करून टाकणें. मग विधी उरकून टाकावा." असें उत्तर दिलें. तोतयाला किल्ल्यावरून आणून त्याला ठार करण्याची कोणाची छाती होती ? तोतयाला ठार केल्याशिवाय वपन करून घ्यावयाला पार्वतीबाई तयार नव्हती. हा विधी उरकल्याशिवाय दुर्गाबाईचे लग्न करण्यास धर्मशास्त्र परवानगी देईना. भाऊला दौलताबादचा किल्ला दाखविण्याचा माधवरावास सल्ला देणाऱ्या राक्षसी काळजाच्या सखारामबापूच्या मनांत पार्वतीबाईवर अत्याचार करून तिचा केशसंभार उतरावा असें होतें. परंतु हा अत्याचार करण्यास रघुनाथराव व नारायणराव तयार नव्हते. तेव्हां मोठाच पेंचप्रसंग निर्माण झाला. तेव्हां धर्मशास्त्राचा हवा तसा अर्थ लावण्यांत पटाईत

असलेल्या भटजी मंडळींनी कांहीं तरी पर्याय शोधून काढला व हा वपन-विधी रद्द करण्यांत आला. दुर्गाबाईचें लग्न झालें. अर्थात् या लग्नांत पार्वती-बाई सौभाग्यवती म्हणून मिरवली. तिचें हें अहेवपण पेशवे कुटुंबांतील सर्व सवाष्ण स्त्रियांनींही मान्य केलें. भाऊसाहेबांच्या बाबतींत कोणी कांहींही बातम्या उठवल्या तरी पार्वतीबाई आपल्या नांवामागें सौभाग्यवती हें पद लावीत असत. वरील प्रकरणानंतर त्यांनीं हा प्रघात तसाच चालू ठेवला. आप्तइष्ट बायकांचीं त्यांना पत्रें येत. त्यांतही त्यांना सौभाग्यवती असेंच संबोधण्यांत येत होतें. पेशवे कुटुंबांतल्या वडीलधाऱ्या म्हणून गणल्या गेलेल्या अनुबाई, भाऊसाहेब अद्याप जिवंत आहेत व कारभाऱ्यांनीं त्यांना आकसानें किल्ल्यावर ठेवलें आहे असें मानणाऱ्या असल्यामुळें पेशवे कुटुंबांतल्याच काय, इतर आप्तइष्ट सरदार कुटुंबांतल्या स्त्रियादेखील पार्वती-बाईंना सौभाग्यवती या नात्यानेंच वागवीत. कुटुंबांत नित्य घडून येणाऱ्या उत्सवप्रसंगांत व लग्नकार्यांत सुवासिनी स्त्रिया खणानारळांनीं त्यांची ओटी भरीत व त्यांना हळदी कुंकू लावीत. भाऊला तोतया ठरविणारे रामशास्त्री यांच्या डोळ्यांदेखत हे प्रकार चालू होते.कारण उघड होतें. किल्ल्या-वर ठेवलेले भाऊसाहेब हे तोतया नव्हते तर खरेखुरे भाऊसाहेब होते, अशीच सर्वसामान्य लोकांची समजूत झालेली होती. फक्त राजदंड ज्यांच्या हातांत होता त्यांचीच तेवढी तशी समजूत नव्हती.

१७६६ मध्यें माधवरावानें भाऊसाहेबाला तोतया ठरवून दौलताबादच्या किल्ल्यावर बंदींत ठेवलें. यापुढें आठ वर्षें भाऊंनीं या किल्ल्यांत काढलीं १७७४ मध्यें पेशवाईचा कारभार नाना फडणिसाच्या हातीं गेल्यावर रघु-नाथरावाचा बंदोबस्त करण्याच्या कामावर हरिपंत फडके यांची योजना कर-ण्यांत आली. हरीपंतांनीं या कामीं निजामअल्लीची मदत मागितली. ज्या रघुनाथरावानें व भाऊनें उदगिरच्या लढाईत निजामाला नामोहरम केलें त्यालाच हरिपंत शरण गेले व त्या वेळीं मोठया शर्थीनें मिळविलेला किल्ला निजामाच्या स्वाधीन केला. त्यांतल्या त्यांत बरी गोष्ट म्हणजे भाऊ साहेबांना किल्ल्यांत बंदींत ठेवून त्यांच्यासह तो किल्ला निजाम अल्लीच्या स्वाधीन केला नाहीं. त्यांनीं भाऊसाहेबांना तेथून काढून मिरजेच्या किल्ल्यांत आणून ठेवलें. भाऊला पुण्याहून जितकें दूर ठेवतां येईल तितकें चांगलें म्हणून

हें स्थळ पक्षंत करण्यांत आलें. पण या ठिकाणीं एक नवीनच प्रश्न निर्माण झाला. भाऊसाहेब मिरजेच्या किल्लयावर आल्यानंतर पेशव्याचे या भागांतील लोक भाऊसंबंधानें चौकशी करूं लागले. भाऊ खरे कीं खोटे यासंबंधानें पुन्हा चर्चा होऊं लागली व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे परशराम भाऊ पटवर्धन यांच्या आईला 'भाऊसाहेब खरे' असें निश्चितपणें वाटूं लागलें व या अनुभवी व वृद्ध स्त्रीनें स्वस्थ न बसतां तसा पत्रव्यवहारही सुरू केला. हरबा अण्णाचे चिरंजीव भास्करपंत पटवर्धन हे भाऊसाहेब खरे असें समजणारेच होते. अशा परिस्थितींत मिरजेचा किल्लेदार पांडुरंगपंत पटवर्धन घाबरून गेला. भाऊसाहेब मिरजेच्या किल्लयावर आल्यामुळें पार्वतीबाई व अनुबाई यांना भाऊसाहेबांची आतां सुटका करणें सोपें जाईल, अशी आशा वाटूं लागली. पटवर्धन इचलकरंजीकरांचे उपाध्ये. इचलकरंजीचा कारभार पाहणाऱ्या संस्थानच्या खुद्द मालक अनुबाई यांनीं भाऊसाहेबांच्या वतीनें तिकडील मंडळीशीं पत्रव्यवहार सुरू केला. अनुबाईला परशरामभाऊच्या मातोश्री जानकीबाईही मिळाल्या. किल्लयावर अनेक लोकांची सारखी जा–ये, सुरू झाली. अनुबाईचें पटवर्धनांवर वजन होतें. भाऊचें व पटवर्धनांचें पानिपतच्या मोहिमेच्या प्रसंगीं बिनसलें होतें तरी परशरामभाऊच्या आईनें तसला कांहींच विचार मनांत न आणतां 'भाऊसाहेब खरे' हा प्रचार करण्यास सुरुवात केली. नाना फडणीसांनीं व सखारामबापूंनीं भाऊसाहेबाला मिरजेच्या किल्लयावर ठेवून त्याच्या बंदोबस्ताची जबाबदारी मिरजचा किल्लेदार पांडुरंगपंत पटवर्धन याजवर टाकली होती. भाऊसाहेबाच्या बाजूच्या लोकांचें वजन वाढत चालल्यामुळें किल्लयावर केव्हां फितुर होईल याची भीति त्याला वाटूं लागली व मिरजच्या किल्लयांतून भाऊसाहेबांना हलविण्याची त्यांनीं नाना फडणिसांना व इतर कारभाऱ्यांना तांतडीची विनंति केली. पार्वतीबाईनीं भाऊसाहेबांना मिरजेंतून हालवून रत्नागिरीस नेऊं नये, अशी पुष्कळ खटपट केली. पण तिचा कांहींच उपयोग झाला नाहीं. पार्वतीबाई या वेळीं पुरंदरावर होत्या. गेलीं पंधरा वर्षें पतिविरहाचे कष्ट त्या सहन करीत होत्या. अनुबाई 'भाऊसाहेब खरे' असें म्हणत होत्या. पार्वतीबाईचा प्रत्यक्ष भाऊही तसेंच म्हणत होता. पण कारभारी मंडळींनीं तिच्या पतीला तोतया ठर-

विण्याचा हट्ट चालविला होता व त्याला तुरुंगांत डांबून ठेवलें होतें. कारभारी मंडळी आपल्या पतीचें काय करतील व काय नाहीं, या काळजीनें रात्रंदिवस त्या झुरणीस लागल्या होत्या. अशा परिस्थितींत त्या वारंवार आजारी पडूं लागल्या व त्यांतच त्यांना क्षयाचाही विकार झाला. पुरंदरावर असतांना तेथल्या बंदोबस्ताचें काम पुरुषोत्तम दाजी पटवर्धन पहात होता. नाना फडणीसाचा हा पक्का हस्तक होता. सर्वतोपरि दुबळ्या झालेल्या बिचाऱ्या पार्वतीबाईला हें सगळें कुठलें लक्षांत येणार ? त्यांनीं या माणसातर्फेंच भाऊसाहेबांना मिरजेहून न हालविण्याचा प्रयत्न चालविला. पार्वतीबाईच्या समजुतीकरतां म्हणून त्यानें तशा प्रकारचीं पत्रें पांडुरंगपंतांना पाठविलीं, पण तीं भाऊसाहेबांना मिरजेहून हालवून रत्नागिरीला पाठविल्यानंतर पाठविलीं. या नष्ट माणसाची ही फसवाफसवी पार्वतीबाईच्या लक्षांत आली नाहीं.

रामचंद्र नाईक परांजपे, हे पेशव्याचे सावकार या वेळीं रत्नागिरी किल्ल्याचे किल्लेदार होते. पेशव्याच्या घराण्याशीं आणि त्यावेळच्या इतर बड्या घराण्याशीं त्यांचा आप्तसंबंधही होता. रामचंद्र नाईक हे पेशव्याचे सावकार असल्यामुळें त्याचा भाऊसाहेबांचा बरेच वर्षांचा प्रत्यक्ष परिचय होता. भाऊसाहेबांच्या स्वभावांतील लहानसहान गोष्टी, त्यांच्या सवयी, आवडीनिवडी; त्यांची बोलण्याचालण्याची ढब, त्यांची हुशारी, बुद्धिमत्ता या सर्व गोष्टींची जाणीव असलेला हा पुरुष भाऊसाहेब खरे कीं खोटे हें ठरविण्यास अत्यंत योग्य असाच होता. पेशव्याच्या घराण्याशीं निकट आप्तसंबंध असल्यामुळें रामचंद्र नाइकांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांचाही भाऊशीं दाट परिचय असणें स्वाभाविक होतें. भाऊसाहेब प्रत्यक्ष किल्ल्यावरच आल्यावर तोतया म्हणून ठरलेल्या भाऊसाहेबांची या दोघा पतीपत्नींनीं जी वर्तणूक पहिली व प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणें त्यांनीं जी भाऊसाहेबांची चौकशी केली त्यावरून रामचंद्र नाइक परांजपे व त्याची पत्नी अन्नपूर्णाबाई या दोघांनाही 'भाऊसाहेब खरे' अशी खात्री पटली.

थो. माधवराव जिवंत असतांना ते व त्यांचे कारभारी व त्यांच्या मरणानंतर आतां सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत केवळ कारभाऱ्यांनीं, कारण सवाई माधवराव या वेळीं लहान पोरच होते. भाऊसाहेबाच्या बाबतींत

चालविलेला हा अन्याय या दोघा पतिपत्नींना सहन झाला नाहीं. विशेषतः अन्नपूर्णाबाईंना तर या अन्यायाची चीडच आली. स्त्रीचें हृदय स्त्रीच जाणूं शकते. पेशव्यांनीं व त्यांच्या कारभाऱ्यांनीं पार्वतीबाईचा पति जिवंत असतांना त्याला तोतया ठरवून त्या साध्वीचा छळ चालविला आहे, हें पाहून हा अन्याय दूर करण्याकरतां अन्नपूर्णाबाईनीं आपलें सर्वस्व पणास लावलें व या गोष्टीचा सोक्षमोक्ष करण्याचें ठरविलें. नवलाची गोष्ट कीं, ज्या पुरुषोत्तम दाजीनें पार्वतीबाईंना फसवून लटकत ठेवलें ते दाजी पटवर्धन पुरंदरीं होते व अन्नपूर्णाबाईला पुण्याच्या दरबारीं आपल्या वाशिल्याचे हेच गृहस्थ आहेत, असें वाटलें. शिवाय हेच दाजी पटवर्धन दौलताबादला जाऊन भाऊंची परीक्षा करून आले होते, हें अन्न-पूर्णाबाईंना माहित होतें तेव्हां त्यांनाच पुन्हा रत्नागिरीला बोलावण्याचा निश्चय करून त्यांच्याशीं त्यांनीं निकडीचा पत्रव्यवहार सुरू केला व 'भाऊसाहेब खरे' कसे हें दर्शवून भाऊची आपल्यादेखत परीक्षा घेण्याबद्दल या दाजी पटवर्धनाला त्या बोलावीत होत्या. दाजी पटवर्धन पाताळयंत्री खरा पण अन्नपूर्णाबाईच्या बोलावण्याला मान देऊन रत्नागिरीला जाण्याचें त्यास धैर्य झालें नाहीं. उलट त्यानें अन्नपूर्णाबाईंचीं आपल्याकडे आलेलीं पत्रें नाना फडणिसाला दाखविलीं. वास्तविक हीं सर्व पत्रें पाहिल्यावर कार-भाऱ्यांनीं ताबडतोब पुरुषोत्तम दाजीला तिकडे पाठवून या प्रश्नाची शहानिशा करावयास पाहिजे होती. पण तसें न करतां हीं अन्नपूर्णाबाईंचीं महत्त्वाचीं पत्रें नानाफडणिसाच्या समोर फाडण्यांत आलीं* कारभाऱ्यांना भाऊसाहेब खरे कीं खोटे, हें समजून घेण्याच्या इच्छेपेक्षा भाऊसाहेब खरे ठरलें तर आपलें काय होईल याचीच काळजी त्यांच्या हृदयाला बोचत होती. रामचंद्र नाईकही या बाबतींत स्वस्थ बसले नव्हते. मिरजेच्या पांडुरंगराव पटवर्धनासारखे ते डरपोक नव्हते. 'भाऊसाहेब खरे' तोतया नव्हत, हें त्यांचें निश्चित मत झाल्यावर त्याच्या पक्केपणासाठीं भाऊच्या अनेक आप्तइष्टांना व इतर पटवर्धन वगैरे मंडळींना पत्रें पाठवून भाऊसाहेब खरे कीं खोटे हें स्वतः येऊन पाहण्याबद्दल कळविलें. रामचंद्र नाइकांच्या या पत्रांप्रमाणें पार्वती-बाईचा सख्खा भाऊ रघुनाथराव कोल्हटकर, अनुबाईचा नातू व्यंकटराव

* हरीवंश बखर, पा. ८७

घोरपडे इचलकरंजीकर, सवाई माधवरावाच्या आईचा सख्खा मामा नारो शंकर, परशरामभाऊचा चुलतभाऊ हरबा अण्णा, ही सर्व मंडळी रत्नागिरीस आली. राघोबा दादाचा दत्तक मुलगा अमृतराव भुस्कुटे हाही या प्रसंगीं रत्नागिरीस आला. ही सर्व मंडळी एकत्र आल्यावर अर्थात् अनेक प्रकारांनीं चौकशी झाल्यावर 'भाऊसाहेब खरे' तोतया नव्हत, असेंच सर्वांच्या निदर्शनास आलें. सर्वांची या बाबतींत पूर्ण खात्री पटली.

इतकें झालें तरी पुढें काय ? कारभाऱ्यांच्या हुकुमानें सदाशिवरावभाऊंना रत्नागिरीच्या तुरुंगांत बंदिस्त करण्यांत आलें होतें. त्यांच्या पायांत बेड्या ठोकण्यांत आल्या होत्या.'भाऊसाहेब खरे'ही गोष्ट कितीही जबाबदार लोकांनीं सांगितली तरी नाना फडणीस व त्यांचे साथीदार कारभारी तें ऐकून घ्यावयास तयार होणार नाहींत व भाऊला ते मुक्त करणार नाहींत, ही गोष्ट या जमलेल्या लोकांना पूर्ण माहीत होती. पण रामचंद्र नाईक परांजपे लेचेपेचे गृहस्थ नव्हते. ते नाना फडणीसाच्या विश्वासांतले होते पण भाऊसाहेब खरे ठरल्यावर त्यांच्यावर झालेला अन्याय दूर होण्यासाठीं कसलाही स्वार्थत्याग करावा लागला तरी त्याचीं फिकीर न करणारे असे ते गृहस्थ होते. या बाबतींत त्यांच्या पत्नीनें पुढाकार घेऊन कारभाऱ्याच्या रागालोभाची पर्वा न करतां आपल्याला जें काय पटलें तें तिनें नानाफडणीस वगैरे कारभाऱ्यांना कळविलें होतें. 'भाऊसाहेब खरे' असें वाटलें तरी कारभाऱ्याच्या दहशतीनें कोणी तसें बोलत नव्हतें. पण अन्नपूर्णाबाईनीं त्याची पर्वा केली नव्हती. तेव्हां रामचंद्रपंत नाइकांनीं सर्वानुमतें या बाबतींत निश्चित पाऊल टाकण्याचें ठरविलें. त्यांनीं आपल्या अधिकारांत भाऊसाहेबांच्या पायांतील साखळदंड तोडले. तुरुंगांत राहिल्यामुळें जो कर्मलोप झाला त्याबद्दल ब्राह्मण बोलावून भाऊंना यथाविधी प्रायश्चित्त दिलें. सदाशिवराव पेशवे यांच्या नांवानें द्वाही फिरवून रत्नागिरीचा किल्ला व सुभा त्यांच्या कबजांत दिला आणि जमलेल्या मंडळींनीं त्यांच्या आज्ञेप्रमाणें पुढील कारभार चालविण्याच्या शपथाही घेतल्या. 'भाऊसाहेब खरे' असें ठरून त्यांना मुक्त करण्यांत आलें. रत्नागिरीचा किल्ला व सुभा त्यांना देण्यांत आला व त्यांच्या नांवाची द्वाहीही फिरविण्यांत आली, ही वार्ता महाराष्ट्रांत हां हां म्हणतां वाऱ्यासारखी पसरली. या बाबतींत सर्वत्र पत्रव्यवहार सुरू झाले.

याच अवधींत परशराम भाऊ पटवर्धन यांच्या मातोश्री जानकीबाई यांनीं आपल्या चिरंजीवांस जें पुढील पत्र पाठविलें तें अनेक दृष्टीनें महत्त्वाचें आहे.

'श्रियासह चिरंजीव राजश्री भाऊ यांसी प्रती जानकीबाई आशीर्वाद उपरी. येथील तागायत छ. १५ रबिलाखर वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण मिरजकर सांडणी स्वार याजबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळो आला. आमचे शरीरीं समाधान आहे. चिंता न करावी. तुम्ही सत्वर यावयाचें करावें. वाटेनें नदीनाल्यांतून बहुत खबरदारीनें यावे. चिरंजीव मुलास देवी येउन उत्तम प्रकारें आरोग्य झालें. चिंता न करावी. रामचंद्र भट उत्तुरकर देवाज्ञा पावले. चिरंजीव बयास ईश्वरें वाईट केलें. होणारास इलाज काय? चिरंजीव दाजी व बळवंतराव येथें आले आहेत. आम्हास भेटून गेले. कोंकणांत भाउसाहेब खरे जाहले. कारभारी होय नव्हे करतील त्यांत तुम्ही सहसा न पडावें. सर्वांचे मते खरेच जाहले. तेथें जवळ दादंभट व बापूभट आपटे व शेडे हरभट यांचे सर्व, रघुनाथ दिक्षित यांणीं खरें केलें. विजयदुर्ग व रत्नागिरी त्यांजकडे जाहली. बराबर दहा हजार पायदळ आहे. प्रस्तुत राजापुरीं आहेत. देवरुखास छावणी होणार. पत्र आपण वाचून पाहावें. दुसऱ्यास न दाखवावें.* हें पत्र ता. ३ जून १७७६ चें आहे. भाउसाहेब मिरजच्या किल्ल्यावर होते त्यावेळींच परशराम भाउंच्या आईला 'भाउसाहेब खरे' अशी खात्री वाटत होती.

'**भाऊसाहेब खरे**' असें ठरवून रामचंद्र नाईक परांजपे यांच्या सारख्या नाना फडणिसाच्या विश्वासांतल्या माणसानें भाऊसाहेबांना बंधमुक्त केलें व त्यांच्या नांवानें द्वाहि फिरविली हें पाहून या प्रकरणाची आणखी चौकशी करण्याकरतां नारो बाबाजी फडके यांस नाना फडणीसानें रत्नागिरीस पाठविलें. या गृहस्थानें आपल्या स्वामीस जें पत्र पाठविलें त्यावरून भाऊसाहेब खरे याबद्दलच्या पुराव्यांत आणखी भरच पडते. तें पत्र पुढीलप्रमाणें आहे. पत्रावरील मिती चैत्र शु. १४, शके १६९८ आहे.

---

* ऐ. ले. सं. नं. १८४८.

" सेवेसी नारो बाबाजी फडके कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ. ७ सफर प्रातःकाल पावेतो मुक्काम रत्नागिरी वर्तमान यथास्थित असे. विशेष ज्या कार्यास स्वामी येथें पाठविलें त्यास येथील मामलेदारांनीं फाल्गुन शु. दशमीस बेडी तोडून सर्व सरंजाम श्रीमंताप्रमाणें करून दिला. उपरान्त मी येथें आलों. सनद मामलेदारास दिली. ( एक ओळ गहाळ ) कोणाचे परवानगीनें बेडी तोडली. पूर्ववत्प्रमाणें बेडी घालून बंदोबस्तानें ठेवावा. तेव्हां त्यांनीं उत्तर केलें कीं, आज्ञेशिवाय दुसरा विचार नाहीं. परंतु हे भाऊसाहेब खरे याविषयीं आमची खातरजमा झाली. काडीमात्र लढा राहिला नाहीं. याजकरतां बेडी तोडली. पुन्हा प्रतिबंध करावयाचा नाहीं. याप्रमाणें साफच सांगितलें. आणि मजला सांगितलें कीं तुम्हास आपली खातरजमा करून घेणें असेल ज्याप्रमाणें पाहिजे त्याप्रमाणें करून घ्यावी. तेव्हां उठोन यावें तर ज्या कार्यास आलो त्याचें कांहींच न जाहालें. याजकरतां आठचार दिवस तेथें राहून या मसलतींत कोण कोण आहेत मामलेदारांनीं इतकें बल कोणते आश्रयावरी धरलें याचा तरी पक्का शोध घ्यावा या अर्थे येथें राहिलों. तीन चार वेळां किल्यांत गेलों. त्या गृहस्थाचें माझें प्रहरभर बोलणें एकस्याचेंच जाहालें. त्यानें कारभाराच्या व घरांतील कुलगतीच्या वगैरे ज्या फार ऐकिव नाहींत त्या गोष्टी सांगितल्या. ( एक ओळ गहाळ ) आपलें एकांतीं निरनिराळे एकस्याचेंच बोलणें झालें तें तपशीलवार ज्या स्थलीं जाहाले तें सांगितलें आणि बोलले कीं, याप्रमाणें उभयतांस पुसोन पाहावे तेव्हां पुसावे असा जीवासरा वाटों लागला. तेव्हां खरेपणाचे जाबसालाविसी बापूची व आपली खातरजमा केलियावर मग बहुत प्रकार उपदेश केला कीं, तुम्ही सांगितलें इतके खरे आहे तरी उभयतांस स्वदस्तुरचीं पत्रें लिहोन द्यावी. तेव्हां दोन्ही पत्रांत हिंदुस्थानांत जाते समर्थांच्या खुणा लिहोन पत्रें दिलीं. ( पुढील मजकूर गहाळ ) *

या नारो बाबाजी फडक्यानें भाऊसाहेबाबरोबर एकांतीं बसून जी चौकशी केली त्यांत फारशा ऐकिवांत नसलेल्या कारभाराच्या व घरांतील कुलगतीच्या गोष्टी सांगितल्याच. शिवाय नानांनीं व बापूंनीं ज्या

---

* भा. इ. सं. मं. अहवाल १८३४ पा. ९८

अंतरींच्या खुणा विचारण्यास या गृहस्थाला सांगितलें त्याही त्यानें विचारल्या त्याही सांगून खातरजमा केली व तशीं स्वदस्तुरचीं पत्रेंहि दिलीं व त्यांत हिंदुस्थानांत जातेसमयींच्या खुणाही लिहिल्या. भाऊसाहेब खरे असल्याबद्दल यापेक्षां आणखी खात्रीलायक व सबळ पुरावा तो कोणता? नानाबापूंनीं आपल्या अगदीं अंतस्थ व खात्रीच्या माणसाकडून मिळालेल्या या पुराव्याकडे लक्ष दिलें नाहीं व आपल्या धन्याशीं निमकहराम होऊन त्याला तोतया ठरविण्याचाच हट्ट धरला. निदान नाना फडणिसानें तरी असें करावयास नको होतें. भाऊसाहेब लढाईच्या गर्दींत घुसले त्यावेळीं 'श्रीमंताचें अन्न हजारो लोकांनीं खाल्लें पण एकही ऐन प्रसंगी उपयोगी पडला नाहीं' असें आपल्या आत्मचरित्रांत नानांनीं म्हटलें आहे. नाना सुद्धां या हजारो लोकांपैकींच एक होता. भाऊंचें नानावर अतिशय प्रेम होतें. नाना अमांशानें आजारी झाला तेव्हां मोहिमेचा मुक्कामही केवळ नानाकरतां ते वाढवीत असत. पण नाना या सर्व गोष्टी आतां विसरले होते. रामचंद्र नाइक मात्र आपल्या इमानास जागला, त्यानें भाऊसाहेबांना आपल्या जबाबदारीवर मुक्त केलें व रत्नागिरी त्यांच्या स्वाधीन करून त्यांच्या नावानें द्वाही फिरविली.

सदाशिवरावभाऊच्या नांवाची द्वाही फिरविण्यांत आली याचा अर्थ स्पष्ट होता. यापुढें पेशव्यांचा कारभार हातीं घेण्याचा त्यांचा इरादा आहे, असेंच या द्वाहीच्या द्वारें जाहीर करण्यांत आलें होतें. रत्नागिरी येथें जमलेल्या मंडळींनीं पेशवाईविरुद्ध बंड उभारलें नव्हतें तर त्या वेळच्या कारभारी मंडळाविरुद्ध हा उठाव केला होता. कोणताही राजकीय हक्क प्रस्थापित करावयाचा तर तो लष्करी शक्तीच्या आधारें सत्ता काबीज करूनच करावयाचा असतो, हें जाणूनच सदाशिवरावभाऊंनीं कोकणपट्टींत आपली सत्ता प्रस्थापित करण्यास आरंभ केला. भाऊसाहेबांच्या नांवें द्वाही फिरविण्यांत आल्यानंतर अनुबाईचा नातू व्यंकटराव घोरपडे इचलकरंजीकर व इतर सरदार त्यांना फौजेनिशीं येऊन मिळाले. भाऊंनींही नवीन फौज चाकरीला ठेवली व कोंकणप्रांत काबीज करण्याला त्यांनीं सुरुवात केली. विजयदुर्ग व देवगड हे किल्ले त्यांनीं घेतले. पेशव्याच्या आरमारावरील सरदार धुळप यानें आपलें आरमार भाऊंच्या स्वाधीन केलें. भाऊंनीं नंतर अंजनवेल व गोवळकोट हे किल्ले हस्तगत केले. कोकणपट्टीवरील किल्ले हस्तगत

करून भाऊ सपाट्यानें पुण्याकडे येत आहेत, अशा बातम्या येऊं लागल्या-बरोबर पुण्याच्या कारभारी मंडळींचें तोंडचें पाणी पळालें. त्यांनीं या चढा-ईला तोंड देण्याची तयारी केली. त्यांनीं शिंदे होळकरांना आपापल्या फौजे-सह पुण्याकडे येण्याबद्दल पत्रें पाठविलीं. एका परभू सरदाराबरोबर गारद्यांची व अरबांची फौज देऊन भाऊसाहेबांच्या हालचालींना प्रतिबंध करण्याकरतां पाठवलें. परंतु या सरदारासच भाऊसाहेबांनीं आपल्यांत सामील करून घेतलें. हरिपंत फडके यांच्या पुतण्याच्या स्वाधीन सुवर्णदुर्गचा किल्ला होता व सुवर्णदुर्ग तालुक्याची मामलत बचाजीपंत बर्वे याजकडे होती. सदाशिवराव भाऊस हे दोन्ही सरदार अनुकूल झाले व त्यांनीं तो भाग भाऊच्या स्वाधीन केला. देवरुखचें ठाणें घेऊन ते अंबाघाटावर चढून आले व मलकापूर त्यांनीं हस्तगत केलें. उत्तर कोंकणांतील सरदार माणकर व सुर्वे भाऊसाहेबांना मिळाल्यामुळें तो प्रांत सुलभपणें त्यांच्या हस्तगत झाला. पटवर्धन सरदारांपैकीं हरबाअण्णा भाऊचे पक्षपाती होतेच. ते आपल्या फौजे-सह त्यांना येऊन मिळाले. मुंबईचे इंग्रज, करवीरकर, हैदर यांचीही या चढाईला सहानुभूति मिळाली. राघोबादादाचा दत्तक पुत्र अमृतराव आपल्या फौजेसह भाऊंना मिळाला. भाऊजवळ आतां वीस हजार फौज जमा झाली. सिंहगडावरहि भाऊ आपला ताबा बसविणार असें दिसूं लागलें. बोरघाटावर चढून भाऊंनीं राजमाचीचा किल्ला हस्तगत केला. इतकें सगळें चाललें असतां नाना फडणीस गप्प बसणें शक्यच नव्हतें. महाराष्ट्रांतला कोणताहि सरदार भाऊच्या चढाईला अडथळा आणण्याच्या कामीं उपयोगी पडेल, असें नानाला वाटलें नाहीं. दक्षिणेंतील बहुतेक सरदार भाऊला विरोध करण्यास मनापासून तयार नव्हते, असें नानाला दिसून आलें होतें. या कामीं शिंदे होळकरच आपल्या उपयोगी पडतील अशी त्यांची दृढ समजूत असल्यामुळें त्यांच्याकडे त्यांनीं तांतडीचे निरोप पाठविले. तोंपर्यंत भाऊला थोपावकरण्याकरतां अपल्या अगदीं विश्वासांतले पानशे याजबरोबर कांहीं पायदळें व तोफा देऊन त्यास नानानें राजमाचीकडे रवाना केलें. दसऱ्याच्या सुमारास शिंदे होळकर पुरंदरास आले. त्यावेळीं महादजीशीं संगनमत नानानें केलें व इकडे भाऊनें राजमाचीपुढें सरकूं नये म्हणून त्याच्याशीं तहाचें बोलणें लावलें. नाना फडणीसाचा हा डाव भाऊंच्या लक्षांत

आला नाहीं. आपसांतील युद्ध टाळून पेशव्याचा कारभार आपल्या हातीं आला तर त्यांना ती गोष्ट पाहिजे होती. म्हणून तडजोडीचीं बोलणीं चालू असेपर्यंत भाऊसाहेब थोडे बेसावध राहिले व या परिस्थितीचा फायदा घेऊन शिंद्याच्या सैन्यानें भाऊच्या सैन्यावर एकाएकीं हल्ला चढविला. विश्वासघातानें अकस्मात् केलेल्या या हल्ल्यामुळें भाऊची फौज गांगरून गेली. शिंद्याच्या फौजेनें खुद्द भाऊच्या गटावरहि हल्ला चढविला व शेंकडो लोकांची कत्तल उडविली. आपल्या फौजेची अशी दुर्दशा झालेली पाहून भाऊंनीं आपल्याबरोबर निवडक लोक घेऊन तेथून पाय काढला व शिंद्याच्या फौजेच्या कोंडया चुकवीत त्यांनीं बेलापूर गांठलें. या ठिकाणीं गलबतांत बसून ते मुंबईकडे निघाले. भाऊंचें हें गलबत रघोजी आंग्रे यानें पकडलें व भाऊ व त्याच्याबरोबरचे लोक आपल्या ताब्यात घेतले. रघोजी आंग्रे या सर्व मंडळींना घेऊन पुण्यास निघाला त्या वेळीं आपली नीट चौकशी करण्यांत यावी व पुढें काय तें करावें, असें वचन भाऊसाहेब यांनीं आंग्रे यांच्याकडून घेतलें व आंग्र्यांनींही ती गोष्ट कबूल केली.

भाऊसाहेबांना ज्या हद्दींत पकडलें ती मुंबईकर इंग्रजांची हद्द होती. आपल्या हद्दींत सदाशिवराव भाऊंना पकडून आंग्रे त्याला पुण्यास घेऊन चालले, असें समजतांच मुंबईच्या गव्हर्नरानें 'सदाशिवराव भाऊंना आमच्या स्वाधीन करावें तसें न केल्यास आम्ही तुमच्यावर स्वारी करूं'*असा खलिता आंग्र्यास पाठविला. इंग्रजाचें हें धोरण पाहून नाना फडणिसाला मोठा पेंचच पडला. 'भाऊसाहेब खरे' अशी इंग्रजाचीहि खात्री होती. तशा प्रकारचें पत्र हॉर्नबी साहेबानें नाना फडणीसाला पाठविलें होतें. तेव्हां या पेंचांतून बाहेर पडण्याकरतां कांहीं तरी उपाय योजणें नाना फडणीसाला भागच होतें. कलकत्ता सरकारचा वकील कर्नल ॲप्टन त्या वेळीं पुण्यास होता. तेव्हां त्याच्याशीं कारभारी मंडळीचें या बाबतींत बोलणें झालें व ॲप्टन साहेबानें भाऊसाहेबाची चौकशी केली जाईल, अशी हमी मुंबई सरकारास दिल्यावर व ती त्यांनीं मान्य केल्यावर रघोजी आंग्र्यांनीं सदाशिवराव-भाऊंना नानांच्या स्वाधीन केलें. याप्रमाणें सदाशिवरावभाऊ पुण्यास येण्या-

---

* मराठे व इंग्रज, न. चिं. केळकर पा. ७८

पूर्वी मुंबई सरकारला संमत होईल अशी एक चौकशी कमिटी नेमण्यांत आली होती व या पंच कमिटीचें काम योग्य रीतीनें व्हावें हें पाहण्याकरितां क. ॲप्टनची योजना करण्यांत आली होती.

या पंच कमिटींत एकंदर २७ लोक होते. रामशास्त्री प्रभुणे तर या कमिटींत होतेच. हरीपंत फडके, बाबूजी नाइक बारामतीकर, गोपीनाथ दीक्षित वगैरे मंडळीही या कमिटींत होती. २१ डिसेंबर १७७६ रोजीं या कमिटीच्या कामास सुरुवात झाली. कमिटीचें काम पांच दिवस चाललें. भाऊसाहेब खरे नाहींत. कमिटीपुढें आलेला इसम भाऊसाहेबाचा तोतया आहे असा कमीटीनें एकमतानें निर्णय दिला व या तोतयाला देहांत शिक्षा दिली.*

१७६२ सालीं झांशी प्रांतांतील नरवर गांवीं भाऊसाहेब प्रथम ओळखला गेला. उत्तरेंतील शिंदे होळकराखेरीज लहानमोठ्या सरदारांनीं 'भाऊसाहेब खरे' अशी खात्री करून घेऊन फौजफांटा व इतर हत्ती, घोडे, पालख्या वगैरे पेशव्याच्या घराण्यांतील खासा स्वारीला शोभेसा लवाजमा त्यास मिळवून दिला. पर्वतीवर भाऊसाहेबाला आणल्यानंतर त्याच्याशीं कराराचा करार करण्याचीही पेशवे व त्याचे कारभारी यांनीं तयारी दर्शविली. मध्यंतरीं याच भाऊसाहेबाला तोतया ठरवून प्रथम धनगड व दौलताबादेच्या किल्ल्यावर ठेवलें. तरी पुन्हापुन्हा त्यांची चौकशी करणें पेशवे व त्याचे कारभारी यांना भाग पडलें. बाळाजी विश्वनाथाची मुलगी व इचलकरंजीचा कारभार पाहणाऱ्या अनुबाई यांस आपल्या वाड्यांत ठेवलें असतांना 'भाऊसाहेब खरे' अशी त्यांचीही खात्री झाली. दौलताबादच्या किल्ल्यावरून मिरजेच्या किल्ल्यावर भाऊसाहेबाला आणल्यावर परशराम भाऊची आई जानकीबाई यांनाही भाऊसाहेब खरे असें खात्रीनें पटलें, शेवटीं रत्नागिरीच्या किल्ल्यावर नाना फडणीसाच्या अत्यंत विश्वासांतले रामचंद्र नाईक व परांजपे त्यांच्या पत्नी अन्नपूर्णाबाई यांना व पेशव्याच्या आप्तइष्टांना व दादंभट, बापूभट वगैरे पेशव्याच्या घराण्याशीं संबंध असलेल्या वैदिक मंडळींनींही भाऊच्या वेदाध्ययनाच्या बाबतींत पूर्ण परीक्षा घेऊन 'भाऊसाहेब खरे' असें ठरविलें. रामचंद्र नाईक परांजपे यांनीं

---

१ ऐ. ले. सं. प. नं. १९१४

भाऊसाहेबांवर होत असलेल्या अन्यायाचा प्रतिकार करण्याकरितां आपल्या सर्वस्वावर पाणी सोडण्याची तयारी करून भाऊसाहेबांना बंधमुक्त केलें. व्यंकटराव घोरपडे, अमृतराव पेशवे, हरबाअण्णा पटवर्धन, धुळप वगैरे सरदार भाऊला फौजेनिशीं येऊन मिळाले. कोंकण पट्टींतल्या किल्लेदारांनीं भाऊसाहेबांना ओळखून आपले गड व किल्ले त्यांच्या स्वाधीन केले, अनुबाई, जानकीबाई व अन्नपूर्णाबाई यांच्या सारख्या पेशवे-घराण्याशीं निकट संबंध असलेल्या स्त्रियांनीं ' भाऊसाहेब खरे ' असें ठरविलें. विशेष हें कीं पुरुषाच्या स्वभावांतील मर्म न् मर्म स्त्रियाच जाणूं शकतात, याहि कसोटीस भाऊसाहेब पूर्ण उतरले, रघुनाथराव कोल्हटकरानें आपल्या मेहुण्यास पूर्णपणें ओळखलें, पण तेच भाऊसाहेब क. अप्टन साहेबाच्या देखरेखीखालीं चालू झालेल्या पंचकमिटीच्या चौकशींत मात्र तोतया ठरले! ही घटना खरोखरीच अत्यंत आश्चर्यजनक होती, यांत शंकाच नाहीं. पण या घटनेंतील अगदीं अतर्क्य असें रहस्य लवकरच बाहेर आलें. या कमिटीनें ज्या माणसाला तोतया ठरवून देहान्त शासन फर्मावलें तो बाजी गोविंद नांवाचा सोनार होता.* हा बाजी गोविंद सदाशिव भाऊंच्या जागीं कमिटीपुढें कसा आला ? कर्नाटकांत भाऊसाहेब म्हणून प्रसिद्धी पावलेला व पुढें तोतया ठरवून त्याच वेळीं देहान्त शासनाची शिक्षा झालेला पण शिक्षा अंमलांत न येतां नगरच्या किल्ल्यांत बंदिस्त असलेला हा इसम कमिटीपुढें चौकशी करण्याकरतां कोणी उभा केला, याचें उत्तर अगदीं सरळ व सोपें आहे. नाना फडणीस त्या वेळीं पेशवाईचा कारभार मुखत्यारीनें पहात होता त्यानेंच ही अशी अदलाबदल केली. नानानें या वेळीं आपल्या कपटनीतीचा विक्रमांक गांठला व चाणक्यालाही मागें टाकलें. नरवरला प्रकट झालेले फौजफांट्यासह व लवाजम्यासह खानदेशपर्यंत येऊन पोंचलेले व शेवटीं कोंकणपटी हस्तगत करून पुण्याजवळच्या राजमाची किल्ल्यापर्यंत आलेले व रघोजी आंग्र्यानीं विश्वासानें नानाच्या स्वाधीन केलेले भाऊसाहेब या कमिटीपुढें आले असते तर त्यांना तोतया ठरविण्याची कमिटींतील एका माणसाचीहि छाती झाली नसती. या कमिटींत पुढें तरी काय आलें तर

---

*महादजी शिंदे यांचें चरित्र—नातू.

चौकशीकरतां पुढें उभा केलेल्या इसमाच्या डोक्यावर बेलभंडार ठेवला व त्यानें आपलें नांव सुखलाल, बापाचें नाव रामानंद, आईचें नांव मन्मथा व जात कनोजा असें त्यानें सांगितलें. जो चौकशीचा फार्स १७६५ साली पर्वतीवर आणलेल्या भाऊसाहेबांच्या बाबतींत करण्यांत आला व भाऊसाहेबांनीं आपली ही अशी हकीकत बेलभंडार डोक्यावर ठेवल्यावर सांगितली असें रामशास्त्री प्रभुणे यानें बाहेर प्रसिद्ध केलें व खऱ्या भाऊसाहेबाला तोतया ठरविण्याचा प्रयत्न केला बरोबर तीच हकीकत याच रामशास्त्र्यानें या कमिटीपुढेंही वरील अदलाबदल केलेल्या बाजी गोविंद सोनाराकडून वदविली.

एरवीं १७६५ सालीं पर्वतीवर जी चौकशी झाली तींत आपल्या कारकीर्दींत हजारो पत्रें लिहिलेल्या व वसूल खात्याचें काम चोखपणें बजावणाऱ्या भाऊसाहेबाचे गुण तोतयांत आढळले नाहींत. मातृभाषेवर त्याचें प्रभुत्व नव्हतें. त्यानें वेदाध्ययन केल्याचें दिसलें नाहीं. त्याचप्रमाणें भाऊसाहेबानें आपल्या यशस्वी कारकीर्दींत ज्या अनेक मसलती केल्या व कारभाराचीं कामें केलीं त्यासंबंधाची माहिती तोतयाला सांगतां आली नाहीं, असें १७६५ च्या चौकशीनंतर रामशास्त्र्यानें म्हटलेलें नाहीं. भाऊच्या आंगची स्वाभाविक धडाडी व त्याच्या स्वभावांतील लकबी तोतयांत आढळल्या नाहींत, असेंही रामशास्त्र्यानें त्या वेळीं दाखविलें नव्हतें. असले कांहीं दोष १७६५ सालीं पर्वतीवर आणलेल्या भाऊसाहेबाच्या अंगीं असते तर पेशवे व त्यांचे कारभारी यांच्या या हुशार हस्तकानें तेव्हांच उघडकीस आणले असते. त्यावेळीं म्हणजे अकरा वर्षांपूर्वीं जो चौकशीचा फार्स रामशास्त्र्यानें केला तसलाच फार्स यावेळींही झाला असला पाहिजे, यांत शंकाच नाहीं. तसें नसतें तर या चौकशीसंबंधीं पुण्यांतील कारकून शिवाजी बाबाजी यानें गंगाधरराव पटवर्धन यास मिरजेस जें पत्र पाठविलें त्यांत या हकीकतीशिवाय वरील प्रकारच्या इतर चौकशीसंबंधाचा उल्लेख खात्रीनें केला असता. यावेळीं तर बोलून चालून एक सोनार जातीचा इसम या चौकशी कमिटीपुढें उभा करण्यांत आला होता. तेव्हां भाऊसाहेबाला तोतया ठरविणाऱ्या असल्या हकीकती जर पुढें आल्या असत्या तर त्यानें त्या फुलवून व तिखटमीठ लावून आपल्या पत्रांत

सांगितल्या असल्या. तें कांहींही असो, पण ही जी सत्तावीस लोकांची कमिटी बसली, तिच्यापुढें रघोजी आंग्र्यानीं नानांच्या स्वाधीन केलेला व कोंकणपट्टी ताब्यांत घेतलेला भाऊसाहेब उभा करण्यांत आला नाहीं. नाना फडणिसानें दुसराच एक इसम त्याच्याबद्दल कमिटीपुढें उभा करून पंचकमिटीला फसविलें व इंग्रजाचा वकील क. ॲप्टनलाही त्यानें हातोहात फसविलें व त्याच्याकडून तोतयाच्या देहान्त शासनाचा फैसला मिळवून घेतला.

नाना फडणीसानें हा जो प्रकार केला तो या बाजी गोविंद तोतया-बरोबरच खुद्द भाऊसाहेबांचा निकाल लावण्याकरतांच केलेला होता, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. कमिटीनें तोतया ठरविलेल्या इसमास पुण्यास मेखसूखालीं ठार मारलें.[1] या तोतयास पुण्यास हत्तीच्या पायीं बांधून ठार मारले.[2] अशा या तोतयाच्या शिक्षेच्या अंमलबजावणीसंबंधानें दोन हकीकती प्रसिद्ध असल्या तरी जो पुण्यास मारला गेला तो सोनार होता, हें मात्र निर्विवाद आहे.[3] पण भाऊसाहेबाचें काय झालें ? भाऊ-साहेब तोतया ठरल्यानंतर व त्यास देहांताची शिक्षा मिळाल्यानंतर खऱ्या भाऊसाहेबाची कशीहि वाट लावण्यास नाना फडणवीस आतां मुखत्यार होता. एवढयाकरतांच तर नानानें हे अदलाबदलीचें कौटाळ रचिलें होतें. भाऊसाहेबाला यापुढें जीवंत ठेवणें शक्यच नव्हतें. ‘ कोणाची ओळख भाऊसाहेब म्हणून पुरली नाहीं, असें झालें. नंतर तोतयास कैद करून पायांत बिडी ठोकून किल्ले सिंहगड येथें पोंचविलें. त्याच्या अगोदर सखा-रामबापू त्याच किल्ल्यावर होते. तेथें तोतयास पोंचविलें. तोतयाचा अंत किल्ल्यावर झाला.’[4] ‘ तोतायास अहमदनगरास पाठवून उपोषणादि दुःख देऊन मारला.’[5] या दोन्ही हकीकतीवरून एक गोष्ट स्पष्ट आहे. स्थल कोणतेंही असो. भाऊसाहेबाला उपोषणें घालून ठार करण्यांत आलें. नानाच्या हुकुमाशिवाय असें होणें शक्य नव्हतें. याप्रमाणें पेशव्यांच्या घराण्यांतील एका अत्यंत तेजस्वी, शूर व कर्तृत्वान् महापुरुषाचा असा शोचनीय अंत झाला.

---

१ खरेशास्त्री पटवर्धन दप्तर, २ ग्रँट डफ, मराठयांची बखर. ३ महा-दजी शिंदे चरित्र. नातु, ४ पे. बखर. ५ ग्रँट डफ.